# साहित्य-संग्रह

## भाग तिसरा

### शिवराम महादेव परांजपे

प्रस्तावना लेखक :

स. आ. जोगळेकर

पुनर्मुद्रण : २७ सप्टेंबर १९४६

साधी बांधणी ३॥ रुपये ] [ कापडी बांधणी ४ रुपये

# साहित्य संग्रह

## भाग तिसरा

## अनुक्रमणिका

# प्रस्तावना

या सकीर्ण लेखसंग्रहांत नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या शिवरामपंतांच्या लेखांचा समावेश करण्यांत आला आहे. काळ पत्रांतील निबंधांची निवड पतांनीं स्वतःच केली होती. दर आठवडयाला 'काळ' वाचण्याचें भाग्य ज्यांच्या वांटयाला आलें होतें त्यांना त्यांतील प्रासंगिक मजकुराची खुमारी विशेषच वाटली असेल, यांत सशय नाहीं. 'काळा'चे खण्ड आतां इतके दुर्मिळ झाले आहेत कीं, बंधमुक्त निबंध संग्रहाचें संपादन करण्यासाठीं हुकुमी ठिकाणें धुंडून अथवा मोबदला जाहीर करूनही कांहीं खण्ड तात्पुरत्या उपयोगासाठींही मिळूं शकले नाहींत. तुमच्या आमच्या डोळ्यांदेखत हें जिवंत वाङ्मय काळच्या उदरांत गडप झालें! परांजप्यांच्या निबंधसंग्रहाच्या या खण्डांतील लेख मुख्यत्वेंकरून साहित्यविषयक आहेत. या संग्रहांतील तात्त्विक लेख त्या विषयाचें बरेंच अध्ययन केलेल्या प्रौढांसाठीं लिहिलेले असल्यामुळें, त्यांची बैठक प्रासंगिक नसल्यामुळें आणि खरें सांगावयाचें म्हणजे मला त्या विषयांतील कांहींच गम्य नसल्यामुळे प्रस्तावनेंत त्यांची मुळींच चर्चा केलेली नाहीं; साहित्याशीं संबद्ध असलेल्या आणि प्रसंगाच्या व विषयाच्या अनुरोधानें मी आपले विचार देण्याचें धाष्टर्य केलें आहे.

**महाराष्ट्र साहित्य संमेलन**

बेळगांवच्या महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाच्या वेळीं तेथील स्थानिक परिस्थिति फार नाजूक झालेली होती. तेथें समेलन भरणार असें निश्चित होतांच कानडी विरुद्ध मराठी हा उत्तर कर्नाटकांत बऱ्याच वर्षांपासून चालू असलेला वाद एकाएकीं निकरावर आला. खरें पाहिले असतां महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या संस्कृतीमध्यें संग्रामापेक्षां साधर्म्यच अधिक आहे. तरीही या वेळीं कानडी नियतकालिकांतून मराठे व मराठी यांचीच नव्हे तर भगव्या झेंडयाचीही हेटाळणी सुरू झाली. कर्नाटकांत स्थायिक झालेल्या महाराष्ट्रीयांवर बहिष्कार घालण्याची भाषा सर्वत्र ऐकूं येऊं लागली व तसे कांहीं प्रयोगही झाले. भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व राष्ट्रीय सभेनें मान्य केल्यामुळें स्थानिक कार्यकर्त्यांनीं

महाराष्ट्राच्या अपरोक्ष तयार केलेल्या एकीकृत कर्नाटकाच्या हंगामी योजनेंत बेळगांवचा व मराठी संस्थानांचा समावेश कर्नाटकांत करण्यांत आला होता; असें असूनही बेळगांवांस मराठी-साहित्यसमेलन भरविणें म्हणजे कर्नाटकाचाच नव्हे तर प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेचा अपमान करणें होय, अशी भूमिका घेऊन हें समेलन हाणून पाडण्याचा संयुक्त कर्नाटकाच्या पुढाऱ्यांनीं चंग बांधला. पाकिस्तानी आवेशाचीं भाषणें, ठराव व लिखाणें होऊं लागलीं. महाराष्ट्रीयांना मुलुखगिरीची संवय असून बेळगांवचे साहित्यसमेलन हा लूटमारीचा सुधारलेला मामला आहे, असें गृहीत धरून सायमन कमिशनला काळीं निशाणें दाखविण्यांत आलीं होती तोच प्रयोग साहित्य समेलनाचा जो कोणी अध्यक्ष होईल त्यावर करावयाचें कांहीं कर्नाटकीयांनीं ठरविलें. कर्नाटकाचे जुन्या पिढींतले पुढारी श्री. गंगाधरराव देशपांडे यांना व त्यांच्या बरोबरीच्या कार्यकर्त्यांना ही चळवळ व मार्ग पसंत नव्हते. त्यांनीं राष्ट्रीय चळवळींत महाराष्ट्रीयांच्या खांद्याला खांदा भिडवून कार्य केलें होते; महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांशी त्यांचा अनेक वर्षांचा ऋणानुबंध होता; आणि मला वाटतें, महाराष्ट्रीयांच्या सध्देतूबद्दल व सत्प्रवृत्तीबद्दलही त्यांची खात्री पटलेली होती. म्हणून ते या विषारी प्रचारापासून अलिप्त राहिले; बेळगांवांतील व कर्नाटकांतील कानडी पुढाऱ्यांचीं हृदयें क्षणभर तरी धरण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व तो थोडाबहुत यशस्वीही झाला; समेलनासाठीं ठिकठिकाणांहून आलेल्या प्रतिनिधींचा व पाहुण्यांचा त्यांनी इतक्या चांगल्या प्रकारें परामर्ष घेवविला, कीं कर्नाटकांत महाराष्ट्राविरुद्ध चाललेल्या प्रकाराबद्दल वाटणारी चीड व्यक्त करण्यासाठीं बिचाऱ्यांना तोंड उघडावयासही सवड मिळाली नाहीं ! बेळगांवच्या महाराष्ट्र भाषाभिमानी मंडळींनीं प्रयत्नांची शिकस्त करून संमेलन यशस्वी केलें. सभा-संमेलनें यशस्वी करण्यासाठीं जेवढी खटपट करावी लागते त्याच्या सहस्रांशाइतक्याही खटाटोपानें तीं उधळून देतां येतात. पुण्यांत हुल्लडीचें शिक्षण घेतलेले लोक तेथे नव्हते असेंही नाहीं. पण तेवढीही उचल करण्याची कर्नाटकाच्या एकीकरणाचा अभिनिवेश दाखविणाऱ्या पुढाऱ्यांनीं हिंमत केली नाहीं. बेळगांवकरांची तयारीच तशी होती. हिंदुस्थानांत कोठेही जा, ज्याचा त्याचा मराठ्यांवर दांत, त्यांतल्या त्यांत पुणेंकरांवर सर्वांचा विशेष राग; कोठे आम्ही लुटारू म्हणून तर कोठे पोटभरू म्हणून; आणि पुणेंकर चित्पावन म्हटला,

कीं त्याच्यावर कोणाचा दांत नाहीं असें नाहींच—अगदीं एकमेकांचा एकमेकांवर सुद्धां! केळकरांचें परांजप्यांशीं पटत नाहीं तर राजवड्यांचे कोणाशींच जमत नाहीं; असें सर्वांचे नागफणी स्वभाव! कर्नाटकांतल्या चळवळीचा रोख विशेषतः चित्पावनांवरच होता असें त्या वेळीं प्रसिद्ध झालेल्या शिवराळ चोपड्यांवरून दिसून येते. अशांतलेच एक म्हणजे शिवरामपंत हे या समेलनाला अध्यक्ष लाभले होते; एवढेच कीं त्यांचे निवासस्थान सदाशिव पेठेंत नव्हतें! त्यांची मनोवृत्ति केव्हांच फारशी संगतिप्रिय नव्हती. या वेळीं मात्र त्यांनी सर्वांबरोबर मिळून मिसळून पण कोणाच्याही आहारीं न जातां दुहीची विषवल्ली मुळांतच खुडून टाकली. असंबद्ध मुद्यांवर अवेळीं सुरू झालेलें भांडण मिटणें अगर मिटवणें अशक्यप्राय असतें. वादाचा विषय राजकीय व म्हणून साहित्यसमेलनाशीं असंबद्ध असल्याचा निर्णय अध्यक्षांनीं दिल्यामुळें पुष्कळ लोक त्यांच्यावर नाराज झाले; पण त्यांच्या निवाड्यामुळें भांडण शमलें, हे कोणालाही नाकारतां येणार नाहीं. त्या वेळीं परांजप्यांचे प्रभावी वाङ्मय सरकारजमा होऊन बरीच वर्षे लोटलीं होती. त्याशी परिचय असणाऱ्या मंडळींची संख्या अत्यंत अल्प असली तरी महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांवर काळकर्त्याची अशी पकड होती, कीं जणूं त्यांच्या मागें दहा वर्षांच्या काळखंडांची देदीप्यमान प्रभावळ झळाळत असल्याचें सर्वांना प्रत्यक्षच दिसत होतें! कर्नाटकीय सुशिक्षितांचें उच्च शिक्षण तोंवर बव्हंशीं महाराष्ट्रांतील संस्थांमध्येंच झालेलें असल्यामुळें त्यांचीही वृत्ति अशीच होती; आणि म्हणूनच त्यांनीं शिवरामपंतांना काळीं निशाणें दाखवून त्यांचा अपमान केला नाहीं व अवलक्षण करून घेतलें नाहीं. या नियोजित दिग्दर्शनाबद्दल आपल्या समारोपाच्या भाषणांत परांजपे म्हणाले, "आम्हांला काळीं निशाणें दाखवावयास आम्ही काय सायमन आहों?" ज्या कर्नाटकीय देशभक्तांच्या सुदैवामुळें त्यांना तुरुंगवासाच्या विपरीत परिस्थितींतही परांजप्यांचा दुर्मिळ सहवास मिळावयाचें सद्भाग्य लाधलें होतें त्याच लोकांकडे कर्नाटकाच्या एकीकरणाच्या निमित्तानें महाराष्ट्र-साहित्य-समेलनाच्या विरोधाच्या चळवळीचें नेतृत्व होतें. त्यांच्याबद्दल परांजपे त्याच भाषणांत म्हणाले, "कानडी लोकांच्या चळवळीबद्दल आम्हांला प्रेम वाटतें. त्यांनीं आम्ही एका ठिकाणीं काढलेल्या दिवसांचें स्मरण होऊन त्यांच्या सध्यांच्या धोरणाबद्दल आश्चर्य वाटतें. मराठीचा द्वेष

करून कानडी भाषेची प्रगति होईल असें तुम्हांला वाटतें काय ?" शिवरामपंतांच्या मागें त्यांच्या देशसेवेची प्रभा व तपस्या उभी होती, तपश्चर्येचीं फळें त्यांच्याबरोबर बंदिवासांत भोगणारे लोक तेथें होते; एकमेकांनीं परस्परांची कदर केली व म्हणूनच संमेलन यशस्वी झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. शिवरामपंतांनीं महाराष्ट्राच्या सद्हेतूबद्दल कर्नाटकीयांची इतकी खात्री पटवली, कीं यानंतर असें विषारी वातावरण पुन्हां निर्माण झालें नाहीं.

सहित्यसमेलनांत शिवरामपंतांचें भाषण ता. २६।५।१९२९ रोजीं झालें. पूर्वीपासून असलेल्या मधुमेहाच्या विकारांत काळपुळीची भर पडल्यामुळें आलेल्या दुखण्यांतून तें नुकतेच बचावले होतें—ते जणूं बेळगांवचें साहित्य संमेलन यशस्वी करण्याकरितांच ! समेलनानंतर लवकरच म्हणजे ता. २७।९।२९ रोजी काळकर्ते कालवश झाले. त्यांच्या भावनाप्रधान ववतृत्वाची सर्वत्र ख्याति होती. बेळगांवासच पूर्वी प्रांतिक परिषदेच्या वेळीं समेटाच्या ठरावाला अनुमोदन देतांना त्यांनीं एकाच वाक्याचें भाषण करून सर्वांना चकित व निराश केलें होतें. आतां तरी आपणांस ऐन जमान्यांतलें अव्वल वक्तृत्व ऐकावयास मिळणार अशी सर्वांची अपेक्षा होती. पण त्यांचें हें भाषण प्रासंगिक स्वरूपाचें, भावनांच्या चक्रांत गर्क होऊन तल्लीनपणें केलेलें अगर तात्कालिक स्फूर्तीवर अधिष्ठित झालेले नव्हते. मुरलेला विद्वान्, कसलेला लेखक, दूरदर्शी कार्यकर्ता, या नात्यानें महाराष्ट्राच्या साहित्यिकांना अधिक कार्यप्रवण करण्यासाठीं त्यांनीं हें भाषण तयार केलें होते. त्यांत त्यांनीं आपल्या साहित्यिक अनुभवांचे व अपेक्षांचे सारसर्वस्व ओतलें होते आणि साहित्यापुरता त्यांच्या जीवनाचा अखेरचा संदेश त्यांच्या या भाषणांत समाविष्ट झालेला आहे.

फार वर्षांपासून मराठी भाषेवर बाजूंबाजूंनीं बगल हल्ले चाललेले आहेत. व्यापाराच्या निमित्तानें गुजरातीचें, भाषावार प्रांत रचनेच्या निमित्तानें कानडीचे आणि राजकीय हेतूमुळें गोव्यांत पोर्तुगीजचें व मोंगलाईत उर्दूचें, अशा आक्रमणांनीं महाराष्ट्राची सरहद्द खिळखिळी होत असल्याचे त्या वेळीं प्रत्ययास येऊं लागलें होतें आणि परकीय सत्तेच्या प्रादुर्भावामुळें व आंग्ल वाङ्मयाच्या वाढत्या परिचयामुळें मराठीचा अंतरात्माही दूषित होतो कीं काय, अशी साधार भीति वाटूं लागली होती. या आक्रमणांमुळे इतिहासाचार्य राजवाडे इतके उद्विग्न झाले, कीं त्यांनीं १९२५ सालीं पुणें येथें भरलेल्या पहिल्या शारदोपासक

संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांत उद्गार काढले, कीं परिस्थितीच्या व इंग्रजी-च्या जोखडाखालीं आपली मराठी भाषा मरणार. त्यांच्या या विधानाबद्दल परांजपे म्हणतात, "पारतंत्र्याच्या तिटकाऱ्याच्या दृष्टीनें राजवाडे यांची काळजी लक्षांत घेण्यासारखी नाहीं असें कोण म्हणेल ? पण एवढें खास कीं, आपली मराठी भाषा मरणोन्मुख झालेली नसून तीं उत्तरोत्तर उदयोन्मुख होत चाल-लेली आहे. तिच्यांत हल्लीं जर थोडा तेजस्वितेचा कमतरपणा दिसत असेल तर तो सध्याकाळच्या नंतरचा नसून प्रातःकाळच्या पूर्वीचा आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या गीतेवरील भावार्थदीपिकेपासून लो. टिळकांच्या गीतारहस्यापर्यंत मराठीमध्यें आतांपर्यंत अनेक ओजस्वी ग्रंथ निर्माण झाले आहेत. ती मराठी भाषा मरण्याकरतां जन्माला आलेली नाहीं. ज्या भाषेत रामदासांनीं शिवाजीला स्वधर्मरक्षणाची प्रेरणा केली, ज्या भाषेंमध्यें शिवाजी महाराजांनी मराठ्यांचें स्वराज्य आणि स्वातंत्र्य प्रस्थापित केलें ती मराठ्यांची भाषा मारण्याकरितां जन्माला आलेली आहे, मरण्याकरतां नव्हे. मराठी भाषा नष्ट होणे केव्हांहीं शक्य नाहीं." सावरकरांच्या भाषाशुद्धीच्या उद्योगाबद्दल ते म्हणतात, "आपल्या भाषेबद्दल इतका सकारण आत्मविश्वास असतांना तिच्यामध्ये परकीय शब्द आले तर ते आपल्या भाषेचें नुकसान करीत नसून उलट आपल्या भाषेतील शब्दसंपत्ति वाढविण्यालाच कारणीभूत होतात. त्यांना धक्के मारून घालवून देण्यांत आपण आपल्या भाषेचा कांहीं फायदा करीत आहों असा मुळींच अर्थ होत नाहीं." पूर्वी पोर्तुगीज व मुसलमान यांच्या हातचे अन्न खाल्ल्यामुळे जात गेली, आतां अख्खा किरिस्तांव वा मुसलमान खाल्ला तरी जात जाणार नाहीं, त्याच भावनेनें या प्रश्नाकडे पाहून आपण परकी शब्द पचवून ते आत्मसात् करून टाकले पाहिजेत हें उघड आहे. पंत अनुस्वाराला कुंकुमतिलका-इतकें महत्त्व देत, म्हणून त्यांना सनातनी मानण्यांत येत असे; पण भाषेच्या बाबतींत त्यांचे विचार असे किती प्रगमनशील होते आणि मराठीच्या उज्वल भवितव्याबद्दल त्यांना चैतन्यपूर्ण आत्मविश्वास किती वाटत होता, याची कल्पना त्यांचें संपूर्ण भाषण वाचणारांना सहज होण्यासारखी आहे.

राजद्रोहाबद्दल झालेल्या शिक्षेतून शिवरामपंत सुटून आल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं सरकारनें 'काळ' पत्राकडून दहा हजारांचा जामीन मागितला. जामीन-कीची रक्कम भरली तरी सरकार ती केव्हां जप्त करील याचा नेम नसल्यामुळें

शिवरामपंतांनीं काळ पत्र बंद केलें. पण जे लेख पूर्वीच प्रसिद्ध झाले होते त्यांची वाट काय? राष्ट्रीय पक्षाहून ज्यांचा मार्ग भिन्न होता, ज्यांच्यावर सरकारचा विश्वास होता, ज्यांचें इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांवर प्रभुत्व होतें अशा अनेक देशभक्तांनी राष्ट्रीय चळवळीच्या व दहशतवादाच्या संकटांतून स्वदेशाला मुक्त करण्याच्या उच्च भावनेनें प्रेरित होऊन या लेखांचीं भाषांतरे गोऱ्या पत्रकारांना व अधिकाऱ्यांना अगोदरच पुरविलीं होतीं; साहेबाला त्यांतील श्लेष व सूचना सहजासहजीं समजणार नाहींत तेथें स्पष्टीकरणार्थ टीपा देऊन हें लिखाण या हौशी विद्वानांनीं आपखुषीनें व आपखर्चानें ठिकठिकाणीं पाठविलें होतें आणि या लेखांच्या भयंकरपणाची बोंब लंडन टाइम्सपर्यंत पोंचली होती. खरोखर, हीं भाषांतरें जर आतां उपलब्ध झालीं तर केवढी सोय होईल! मी असें ऐकतों कीं या संग्रहाचे प्रकाशक त्यांतील कांहीं लेखांचीं निरनिराळ्या भाषेत भाषांतरें करवून घेणार आहेत; त्यांना निदान इंग्रजी भाषांतराबद्दल चिंता करावी लागणार नाही; कारण अशाच हरीच्या लालांनीं व नरनारायणांनीं तीं उत्कृष्ट भाषांतरे केलीं होतीं. काळ पत्र बंद करून शिवरामपंतांनीं एक पाऊल मागें घेतलेले पाहतांच सरकारनें एक पाऊल पुढें टाकून काळ पत्रांतील निबंधांचे दहाही भाग जप्त केले. कित्येक दिवसपर्यंत पंत स्वतःचीं पुस्तकें आपल्या हातांनीं जाळीत होते. ही पुस्तकें जाळतांना निघालेल्या ज्वाळांपेक्षांही प्रखर ज्वाळांचा डोंब तीं वाचतांना उसळला होता; तो कांहीं काळपर्यंत तरी सरकारने शांत केला यांत संशय नाहीं. याबद्दल पंत म्हणतात, "देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा देऊन सुद्धां मला जितका धक्का बसला नसता तितका सरकारनें माझा प्रतिप्राण असणारें दहा वर्षातले वाङ्मय जप्त करून दिला व हाच माझा तरुणपणचा जिवत मृत्यु होय." शिवरामपंतांचे हे उद्गार हृदय पिळवटून काढणारे आहेत यांत संशय नाहीं. टिळक-परांजप्यांना शिक्षा होण्यापूर्वी देशांत सर्वत्र देशभक्तांचा सुकाळ झाला होता, परांजपे सुटून आले त्या सुमारास चुगलखोरांचा सुळसुळाट झाला होता. नामधारी क्रान्तिकारकांच्या बनावट जबान्यांचे कारखाने सुरू झाले होते. ही सर्व परिस्थति पाहून शिवरामपंत इतके विटून गेले की कांहीं काळपर्यंत कांहींही करावयाचे नाहीं असे त्यांना ठरविलें आणि टिळक सुटून येईपर्यंत त्यांनीं आपला निश्चय पाळला. आपलें वाङ्मय जप्त झालें याबद्दल त्यांचें अंतःकरण होरपळून निघालें असेल यांत

संशय नाहीं. पण त्याहून जास्त यातना त्यांना आपल्या शिकवणुकीमुळें तयार झालेला पंथ नष्ट झाल्यामुळें झाल्या असतील. जप्त झालेल्या वाङ्मयाबद्दल ते पुढें इतके उदासीन झाले कीं 'सरकारविरुद्ध चिरचिर करण्याला सोयीचा विषय' अशी त्यांनीं या बाबतच्या ठरावांची संभावना केलेली आहे. याचें कारण त्यांना विश्वास होता कीं सरकार आज जे वाङ्मय जप्त करील त्याहून शतपटीनें ज्वलज्जहाल असें वाङ्मय दिवसानुदिवस निर्माण होईल आणि जनतेला जप्त झालेल्या वाङ्मयाची उणीव भासणार नाहीं.

**रायगड**

शिवरामपंतांचा जन्म महाडचा. त्यांचें प्राथमिक शिक्षण तेथेंच झालेलें. रायगड हें महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचे प्रतीक व महात्म्याचें केंद्र; महाडाहून अगदीं जवळ. रायगडावर पहिला शिवाजी उत्सव झाला, त्याचें नेतृत्व परांजप्यांचेकडे होतें. त्यांचें पहिलें जाहीर भाषण रायगडावर या उत्सवाच्या वेळीं झालें. शिवाजी महाराजांनीं स्वराज्याचा सकल्प पुण्यास केला व त्याची सिद्धी रायगडास केली; शिवरामपंतांच्या सार्वजनिक कार्याचा ओनामा रायगडास झाला व त्यांच्या योजनांची सघटना पुण्यास झाली. शिवाजीच्या वेळेपासून रायगडावर झालेल्या घटना किती तरी वेळां त्यांच्या अंतःकरणांत घोळल्या असतील. १९०८ सालीं पंतांना राजद्रोहाबद्दल शिक्षा झाली. त्यापूर्वी लेखांतून व व्याख्यानांतून उघडपणें अगर प्रच्छन्नपणें, पुरस्कारानें वा प्रोत्साहनानें त्यांनीं स्वातंत्र्यासाठीं दहशतवादी मडळ्या व सशस्त्र उठावणी या साधनांचें समर्थन केलें होतें. १९२० साली ते महात्माजींच्या चळवळींत सामील झाले. यामुळें त्यांचा पोशाख बदलला, पण प्रवृत्ति बदलली नाहीं. अहिंसा या तत्त्वाचा त्यांनीं स्वीकार केला, पण हा स्वीकार प्रतिज्ञेच्या स्वरूपाचा नसून धोरणाच्या स्वरूपाचा होता; मात्र दुसऱ्या कोणी असे बोललेलें त्यांना सहन होत नसे. अत्याचारित्वाच्या बाबतींत उघड टीका अगर गुप्त उपहास करणाऱ्या प्रतिष्ठितांची— आणि शिवरामपंत वाङ्मयक्षेत्रांत अवतीर्ण झाले तेव्हांपासून हेच लोक मधून मधून त्यांच्या टीकास्त्रांचें लक्ष्य होत होते—त्यांनीं अगदीं पूर्वीच्या पद्धतीनें टर उडविली आहे. तरी त्यांच्या यानंतरच्या लिखाणांतही क्रान्तीच्या पुरस्काराचे अवशेष आढळतात, असें त्यांच्या रायगड किल्ल्याचीं दोन स्थित्यंतरें व रायगडावरील संपत्ति ह्या रत्नाकरांत १९२६ सालीं प्रसिद्ध झालेल्या लेखांवरून

दिसून येईल. १६७४ साली रायगडावर शिवाजी महाराजांचें राज्यारोहण झालें, या प्रसंगाचें वर्णन करावें तेवढें थोडेंच होणार आहे. १८१८ साली दुसऱ्या बाजीरावाची पत्नी वाराणसीबाई रायगडावर असतांना इंग्रजांनीं किल्ल्याला वेढा घातला व तो काबीज केला. बाजीरावाबद्दल कितीही अनादर असला तरी महाराष्ट्रीयांना हा प्रसंग रुचणार नाहीं. पण राज्यारोहण व राज्यच्युति, निष्ठा व फितुरी यांच्या विरोधावर हें प्रकरणही पंतांनीं काळाच्या पद्धतीनें रंगविलें आहे. काळांतील लेखांच्या जोडीनें आतां हा लेख वाचावयास मिळत असल्या-मुळें पूर्वीच्या लेखांबरोबर याची तुलना होणें अपरिहार्य आहे. कसलेल्या मल्लानें वयोमानानें आपला पेशा सोडला तरी त्याचें अवसान त्याच्या प्रत्येक पवित्र्यांत प्रतीत झाल्यावांचून राहत नाहीं. त्याप्रमाणें या दोन्ही लेखांत पंतांचा पहिला पवित्रा दिसून येतो. मात्र यांत पूर्वीचा आवेग अगर आवेश दिसत नाहीं. १८१८ साली फितुरीच्या साह्यानें सोडलेल्या गोळ्यांचा नेम अचूक लागल्यामुळें रायगड उध्वस्त झाला आणि वाराणसीबाई व किल्लेदार शेख अबदुल यांनीं आपआपल्या खासगी दौलतीसह गड सोडला, या प्रसंगाचें हृदयस्पर्शी वर्णन पहिल्या लेखांत आहे. रायगडावरील ध्वस्त शिलाखंडांमध्यें गुप्त धन सांपडेल या आशेनें—कारण साहेबाला तेथें पांच लाख रुपये सांपडले होते—आसपासच्या लोकांनीं केलेल्या उद्योगाचें वर्णन दुसऱ्या लेखांत आहे. छत्रीनिजामपूरचा द्रव्यलोभी दौलती गुप्त धन शोधण्यासाठीं गडावर गेला. त्याने ठिकठिकाणीं खणून पाहिले, पण बिचाऱ्याला द्रव्य कांहीं सांपडलें नाहीं; मात्र तो असा भाग्यवान, की गडावर त्याला जन्मभूमीचें, स्वातंत्र्यलक्ष्मीचें, दिव्यदर्शन झालें. रायगडावर स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांची संपत्ति भरलेली होती, ती त्याला प्राप्त झाली. दौलतीचा जन्म १८३५।३६ च्या सुमारचा. रायगडावरील वरील प्रसगाचें साल दिलेलें नाहीं; पण पंत सांगतात, कीं त्या वेळीं तो अजमासें वीस वर्षांचा होता. म्हणजे १८५६ चा सुमार आला. पुढे ते सांगतात कीं, त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांतून दिल्ली, काल्पी, कानपूर, ग्वाल्हेरहून उत्साहजनक बातम्या येत होत्या; त्या ऐकून तो तिकडे गेला व नंतर त्याचा कोणाला पत्ता लागला नाहीं. अर्थात् तो १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामांत सामील झाला. तो कदाचित् तिकडे मारला गेला असेल; पण दौलतीच्या आयुष्याचें सोनें झालें, जवाहिर झालें. सशस्त्र उठावणीच्या कल्पनांच्या

राखेंतही अग्नि धुमसत होता, तो असा. वीस वर्षांपूर्वी त्यांनीं हा विषय कसा रंगवला असतां तें वेगळें सांगावयास नको.

**प्रणयिनीचा मनोभंग**

"प्रणयिनीचा मनोभंग" या ठाकूरसिंगांच्या चित्रावर शिवरामपंतांनीं रत्नाकर मासिकांत दोन लेख लिहिले. यांपैकीं पहिल्या लेखांत चित्रकलेची सर्वसाधारण चर्चा केलेली असून दुसऱ्या लेखांत प्रत्यक्ष चित्राची चर्चा रस-ग्रहणाच्या दृष्टीने केलेली आहे. पंच व टिट् बिट्स हीं मासिकें नसून साप्ताहिकें आहेत; टिट् बिट्स् व्यंगचित्रांबद्दल विशेष प्रसिद्ध केव्हांही नव्हते. जहाल पक्षांतील लोकांना विनोदाचे वावडे असल्यामुळे या नियतकालिकांचा आपल्या लोकांना फारसा परिचय नव्हता. हिंदू पंचांतील उथळ, निर्बुद्ध व हेटाळणीच्या चित्रांना व टवाळ्यांना विनोदी मानून गदगदा हसणारांना पंचमधील व्यंग-चित्रांच्या राजकीय सामर्थ्याची यत्किंचितही कल्पना नव्हती. एखाद्या अव्वल दर्जाच्या चित्रकाराचें चरित्र, त्याच्या चित्रांच्या प्रतिकृति व त्याचे कला-दृष्टीनें विवरण करण्याची प्रथा विलायतेत प्रथम पीयर्सन्स मासिकांत सुरू झाली. पुण्यामुंबईच्या बाहेर हें किंवा अशीं मासिकें दिसत नाहीत. आमचें उत्कृष्ट सचित्र मासिक म्हणजे चित्रमय जगत्! शिळा छापखाने प्रथम निघाले तेव्हां काढीत तशीं, पोथ्यांमध्यें आरंभीं देतात तशीं अगर सर्कशीच्या जाहिरांतीतल्यासारखीं चित्रें देण्यापलीकडे त्याची मजल केव्हांच गेली नाहीं. अशीं चित्रें पाहून विटलेल्या महाराष्ट्राला मनोरंजन व नवयुग या मासिकांनीं उत्कृष्ट कलाकृतींचा व प्रासंगिक चित्रांचा पहिला परिचय करून दिला. रत्नाकरांत प्रासंगिक चित्रें नसत. बहुधा दर अंकांत एक उत्कृष्ट तिरंगी चित्र देण्याची प्रथा रत्नाकरानेंच सुरू केली. अशीं चित्रें, तीं छापण्याच्या हक्कांसह अगर परवानगीसह मिळविणें व त्यांचे ठसे तयार करवून घेऊन तीं मोहोरेदार कागदावर छापणें, हें किती कष्टाचें व खर्चाचें काम आहे हें ज्याचें त्यालाच माहीत. दुर्दैवाची गोष्ट अशी, कीं एवढा आटापिटा करून दिलेल्या चित्रांबद्दल कोणी फारसे धन्योद्‌गारही काढले नाहींत. तसें पाहिलें तर आपणां महाराष्ट्रीयांना कलेची फारशी आवड अगर समज नाहीं. नांगर व तरवार चालविणारांना कलम-कुंचल्याच्या कुसरी-बद्दल फारसा आदर नसतो. संपत्ति व स्वास्थ्य स्थिर झाल्यानंतर कलाकौशल्या-कडे ओढ उत्पन्न होते. आणि तीं तर आम्हांला मिळालीं न मिळालीं तोंच

आमच्या स्वातंत्र्याचाच ग्रंथ आटोपला! अलीकडेच असल्या विषयांत आपलें मन रंगू लागलें आहे. अर्थातच या विषयावर फारसें वाङ्मय आपल्याकडे झालेलें नाही. चित्रे कशीं पहावींत याचे शिक्षण देणारे हे दोन लेख उत्कृष्ट आहेत, इतकेंच नव्हे, तर मला वाटतें मराठी वाङमयांत या विषयावरलें हें पहिलेच लिखाण असावें; म्हणून त्यांना महत्त्व आहे.

पण यांपैकीं दुसऱ्या लेखाला विशेष महत्त्व आलें तें शिवरामपंतांनीं शृंगारिक लेख लिहिला म्हणून. महाराष्ट्रांतील जहाल पक्षाला विनोदाप्रमाणेंच शृंगाराचेंही वावडे. टिळकांच्या मुखांतून अगर लेखणींतून शृंगारिक शब्द निघाल्याचा कोठे दाखला नाहीं. राष्ट्रीय पक्षाच्या मनोरचनेची बैठक टिळकांच्याच मनोवृत्तीवर आधारलेली असल्यामुळे निदान राजकीय कार्यकर्त्यांच्या बाबतीत तरी शृंगाराची गणना मनाई केलेल्या विषयांत होऊं लागली. आपल्या अनुयायांवर टिळकांची जरबही अशी होती, कीं कोठें मैफलीला जावयाचें म्हणजे चोरीचा मामला. तरीही कोण कोठें जातो, काय करतो याची बित्तंबातमी टिळकांना असावयाची. त्यांची शिस्त अशी करडी होती, पण त्यांच्या अनुयायांत त्यांच्यासारखा पूर्णपुरुष कोणी नव्हता. केळकर व खाडिलकर दोघेही कवि व नाटककार. केळकरांनीं विलासिनीच्या वेषभूषेवर कविता लिहिली तर खाडिलकरांनीं बालगंधर्वांमार्फत महाराष्ट्राला सुसंस्कृत शृंगाराचे प्रत्यक्ष दर्शन व श्रवण करविलें. तसें पाहिलें तर शिवरामपंत हे टिळकाचे अनुयायी केव्हांही नव्हते; राष्ट्रीय पक्षांतील ज्वलज्जहाल गटाचे ते अध्वर्यु होते. दोघांचें अतिम ध्येय एकच पण साधनें वेगळीं. टिळक आपलें ध्येय उपलब्ध साधनांच्या प्रमाणांत टप्याटप्यानें गांठूं पाहात, तर शिवरामपत एकदम झेप घ्यावयाची आकांक्षा बाळगीत. आपले सैन्य आणि सामुग्री यांचे प्रतिपक्षी याच्या बलाशीं समीकरण बसवून टिळक एकदां पाऊल उचलीत व टाकीत तेथें ते रोंवून खडे होत. टिळकांच्या वृत्तींत सेनापतीचा हुकमीपणा होता, खंद्या वीराचा खणखणाट होता, निष्ठावंताचा निर्धार होता, आदिशक्तीचें स्फुरण होते. टिळकांच्या नेतृत्वाचे दडक त्यांच्या अनुयायांनीही जुमानले नाहींत, मग ते शिवरामपतांवर बंधनकारक कसे असणार? पंतांच्या लेखणींत व वाणींत प्रासादिक मोहिनी होती, शारदेचे स्फुरण होतें, कल्पनांचा व भावनांचा स्वैर सचार होता, कलावन्ताचें कसब होते. टिळकांवर रसिकपणाचा आरोप करण्याचे धार्ष्ट्य कोणी

केलेलें नाहीं. शिवरामपंतांची मनोरचना वेगळी होती. ते पंडित होते, रसिक होते, ललितभावनाक्षम होते; मराठी गद्यकाव्याचे ते आद्य पुरस्कर्ते होते. अशाच प्रकारचें एक उत्कृष्ट गद्य-काव्य शिवरामपंतांनीं मराठी वाचकांना सादर केलें. प्रणयिनीचा मनोभंग या चित्राच्या अंगप्रत्यंगांतील चित्रकाराचा हेतु त्यांनीं हळुवारपणें उकलून दाखविला आहे. मूळ लेखांतील गर्भित अर्थ स्पष्ट करून दाखविण्यासाठीं कुशल टीकाकाराने त्यांतील पदापदांचे व अभिप्रेत भावनांचें विश्लेषण करून दाखवावें आणि नतर टीकाकारालाच टीकाविषय करून पण्डितबुवांनीं त्यांच्या पाण्डित्याचा व कौशल्याचा विचका करावा, असा प्रकार या लेखाच्या बाबतींत झाला. किती तरी दिवसपर्यंत या लेखावर निरनिराळ्या प्रकारच्या टीका येत होत्या. सदर लेख अश्लील आहे, शिवरामपंतांनीं उतारवयांत असा लेख लिहिल्यामुळें त्यांना म्हातारचळ लागला असला पाहिजे, असें प्रतिपादन करण्यापर्यंत टीकाकारांची मजल गेली. फरासखान्याशीं कानगोष्टी करून व अश्लीलतेबद्दल खटला भरून, मुलकी खात्यांत रद्देघाशी करण्यापुरताच ज्यांचा लेखनाशीं संबंध आला आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांचा रागलोभ ताडण्याइतकाच मानवी भावनाशीं ज्यांचा संबंध आला अशा एखाद्या बुरसटलेल्या मॅजिस्ट्रेटाकरवीं शिवरामपंतांनाही भरडून काढण्याची कुबुद्धि एखाद्या चुगलखोर साहित्यशकाराला झाली नाहीं, एवढेंच नशीब ! शिवरामपंतांवर या लेखाबद्दल साहित्यांतील कृमिकीटकांनीं टीका केली, एवढेंच नव्हे तर नेहमींच्या त्यांच्या बैठकीत मनोविनोदनार्थ बसणाऱ्या स्नेह्यांनींही हल्ला चढविण्यास कमी केलें नाहीं. श्री. वामनराव परांजपे याबद्दल त्यांच्या चरित्रांत एक आठवण देतात. "त्यांचे समवयस्क स्नेही गोविंदसुत (परशुरामपंत चिंचाळकर) त्यांना थट्टेनें म्हणाले, 'या वयांतही असले शृंगारिक लेख लिहिणें तुम्हांस शोभतें काय ?' यावर शिवरामपंतांनीं लागलीच उत्तर दिलें, 'एकूण तुम्हींही या वयांत असले लेख वाचतां हें तरी ठीक आहे का ?" शृंगारिक चित्रांतल्या अभिप्रेत भावना उलगडून दाखविण्यांत न शोभण्यासारखें काय आहे ? देशभक्ताच्या अंतःकरणांत शृंगाराची भावना असणें हेंच पाप आहे असें मानणाऱ्या लब्धप्रतिष्ठितांच्या बेजबाबदार टीकेला उत्तर तें काय द्यावयाचें ? श्री. वामनराव परांजपे यांनाही आपल्या आजोबांनीं हा लेख लिहिला हें ठीक केलें नाहीं असें

अंधुकपणें वाटत असावेंसें दिसतें. प्रणयिनीचा मनोभंग हा एक अतिमार्मिक चिकित्सक टीकालेख आहे अशी प्रस्तावना करून तें म्हणतात कीं "तो 'शृंगारिक समजून' त्यावर टीका झाली; वस्तुतः त्या रम्य लेखांत त्यांच्या विदग्ध रसिकतेनें मधून मधून डोकें वर काढलें होतें, यांत संशय नाहीं. तथापि या चित्रामध्यें शृंगारापेक्षां विरहजनित कारुण्यच अधिक चित्रित केलेले आहे." आणि याचा पुरावा म्हणून त्यांच्या लेखांतील दुर्दैवाबद्दलच्या शेवटच्या ओळी ते ऊद्धृत करतात! श्री. वामनराव विद्वान् आहेत, रसिकही आहेत आणि चांगले वकीलही आहेत. असले लगडे समर्थन त्यांनीं आजवर केले नसेल. राजकारणांत भाग घेणाऱ्या एका वकीलावर एकदां राजकीय खटला झाला. राजकारणांत मुरलेले एक वकील त्यांच्या बचावार्थ देण्यांत आले. त्यांनीं बचावाचा बनाव असा कांहीं रचला, कीं त्यामुळे खटल्यांतून कदाचित् आरोपीची सुटका झालीच तर त्याच्या मनांतील व कृतींतील प्रामाणिकपणाबद्दल हमखास संशय उत्पन्न व्हावा. नतर आरोपीनें बचावाच्या वकीलांचे वकीलपत्र रद्द करून आपली अब्रू बचावली, हा भाग वेगळा. शिवरामपतांचा असा बचाव मांडण्याची बुद्धि त्यांच्या चरित्र लेखकाला व्हावी हें जितकें दुर्दैवी तितकेच करुण आहे. पतांचा लेख उघड उघड शृंगारिक आहे. त्यांना करुण रसाचाच विस्तार करावयाचा असतां तर रविवर्म्याच्या अशोकवनांतील सीतेचे वर्णन त्यांनीं केलें असतें; कीं ते चित्र त्यांना उपलब्ध नव्हतें? कीं प्रणयिनीचा मनोभंग ह्याच चित्राचे विश्लेषण करावयाची कामगिरी कोणी त्यांच्यावर लादली होती? अश्लीलतेप्रमाणेंच शृंगारिक लेख लिहिण्यांतही पाप आहे, अशी पुसट जाणीव वरील समर्थनाच्या बुडाशीं आहे, आणि याला कारण म्हणजे महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाची विशिष्ट मनोवृत्ति हेंच होय. शिवरामपंतांवर झालेली टीका जशी पोचट होती तसेंच हें समर्थनही असमर्थनीय आहे.

शिवरामपंतांचा हा लेख म्हणजे रस्त्यानें जातां जातां दिसलेल्या स्त्रीकडे पाहून टारगटांच्या चौकडींत निघालेल्या उद्‌गारांसारखा नाहीं. या लेखांतील शृंगार अभिजात आहे, उत्तान नाहीं. लेखाचे आरंभीं ते स्वतःला अमर्मज्ञ व अनभिज्ञ म्हणवून घेतात; लेख वाचल्यावर मात्र त्यांच्या मर्मज्ञतेबद्दल खात्री पटते. हा लेख त्यांनीं मर्मज्ञ वाचकांना सादर केलेला आहे. शृंगाराचे पर्यवसान संभोगांतच व्हावयाचें हें उघड आहे. अभिजात शृंगारांत संभोगाची सूचना

असते, तपशील नसतो. उत्तान शृंगारांत प्रत्यक्ष संभोग हाच वर्ण्यविषय असतो. अश्लील लिखाणांत अनैतिक व उत्तान शृंगाराकडे प्रत्यक्ष प्रोत्साहन असावें लागतें. अशा कांहीं मर्यादा घातल्या नाहींत तर कोणतीही प्रणयकथा अगर लैंगिक चर्चा अश्लील ठरेल. राजद्रोहाबद्दल न्यायाधीशापेक्षां कोतवालाच्या कल्पना अधिक व्यापक असतात. वाङ्मयांत मात्र कोणीही कोतवाली करून कोणावरही अश्लीलतेचा आरोप करावा व तो जनता-जनार्दनापुढें शाबीत झाल्याची ग्वाही द्यावी. कारण जो तो स्वयंभू न्यायाधीश !

ह्या लेखाबाबत शिवरामपंतांवर टीका झाली नसती व महाराष्ट्रांतील मर्मज्ञ वाचकांच्या विवेकबुद्धीच्या निर्णयावर हा विषय सोंपविण्यांत आला असता तर हें प्रास्ताविक विवेचनही इतकें लांबलें नसतें.

**शाकुंतल**

टिळक राजकारणांत पडले नसते तर ते गणिताचे अगर प्राच्यविद्येचे प्राध्यापक झाले असते, असें सांगण्यांत येतें. त्यांचें राजकारण विफल होतें आणि ते राजकारणांत पडल्यामुळें त्यांची विद्वता व व्यासंग यांचा स्वदेशाला व्हावा तितका उपयोग झाला नाहीं, हें ध्वनित करण्यासाठीं त्यांच्या राजकीय शत्रूंकडूनही वरील सूचनेचा पुरस्कार करण्यांत येतो. केळकर राजकारणांत न पडते तर साताऱ्यास चांगल्या वकीलांपैकीं एक गणले गेले असते अथवा वरिष्ठ दर्जाचे न्यायाधीश म्हणून सेवानिवृत्त होऊन पुण्यास बंगला बांधून राहिले असते; अर्थात साहित्यसेवा त्यांनीं केलीच असती असें सांगण्यांत येते, तें अशाच बुद्धीनें. संस्कृतचे प्राध्यापक म्हणून पुण्याच्या महाराष्ट्र कॉलेजमध्यें शिवरामपंतांनीं कांहीं वर्षें काम केलें, फावल्या वेळांत पुराणें सांगितलीं व तीं ऐकण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत असत. भांडारकरांची त्यांच्यावर फार मर्जी होती आणि पंतांनीं होकार दिला असता तर ते एखाद्या सरकारी महाविद्यालयांत मोठ्या पगारावर संस्कृतचे प्रोफेसर म्हणून लागले असते. कदाचित ही लागण संस्कृत वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना व संशोधनाला उपकारक ठरली असती; कदाचित् पहिल्या तारखेला पगार मिळत गेल्यामुळें बुद्धीला मांद्य येऊन इतर महाराष्ट्रीय विद्वान प्राध्यापकांप्रमाणें ब्रिज खेळण्यांत त्यांचें आयुष्य गेलें असतें. प्राध्यापक नसतांना परशराम कॉलेजमध्यें 'शाकुन्तलांतील सौंदर्यस्थळें' या विषयावर त्यांनीं दिलेल्या व्याख्यानाविषयीं आचार्य भागवत यांचे उद्गार प्रसिद्ध झाले

आहेत. रसिकतेच्या दृष्टीनें त्यांच्या भाषणाचा दर्जा रवींद्रनाथ ठाकूर व अरविंद घोष यांच्या लेखांइतका उच्च असल्याची ग्वाही आचार्यांनीं दिली आहे. या संग्रहांत समाविष्ट करण्यांत आलेल्या शाकुंतलावरील दोन लेखांवरून शिवरामपंतांचे पाण्डित्य, सूक्ष्म दृष्टि, उदात्त विचारसरणी यांचा प्रत्यय येतो.

"कालिदासानें न लिहिलेलें नाटक" या लेखांत पंतांनीं शाकुंतलांतील लुप्ताक्षरव्यूह सोडवून दाखविला आहे. दुर्वासाच्या शापाचें महत्त्व कथानकाच्या दृष्टीनें किती मोठें आहे हें विशद करून हा शापाचा प्रसंग साहित्यशास्त्राच्या दृष्टीनें सदोष आहे असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. कारण कथावस्तूचा परिपोष दैवी चमत्कारावर अवलंबून ठेवणें हें तत्र आधुनिक साहित्यशास्त्राला समत नाहीं. दुर्वासाचा शाप व त्याची निवृत्ति हा भाग महाभारतांतील मूळ कथेंत नाहीं. हा काल्पनिक वृत्तांत कालिदासानें निर्माण केला आहे. हा शाप सयुक्तिक ठरत नाहीं आणि म्हणून शाकुन्तलांतील पुढील सौंदर्य मनोहर असलें व तें या शापाच्या प्रसंगांतूनच निर्माण होणारें असलें तरी हा दोषच आहे हें नाकारतां येणार नाहीं, अशी शिवरामपंतांची विचारसरणी आहे. सर्वसाधारण जीवनक्रमांत सहसा न घडणाऱ्या व ज्यांचा उलगडा कार्यकारणभावानुसार करतां येत नाहीं, अशा प्रसंगांना चमत्कार म्हणतात. दुर्वासाच्या शापामुळें शकुन्तलेचें दुर्दैव ओढवलें व दुष्यंताला स्मृतिभ्रंश झाला, हा चमत्कार तर खराच; आणि कथावस्तूच्या परिपोषाच्या आधुनिक सिद्धान्तांचें ज्यांनीं अगोदरच ग्रहण केलेलें आहे अशा वाचकांना या प्रसंगाच्या वेळीं जरा खटकल्यासारखें, ओरखडल्यासारखें वाटते, हेंही निर्विवाद आहे. पण याच वाचकांना रॅंडम हार्व्हेस्टमधील स्फोटामुळें झालेला स्मृतिभ्रंश समर्थनीय वाटतो; कारण तो दृश्य पदार्थाच्या संघर्षणानें झालेला असतो; आणि असें होतें हें रोज चाललेल्या अग्निगोलांच्या वर्षावामुळें सर्वांना ठाऊक असतें. कालिदासाच्या काळांत शापाचें सामर्थ्य सर्वसमत होतें शाकुंतलांतील शापाचा प्रसंग कल्पित तर खराच—पण कथानकाचा महाभारतांतील आराखडा माहीत असणाऱ्या त्या वेळच्या प्रेक्षकांना ही कल्पित घटना किती अकल्पित वाटली असेल, त्यांनी कालिदासाचें किती कौतुक केलें असेल, याची आतां कल्पनाही करतां येणार नाहीं. आधुनिक साहित्यशास्त्राचे नियम प्राचीन वाङ्मयाला लावणें योग्य होणार नाहीं. दुष्यंत—शकुंतला, विश्वामित्र—मेनका, कण्व, दुर्वास, इंद्र वगैरे शाकुंतलांतील पात्रांच्या भोंवतीं

असलेलें अद्भुत वातावरण काढून टाकून आपण कथानकाला मानवी जीवनाचे नियम लावले तर अनवस्था प्रसंग उद्भवेल. मेनका ही इंद्र राजाची रखेली; प्राध्यापक विश्वामित्र याचा पाणउतारा करण्याची कामगिरी तिला इंद्रानें सांगितली व ती तिनें बजावली. त्यांची बेवारशी मुलगी प्राध्यापक कण्वाला सांपडली. उन्हाळ्याच्या सुटींत तिला बरोबर घेऊन कण्व गुरूजी महाबळे-श्वराला गेले; तेथें संस्थानिक दुष्यंतानें तिला गटवलें. पुढील कथाभाग सगळाच बदलावा लागेल. नोटिसा, फिर्यादी, अंगठीचा पुरावा, पोलिटिकल एजटकडे अर्ज वगैरे अनेक लफडीं आधुनिक शाकुंतलांत येतील. करुण रसा-ऐवजीं बीभत्स रस उत्पन्न होईल. असें कथानक मानवी जीवनाशीं समांतर राहिलें तरी त्यांतील बहुतेक खुमारी नष्ट होईल. ह्या विवेचनावरून दिसून येईल, कीं कालिदासानें अद्भुताचा उपयोग अत्यंत संयमानें व कौशल्यानें केलेला असून त्यामुळें कथावस्तु सदोष झालेली नाहीं, इतकेंच नव्हे तर पात्रांभोंवतालचें अद्भुत वातावरण स्थिर होण्यास मदत झालेली आहे; आणि असेंही दिसून येईल, कीं आधुनिक जीवनाचे अथवा साहित्याचे नियम प्राचीन कथावस्तूनां बेताबेतानेंच लावले पाहिजेत. असो.

शाकुंतलाच्या पांचव्या अंकांतील एका श्लोकाचें विवरण शिवरामपंतांनीं असें केलें आहे कीं, जणूं महाविद्यालयांत संस्कृतचे अध्यापक प्रौढ विद्यर्थ्यांना ह्या विषय व्याख्यानांतून समजावून देत आहेत. दुर्दैवानें महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना अशा दर्जाचे प्राध्यापक मिळत नाहींत, ही गोष्ट अलाहिदा.

**यशापयश**

शिवरामपंतांनीं काळपत्र सुमारें दहा वर्षे चालविलें. महाराष्ट्रांतील दह-शतवादी चळवळीचा उगम व अंत याच काळांत झाला. गणेशखिंडींत रँडचा खून १८९७ मध्ये झाला आणि काळपत्र १८९८ सालीं निघालें. नाशिक येथे जॅक्सनचा खून १९०९ मध्यें झाला आणि पंतांना राजद्रोहाबद्दल १९०८ सालीं शिक्षा झाली. नाशिकच्या कटानतर दहशतवाद्यांची संघटना निदान महाराष्ट्रांत तरी पुन्हां झाली नाहीं. या कटाच्या खटल्याचा निकाल होण्यापूर्वीच पंतांची शिक्षा संपून ते पुण्यास परत आले होते. १९१४ सालीं टिळक सुटून परत आले, तोंपर्यंत पंतांनीं राजकारणांत विशेष भाग घेतला नाहीं. टिळकांच्या स्वराज्याच्या चळवळीशींही ते समरस झाले नाहींत.

असहकारितेच्या चळवळींत ते सामील झाले ते तींत त्यांना क्रांतीचीं बीजें दिसलीं म्हणून. अहिंसेचें तत्त्व त्यांनीं केवळ हंगामी धोरण म्हणून स्वीकारले होते. पंतांनीं ज्या तत्त्वप्रणालीचा व संघटनेचा पुरस्कार केला त्या त्यांच्या डोळ्यांदेखत नामशेष झाल्या. त्यांचें वक्तृत्व व लेखन भावनाप्रधान असलें तरी त्यांचा पिंड बुद्धिप्रधान होता. दहशतवादाचीं रम्य कल्पनाचित्रें त्यांनीं रंगविलीं व त्यांनीं एक पिढी मंत्रमुग्ध झाली; पण होमकुंड पेटवलें तेव्हां इंधन कमी पडल्यामुळे यज्ञ पुरा होण्यापूर्वींच आग विझून गेली. त्यांचें नेतृत्व विफल झालें व अनुयायित्व सफल झालें नाहीं. टिळकांवर झालेल्या खटल्याच्या निकालावरून हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीचा कोणता भाग त्यांचा हें निश्चितपणें सांगतां येतें. सरकारबद्दल प्रीतीचा अभाव म्हणजे अप्रीती अशा मुद्यावर टिळकांना राजद्रोहाबद्दल १८९७ सालीं शिक्षा झाली; अधिकाऱ्यांनीं प्रजेचा अंत पाहिल्यामुळें बाँब गोळे उडतात व देशाचें दुर्दैव ओढवतें, हें सात्त्विक प्रतिपादन राजद्रोही ठरून त्यांना १९०८ सालीं शिक्षा झाली. स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तें मी मिळविणारच ही घोषणा मात्र १९१८ सालीं पूर्णपणें सनदशीर ठरली. एवढी राजकीय प्रगति तरी निश्चितपणें टिळकांच्या अंगीं लावतां येतें. टिळकांच्या कार्याचा आधार होता म्हणून महात्माजींच्या चळवळींत राष्ट्राला क्रांतीची बीजें दिसलीं. टिळकांनीं आपल्या जीवनाचा तात्त्विक निष्कर्ष गीता-रहस्यांत अनुस्यूत केला आहे. शिवरामपंत त्यांच्या तोडीचे विद्वान व तत्त्वज्ञ–पण भविष्य काळावर चिरस्थायी ठसा राहील अशी तत्त्वप्रणाली त्यांनीं मागें ठेवली नाहीं. त्यांचे लेख हा त्यांच्या विचारसृष्टींतील एक अंश मात्र आहे. राजद्रोहाचे विष आतांपर्यंत आम्ही इतकें प्यालों आहोंत कीं, त्यांच्या लेखांतील विषबीजांचा तत्कालीन वाचकांवर कसा परिणाम होऊं शकला हेंही आपणास कदाचित् समजणार नाहीं. म्हणून अखेरीस एवढेच सांगावयाचे कीं, वाचकांनीं आजच्या दृष्टीनें या लेखांकडे पाहूं नये, तत्कालीन परिस्थिति कल्पून त्यांकडे पहावें, म्हणजे त्यांतील खरी खुमारी कळेल.

—स. आ. जोगळेकर



दुखण्यांनी आणि हारांनीं भारावलेले,
बेळगांव साहित्य संमेनलाचे अध्यक्ष-शिवरामपंत परांजपे.

बेळगांव येथें १९२९ साली भरलेल्या चौदाव्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष म्हणून दिलेले व्याख्यान.

सभ्य गृहस्थ हो, आपण मला या चौदाव्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद दिलें, याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. आपल्या या कृपेबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें हे जें माझें पहिलें कर्तव्यकर्म तें करून झाल्यानंतर याच्या पुढील कार्याकडे मी आपल्या परवानगीनें वळतों महाराष्ट्र साहित्याच्या संबंधाचें हें चौदावें समेलन आहे. याच्यापूर्वी अशा प्रकारचीं तेरा समेलनें होऊन गेलेलीं आहेत. या मागील तेरा संमेलनांच्या इतिहासाच्या पायावरच आपल्याला या चौदाव्या संमेलनाची इमारत उभारावयाची आहे परंतु या तेरा संमेलनांपैकीं पहिल्या कांही कांही संमेलनांचा इतिहास फारसा पूर्णत्वाने आज उपलब्ध होऊं शकत नाहीं.

## पूर्व इतिहास

असें दिसतें कीं, इ स. १८८५ सालीं पुणें येथील कै० माधवराव रानडे वगैरे त्या वेळच्या प्रमुख मंडळींच्या मनामध्यें साहित्यसंमेलनाची पहिली कल्पना येऊन त्याप्रमाणें त्या सालीं पुणें येथेंच साहित्यसंमेलनाचें पहिलें अधिवेशन भरविण्यांत आले. जुनें पेशव्यांचें दप्तर तपासणें, नवीन ग्रंथ मराठीत तयार करणें, इग्रजीतील चांगल्या ग्रंथांचीं भाषांतरें करविणें, वगैरेसारखे उद्देश या पहिल्या संमेलनामध्यें ध्येय म्हणून पुढें मांडण्यांत आले. व त्या वेळीं कै० माधवरावजी रानडे यांच्यासारख्या महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं ज्या ध्येयभूत बीजाचें समारोपण केलें, त्यांना कशीं सुंदर फळें येऊं लागलेलीं आहेत, हे हल्लीं आपल्याला प्रत्यक्ष अनुभवानें पाहावयाला सांपडत आहे. आपल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाच्या आद्यप्रवर्तकत्वाचें

श्रेय तर कै० रानडे यांच्याकडे आहेच; पण हल्ली निरनिराळ्या भाषांचीं जीं समेलनें भरत आहेत, त्याच्यापैकी बहुतेकांच्या मुळाशी आपल्या महाराष्ट्र संमेलनाची कल्पनाच कारणीभूत झालेली आहे, हें आपण विसरतां कामा नये. कै० रानडे यांनी त्या वेळी विधायक आणि राष्ट्रसंवर्धक अशा स्वरूपाच्या ज्या अनेक गोष्टीच्या सुरवाती करून दिल्या, त्याबद्दल व त्यांच्या त्या राष्ट्रसंवर्धिनी दूरदृष्टीबद्दल आणि बुद्धिमत्तेबद्दल हल्लीच्या पिढीनें पूर्णपणे उतराई होणे फार कठिण आहे. असो. त्यानंतरचें दुसरें संमेलन १९०६ साली साताऱ्यास श्री. रा. रा. दादासाहेब करंदीकर यांचे अध्यक्षतेखाली भरलें. यानंतरचे तिसरें संमेलन फिरून पुण्यासच कै० गोविंद वासुदेव कानिटकर यांच्या अध्यक्षतेखाली भरून मुबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेचा प्रवेश करविणे, ऐतिहासिक व वाङमयात्मक लेखांचा सग्रह करणें, इतिहाससंशोधनास व्यवस्थित स्वरूप देणें, शिलालेखांचें वाचन करणे, मराठी कवीची काव्यें प्रकाशित करणें, मराठीत एन्सायक्लोपीडियासारखे ज्ञानकोश तयार करविणें, वगैरेसारख्या विषयांची चर्चा करण्यांत आली.

## साहित्यपरिषदेची स्थापना

परतु ही साहित्यसमेलनें जरी अशा रीतीनें पुणें, सातारा, वगैरे ठिकाणी भरत होती, तरी तीं स्वभावतःच अस्थिर आणि फिरतीं अशीं असल्यामुळें त्यांच्या त्या संचाराला काही तरी कायमचें स्वरूप येण्याकरितां व त्यांच्यावर एकसूत्रबद्धतेचें कांही तरी नियंत्रण असण्याकरितां या वेळीं साहित्यपरिषद् या नांवाची एक मध्यवर्ती स्वरूपाची अशी कायमची संस्था स्थापन करण्यांत आली. परंतु या संस्थेचा कायमपणा कित्येक वर्षेंपर्यंत साहित्यसंमेलनांच्याप्रमाणेच कायम होऊं शकला नाही. परंतु बडोद्यास १९०९ सालीं भरलेल्या संमेलनांत नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट १९१२ सालीं अकोल्याच्या संमेलनांत मंजूर होऊन साहित्यपरिषदेची पुनर्घटना सर्वांकडून मान्य करण्यांत आली. व त्यानंतर १९१७ साली इंदुरास झालेल्या संमेलनाच्या प्रसगी श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर यांच्याकडून दहा हजार रुपयांची रक्कम या साहित्यपरिषदेच्या मदतीदाखल मिळून तेथपासून या मध्यवर्ती संस्थेला बरेंच महत्त्व आणि व्यवस्थितपणा प्राप्त झालेला

आहे. शिवाय या संस्थेचें 'महाराष्ट्र साहित्य-पत्रिका' या नांवाचें एक मुखपत्र असून शके १८५० च्या चैत्र शुद्ध १ पासून सुप्रसिद्ध वाङ्मयसेवक श्रीयुत रा. रा. नारायण गोंविद चापेकर, यांच्या व्यवस्थेशीर संपादकत्वाखालीं तें त्रैमासिकाच्या स्वरूपांत नियमित रीतीनें प्रसिद्ध होत असतें. त्यांतील विषयांची निवड, लेखकांची विद्वत्ता आणि प्रतिपादनांतील प्रौढता, यांच्या योगानें साहित्यपरिषदेच्या कार्यांत चांगलीच भर पडत आहे, ही मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे.

## संमेलनें ३ ते १३

तिसरें साहित्यसंमेलन पुण्यास झाल्याचा इतिहास पूर्वीं सांगण्यांत आलेलाच आहे. त्यानंतर १९०७ साली कै० विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या अध्यक्षतेखाली चौथें संमेलन आणि १९०८ साली रा. रा. चिंतामणराव वैद्य यांच्या अध्यक्षतेखालीं पांचवें संमेलन, अशीं हीं दोन्ही संमेलनें पुण्यासच भरलीं. यानंतर त्याच्याच पुढल्या वर्षीं, म्हणजे १९०९ सालीं, कै० कीर्तिकर यांच्या अध्यक्षतेखालीं बडोदे येथें सहावें समेलन झालें. त्यानंतर तीन वर्षांनीं १९१२ सालीं अकोले येथें सातवें संमेलन भरलें व आणखी तीन वर्षांनीं १९१५ सालीं मुबई येथे आठवें संमेलन भरण्याचा योग आला. पुढें दोन वर्षांनी १९१७ सालीं इंदूरला नववें संमेलन भरलें आणि नंतर फिरून मध्यंतरीं चार वर्षे जाऊन १९२१ सालीं बडोद्यानें दहावें संमेलन बोलाविलें. पण बडोद्याहून अकरावें संमेलन १९२६ सालीं मुबईस येण्याला पांच वर्षे लागली. परंतु याच्यापुढें मात्र दरसाल संमेलनें भरत जाऊन १९२७ सालीं पुण्यास बारावें आणि १९२८ साली ग्वाल्हेरास तेरावें हीं संमेलनें नियमितपणें भरलीं. सातव्या समेलनापासून तों तेराव्या संमेलनापर्यंतचे अध्यक्ष कै० हरिभाऊ आपटे, श्री. बाळासाहेब पटवर्धन, कै० गणेश जनार्दन अगाशे, श्री. नरसोपंत केळकर, सरदार माधवराव किबे, श्री. श्री. कृ. कोल्हटकर व श्री. माधवराव अणे याप्रमाणें अनुक्रमानें होते.

या तेरा संमेलनांपैकीं पहिलें आणि दुसरें यांच्या दरम्यानचें वीस वर्षांचें अंतर सोडून दिलें, तर १९०६ पासून १९०९ पर्यंतचीं संमेलनें नियमितपणें भरत गेलीं. पण याच्यापुढील सतरा वर्षांच्या अवधीमध्यें हीं

संमेलनें भरविण्याच्या बाबतींत अतिशय अनिश्चितपणा उत्पन्न झाल्याचें आढळून येतें. कदाचित् १९०९ सालापासून महाराष्ट्रांत जो एक विलक्षण राजकीय परिस्थिति उत्पन्न झालेली होती, त्याचाही असा हा परिणाम झाला असेल. पण तें कांहीही असलें, तरी १९२६ पासून आतां फिरून हीं समेलनें सालोसाल नियमितपणें भरूं लागलीं आहेत, हो समाधानाची गोष्ट आहे. व यावरून या कार्याविषयीची लोकांमधील आस्था आणि अभिरुचि व्यक्त होत आहे.

हा या संमेलनांच्या संबंधीचा कालाच्या दृष्टीनें विचार झाला. त्याचप्रमाणें स्थलाच्या दृष्टीनेंही या संमेलनांकडे आपणांला पाहतां येण्यासारखे आहे. संमेलनाच्या एकंदर तेरा स्थळांपैकी पुण्यानें पांच वेळां, मुंबईनें दोन वेळां आणि बडोद्यानें दोन वेळां, ही संमेलनें भरविलीं आहेत. मराठी भाषा बोलणाऱ्या संस्थानांच्या दृष्टीनें पाहिलें, तर बडोदें, इंदूर आणि ग्वाल्हेर, या संस्थानांनीं हीं संमेलनें बोलावण्यांत भाग घेतला, आणि पूर्वीच्या पेशवाईच्या वेळच्या राजकारणांतील मराठा कॉन्फिडरसीप्रमाणें हल्लींच्याही या वाङ्मयविषयक मराठी कॉन्फिडरसीमधील आपआपलीं कर्तव्यें करण्याला हीं प्रमुख संस्थानें आज पुढें येत आहेत, ही गोष्ट अभिनंदनीय आहे. आणि अकोल्यानें या संमेलनाला एकदां आपल्या घरी प्रेमाचें आमंत्रण देऊन वऱ्हाडचें महाराष्ट्राशीं असलेलें आपलें जुनें जिव्हाळ्याचें नातें प्रस्थापित केलें आहे, या बंधुभावाबद्दल वऱ्हाडच्या संबंधानें कोणाला अभिमान वाटणार नाहीं

## संमेलनें भरविण्यांतील हेतु

ही जी या तेरा संमेलनांची त्रेचळीस वर्षांची हकीकत वर दिलेली आहे, त्यांत त्या त्या संमेलनांचे समग्र ठराव येथें थोडक्यांत देणें शक्य नाहीं. तरी पण पहिल्या संमेलनांतील माधवराव रानडे आणि तेराव्या संमेलनांतील माधवराव अणे या दोन टोकांच्या दोन माधवरावांच्या कक्षेमध्यें सांपडलेल्या सर्व ठरावांचा मथितार्थ आणि मुख्य हेतु म्हटला, तर तो आपल्या मराठी भाषेची अभिवृद्धि करणें हाच होय, हें उघड आहे. आपल्या भाषावृद्धीचे निरनिराळ्या लोकांकडून वैयक्तिक प्रयत्न चाललेलेच असतात. परंतु त्या भिन्नभिन्न प्रयत्नांचें एकीकरण व्हावें, त्यांच्यांत एकसूत्रीपणा उत्पन्न व्हावा आणि त्यांना हल्लींच्या आपल्या राष्ट्रीय आकांक्षांच्या दृष्टीनें सुसंघटित

स्वरूप यावें, हाच मुख्यत्वेंकरून असलीं सामुदायिक संमेलनें भरविण्यांतील मुख्य हेतु असतो. आतां भाषाभिवृद्धि हाच जर मुख्य हेतु असेल, तर ती भाषेची अभिवृद्धि दोन प्रकारांनीं होत असते, हें उघड आहे. ते दोन प्रकार म्हणजे एक नैसर्गिक व दुसरा कृत्रिम. यांत नैसर्गिक प्रकार हाच खरा महत्त्वाचा होय; आणि कृत्रिम प्रकार हे फक्त त्या निसर्गाला केवळ मदत करण्याकरितां म्हणूनच उपयोजावयाचे असतात. मेघोदरांतून पाऊसच पडला नाहीं, तर त्या पावसाचें पाणी सांचवावयाचें कोठलें आणि त्याचे कालवे बांधून त्यांच्या योगानें शेतें सुपीक करावयाचीं कशी? सारांश, निसर्गाच्या अनुकूलतेवरच मानवी प्राण्याच्या कृत्रिम उपायांची सगळी धडपड चालली असते. भाषेची वाढ ही निसर्गाच्या नियमाप्रमाणें आपोआपच होत असते. 'देवीं वाचमजनयन्त देवाः' या मंत्रांत म्हटल्याप्रमाणें परमेश्वरानें वाचाशक्ति निर्माण करून दिल्यापासून स्थलकालादिकांच्या भेदानुसार निरनिराळे लोक आपापल्या निरनिराळ्या भाषा बोलू लागलेले आहेत; आणि त्या भाषांच्या द्वारानें सर्व लोक आपापले नित्याचे लौकिक व्यवहार साध्य करून घेत आलेले आहेत. पण आहारनिद्रादिक क्षुद्र लौकिक व्यवहार साध्य करून घेणें, एवढ्यानेंच कांहीं वाग्देवतेच्या निर्मितीची इतिकर्तव्यता संपते असें कोणीही समंजस मनुष्य समजणार नाहीं. वाग्देवतेच्या प्रसादानें निर्माण होणाऱ्या वाङमयाचें कर्तव्यक्षेत्र याच्यापेक्षां किती तरी विस्तृत, विशुद्ध आणि वैदग्ध्ययुक्त असें आहे. आणि येथेंच मनुष्याच्या कृत्रिम उपायांच्या योजनेला या विषयामध्यें प्रवेश पावण्याला अवकाश सांपडतो.

## भाषाभिवृध्दीचें एक साधन—वाढती लोकसंख्या

व्यवहार आणि विचारविनिमय हेतु सिद्धीस नेण्याकरितां पृथ्वीच्या पाठीवर आतांपर्यंत किती भाषा निर्माण झाल्या असतील आणि किती लयाला गेल्या असतील, याचा कोणत्याही इतिहासाला आणि कोणत्याही प्राचीन आंकडेशास्त्राला अद्यापि पत्ता लागलेला नाहीं. फार काय, पण हल्लीं पृथ्वीच्या पाठीवर ज्या अनेक भाषा बोलल्या जात आहेत, त्यांचेंही परिसंख्यान करणें अशक्य आहे. पण त्या भाषा रानटी लोकांच्या असोत किंवा सुधारलेल्या लोकांच्या असोत, त्या भाषा बोलणारांपैकीं प्रत्येकाला त्या आपापल्या भाषेचा मोठा अभिमान वाटत असतो. सर्वच भाषा देवानें

दिलेल्या कंठांतून निघून देवानें दिलेल्या जिव्हेच्या द्वारानें अभिव्यक्त होत असतात, अशी जरी वास्तविक स्थिति आहे, तरी माझी भाषा तेवढी देव-भाषा आहे, देव माझ्याच भाषेत बोलत असतात आणि नंदनवनांतील देवांगना माझ्या भाषेंतच आपली गाणीं गात असतात, अशी लोक आपल्या भाषेबद्दल प्रौढी मिरवूं लागतात. ते आपल्या भाषेला मातृभाषा असें नांव देऊन तिला मातृवत् पूज्य मानू लागतात; आणि जगाच्या प्रारंभापासून आपले पूर्वज या भाषेत बोलत आले आणि जगाच्या अंतापर्यंत आपलें वंशज याच भाषेत बोलत राहणार, अशा स्वतःच्या भाषेबद्दल स्वाभिमान-मूलक कल्पना त्यांच्या डोक्यांत प्रसव पावू लागतात. अशा निरनिराळ्या प्रकारच्या कल्पनांनीं आणि कारणांनीं मनुष्याच्या मनांत आपल्या भाषेच्या-बद्दल अभिमान उत्पन्न झाला, म्हणजे मग त्या भाषेची अभिवृद्धि कशी होईल, याच्याबद्दल त्याच्या मनात सहजच पुढें विचार उत्पन्न होऊ लागतात. पण कोणत्याही भाषेची अभिवृद्धि कशी होईल, या प्रश्नाबद्दलचें अगदीं पहिलें आणि अगदीं साधे उत्तर असें आहे कीं, जितके त्या भाषेचे बोलणारे जास्त, तितकी त्या भाषेची अभिवृद्धि जास्त. म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें झाले, तर भाषेची अभिवृद्धि ही त्या भाषेतील लोकसंख्येवरून अजमावली जाते. पण अशा लोकांची संख्या वाढणें हें देखील फिरून थोड्याबहुत अंशानें निसर्गावरच अवलंबून राहतें. अशा स्थितीमध्यें एखादी विशिष्ट भाषा बोल-णाऱ्या लोकांची संख्या वाढविण्याला नैसर्गिक मार्गाशिवाय कांही कृत्रिम साधनें उपयोगांत आणता येतात किंवा नाही, असा प्रश्न आपल्यापुढें विचारा-करितां उपस्थित होतो.

## इतर साधनें—राज्याभिवृद्धीनें भाषाभिवृद्धि

या प्रश्नाच्या समाधानाकरितां आपण जगाच्या इतिहासाची पानें चाळू लागलों, तर त्यांत आपल्याला असें आढळून येते कीं, राज्याभिवृद्धीनें पुष्कळ वेळां भाषाभिवृद्धि होत असते. रोमन लोकांच्या प्रजासत्तात्मक राज्यांतील आणि साम्राज्यांतील योद्धे जिकडे जिकडे प्रांत काबीज करीत गेले, तिकडे तिकडे त्यांची लॅटिन भाषा त्यांच्या पाठीमागून गेली; आणि युरोप खंडांतील बहुतेक देशांतील सुप्रबुद्ध लोकांमध्यें थोड्या शतकांपूर्वीं त्याच लॅटिन भाषेचा जिकडे तिकडे अत्यंत प्रसार झालेला होता. हल्लीच्या

इंग्लिश भाषेचीही तशीच गोष्ट झालेली आहे. इंग्लिशांनी जे जे मुलूख आपल्या तागडीच्या जोरावर काबीज केले, आणि जे जे त्यांनी आपल्या वसाहतीनीं वसविले आणि व्यापारानीं वाढविले, तेथें तेथें इंग्लिश बोलणाऱ्या लोकांची संख्या आज जर पुष्कळ वाढली असली तर त्यांची राज्याभिवृद्धि हेंच त्यांच्या भाषाभिवृद्धीचें एक प्रमुख आणि प्रबळ कारण आहे, असें म्हणण्यास कांही प्रत्यवाय दिसत नाही हल्ली सगळ्या जगांतील इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या अकरा आणि बारा कोटि यांच्या दरम्यान आहे. व इतकी मोठी संख्या दुसरी कोणतीही भाषा बोलणाऱ्या लोकांची नाही. अथवा इतरांची उदाहरणें कशाला पाहिजेत? आपल्या मराठी भाषेचीच गोष्ट आपण घेतली, तर तेथेंही आपल्याला वरील सिद्धांताचें प्रत्यंतर दृष्टोत्पत्तीस येतें. मराठी भाषा ही वास्तविक पाहिलें असतां मूळची फक्त महाराष्ट्राची भाषा. पण ती आज मद्रासेंतील तंजावरांत, गुजराथेंतील बडोद्यांत, गोंडवनांतील नागपुरांत आणि उत्तर हिंदुस्थांतील धार, देवास, इंदूर, ग्वाल्हेर, सागर, झांशी, इत्यादि ठिकाणी जी बोलली जात आहे, त्याचें कारण काय? मद्रास इलाख्यांतील मराठीचा प्रसार अलीकडे जरी कमी झाला असला, तरी एकदां अशी एक वेळ होती कीं, ज्या वेळीं खुद्द मद्रास सरकारचे आणि दक्षिण हिंदुस्थानांतील इतरही कित्येक संस्थानांचे जमाखर्ची हिशेब मराठीमध्यें ठेवले जात असत. या सर्व ठिकाणी पूर्वीच्या शूर मराठे शिपायांनी आणि सरदारांनी आपलीं मराठी राज्यें स्थापन केलीं, म्हणूनच तेथें मराठी भाषा बोलली जात आहे, असे नव्हे काय? धनाजी जाधव आणि संताजी घोरपडे हे आपले मराठ्यांचें लष्कर आपल्याबरोबर घेऊन चंदीचदावरकडे मुलूखगिरी करीत चालले होते, त्या वेळेला ते आपल्या स्वराज्याबरोबर न कळत आपल्या स्वभाषेचाही मद्रास इलाख्यांत सोंडूर, गुत्ती तंजावर, वगैरे अनेक ठिकाणी प्रसार करीत चालले होते, हें भाषाभ्यासी लोकांनी विसरतां कामा नये. पुस्तकें लिहून भाषेचा प्रसार केला जातो, अशी अलीकडच्या इंग्रजीशाहीमध्ये एक कल्पना रूढ झालेली आहे. पण ती अगदी बरोबर आहे, असें नाही. अथवा एका निराळ्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास ती थोडीशी खरीही आहे! कारण, दक्षिणेंतून निघून हिंदुस्थानच्या उत्तरेच्या टोकापर्यंत जाणारे बाजीराव बल्लाळ, राघोबादादा, भाऊसाहेब

पेशवे, रघोजीराव भोसले, मल्हारराव होळकर, महादजी शिंदे, वगैरे लोक हेही एका दृष्टीनें एक प्रकारचे ग्रंथकारच होते! मात्र त्यांची ग्रंथ लिहिण्याची तऱ्हा थोडी वेगळी होती! ते घोड्यावर बसून आपले घोडे भरधांव फेकीत असतां एकीकडे ते आपले ग्रंथ लिहीत असत! शत्रूच्या अंगांतील रक्त ही त्यांची शाई! त्यांच्या तरवारी या त्यांच्या लेखण्या! आणि उत्तरेकडील रणक्षेत्रे हे त्यांचे ग्रंथ लिहिण्याचे कागद! अशा सामग्रीनें त्यांनी आपले मराठी भाषेंतील विजयग्रंथ लिहून ठेविलेले आहेत! आणि या ग्रंथांच्या योगानें उत्तर हिंदुस्थानांत त्यांनीं आपल्या दक्षिणी भाषेची कायमची प्रस्थापना करून ठेविली आहे!

आपल्या मराठी भाषेनें वर सांगितल्याप्रमाणे जसे कांहीं नवीन प्रांत काबीज केले आहेत, त्याचप्रमाणें तिने आपल्या ताब्यांतील कांही जुने प्रांत आपल्या हातून घालविल्याचीही कांही उदाहरणें आपल्या या दुर्दैवी देशाच्या इतिहासामध्यें आजमितोला उपलब्ध होत आहेत. इंग्रजी भाषेनें आपल्या मराठी भाषेच्या हद्दीमध्यें केलेले अतिक्रमण तर महशूरच आहे. पण त्या-शिवाय हल्ली दक्षिण हैदराबाद या नांवानें जो प्रांत ओळखिला जात आहे, व हल्लीं जेथें मुसलमानी अमदानी चालू आहे, तो मूळचा बहुतेक प्रांत आपल्या मराठी भाषेच्या अंमलाखालील होता. वेरूळचीं लेणी, दौलताबादचा किल्ला देवगिरीच्या राजांचें राज्य, प्रतिष्ठान शहर आणि त्या बाजूचा गोदावरी नदीच्या किनाऱ्यावरील बराच मोठा भाग, या सर्व प्रदेशांतून पूर्वी एकदां आपली मराठी भाषाच बोलली जात होती. महानुभाव पंथाचें पूर्वीचें वाङ्मय, ज्ञानेश्वर महाराजांची ज्ञानेश्वरी, श्रीएकनाथ महाराजांचें एकनाथी भागवत व इतर अनेक ग्रंथ या गोष्टीची खूण म्हणून अद्यापिही तेथील अवशेष कायम आहेत. तसेंच पश्चिम किनाऱ्यावरील रत्नागिरी आणि कारवार या दोन जिल्ह्यांच्यामधील गोव्याचा प्रांत हेंहि अशाच प्रकारचें दुसरें एक उदाहरण होय. गोवें हा मराठ्यांचा मुलूख आणि गोव्यांतील भाषा ही मराठी भाषा. पण तेथें आज पोर्तुगीज भाषेने आपलें डोकें खुपसलें आहे. तरी पण या दोन्हीही प्रांतांमध्यें परकीय भाषेला न जुमानतां आपली मराठी भाषा बराच टिकाव धरून राहिली आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

## शिक्षणाचा प्रसार

येथपर्यंतच्या विवेचनावरून आपण असें पाहिलें कीं, राज्यवृद्धीनें बऱ्याच अंशी भाषेची वृद्धि होत असते. पण हा मार्ग सध्यां तरी निदान आपल्या मराठी भाषेच्या प्रसाराला मोकळा नाहीं. अशा स्थितींत दुसऱ्या उपायांचें अवलंबन करावयाचें म्हटलें, तर त्यांत शिक्षणाचा प्रसार हा एक निरुपद्रवी उपाय होय. आपण नुसत्या मुंबई इलाख्यापुरतेंच बोलावयाचें म्हटलें, तर या इलाख्यांतील एकंदर सुमारें अडीच पावणेतीन कोटि लोकसंख्येपैकीं मराठी भाषा बोलणारे लोक जवळजवळ एक कोटि निघतील. इतके लोक जरी मराठी भाषा बोलणारे असले, तरी यांतील सर्वच लोक मराठी भाषेच्या अभिवृद्धीला किंवा मराठी वाङ्मयाच्या वाढीला मदत करण्याला लायक आहेत, असें नाहीं. एक कोटि ही संख्यादेखील कांहीं थोडकी नाहीं. पण यापैकीं सुशिक्षित किंवा निदान साक्षर तरी किती आहेत यांचें प्रमाण शेंकडा आठ दहाच्या आंतच पडतें. हें प्रमाण आपण वाढविलें पाहिजे. सक्तीच्या शिक्षणाची आवश्यकता लोकांना भासूं लागली आहे. व त्याबद्दलचे जरूर ते अधिकार म्युनिसिपालिटचा आणि लोकल बोर्डें यांना देण्यांत येत आहेत. परंतु ही प्रगति फार सावकाशीनें होणारी आहे. तिच्यामध्यें त्वरितता उत्पन्न करणें आवश्यक आहे. यांतच स्त्रीशिक्षणाचाही प्रश्न समाविष्ट होतो. उच्च वर्गांतील स्त्रियांमध्यें हल्लीं स्त्रीशिक्षणाचा प्रसार फार झपाटचानें होत असून त्या योगानेंही मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या वाढीला पुष्कळ उत्तेजन मिळत आहे. स्त्रियांच्याकरितां शाळा, कॉलेजें, इतकेंच नव्हे, तर स्वतंत्र युनिव्हर्सिटीही स्थापन झाली असून सर्व प्रकारच्या परीक्षांतून स्त्रिया उत्तीर्ण होऊं लागल्या आहेत. आणि वकील, जज्ज, डॉक्टर, कौन्सिलर, वगैरे कामांवरही स्त्रिया अधिष्ठित होत आहेत. यामुळें स्त्रीशिक्षणाची होत असलेली प्रगति आपल्या भाषेच्या उत्कर्षाला पुष्कळ अंशीं कारणीभूत होईल, यांत संशय नाहीं.

## उत्कृष्ट वाङ्मय

शिक्षणाच्या प्रसारानें आपल्या मराठी भाषेचा प्रसार जास्त होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण आपल्या भाषेचा जास्त फैलाव होण्याला आणखीही एक साधन आहे. आणि तें साधन म्हटलें म्हणजे

काव्यशास्त्रामध्यें करण्यांत आला पाहिजे. हें अगदीं उघड आहे. आणि अशा दृष्टीनें पाहिलें असतां, 'जुगुप्सास्थायिभावको विण्मुत्राद्यालम्बनको दुर्गंधाद्युद्दीपितो निष्ठीवनाद्यनुभावितो ग्लान्यादिसंचारितो बीभत्सः' अशा प्रकारचें ज्याचें स्वरूप आहे, त्या मनोविकारांच्या वर्णनापासून काव्यामध्यें काय चमत्कार उत्पन्न व्हावयाचा आहे ? आणि असें जर आहे, तर असल्या मनोविकारांची रसांमध्यें परिगणना काय म्हणून केली जावी ? मनोविकार हे मानसशास्त्राच्या कक्षेमध्यें येतात आणि अलंकारशास्त्राच्याही कक्षेमध्यें येतात. परंतु हीं दोन्हीही शास्त्रें त्या मनोविकारांकडे अगदीं निरनिराळ्या दृष्टींनीं पाहत असतात. हे मनोविकार कसे उत्पन्न होतात, यांचें वर्गीकरण कोणत्या तत्त्वांवर करावें, वगैरे प्रकारची मानसशास्त्राची दृष्टि असते. मन चंचल आणि त्याचे विषय नानाविध; त्यामुळें या मनोविकारांचें कार्य-कारणत्व किंवा वर्गीकरण फार कठीण झालेलें आहे. सत्त्व, रज आणि तम, या गुणत्रयांच्या भेदामुळें नानाप्रकारचे मनोविकार उत्पन्न होतात, अशी सांख्यांची उपपत्ति आहे. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर, हे सहा प्रमुख मनोविकार म्हणून सामान्यतः मानले जातात. पण या सगळ्या वर्णनापेक्षां वैशेषिक मनांतील 'सुख, दुख, इच्छा आणि द्वेष' या चार गुणविभागांच्या निरूपणामध्यें प्रशस्तपादाचार्यांनीं आपल्या भाष्यामध्यें मनुष्यांच्या मनोविकारांचें जें वर्गीकरण केलें आहे, तें त्यांतल्या त्यांत बरेंच शास्त्रीय स्वरूपाचें आहे. Psychology ( मानसशास्त्र ) मधील Emotions ( मनोविकार ) या विषयावर लिहितांना या Emotions चें ( मनोविकारांचें ) शास्त्रीय वर्गीकरण कसें करावें, याबद्दल पाश्चिमात्य लेखकांनाही बराच प्रश्न पडला असल्याचें दिसून येतें.

Unfortunately there is little psychological writing about the emotions, which is not merely descriptive. As emotions are described in novels, they interest us, for we are made to share them. We have grown acquainted with the concrete objects and emotions which call them forth, and any knowing touch of introspection, which may grace the page, meets with a quick

and feeling response. Confessedly literary works of aphoristic philosophy also flash lights into our emotional life, and give us a fitful light. But as far as the scientific psychology of the emotions goes, I may have been surfeited by too much reading of classic works on the subject, but I should as lief read verbal description of the shapes of the rock on a new Hampshire farm as toil through them again.

—**William James.**

या मनोविकारांच्या वर्गीकरणाची अशी अनवस्था असल्यामुळे त्यांतील मुख्य कोण आणि गौण कोण हें मानसशास्त्राला विचारून घेऊन त्याप्रमाणें साहित्यशास्त्रानें आपलें वर्णनाचें धोरण ठेवावें, अशी स्थिति उरलेली नाहीं. शिवाय चमत्कारजनकत्व ही जी साहित्यशास्त्राची दृष्टि, तीहि अगदीं निराळी. त्यामुळें स्थायिभाव, अनुभाव, आणि व्यभिचारिभाव यांचें विवेचन करतांना मानसशास्त्रांतील तत्त्वांचा जितका उपयोग व्हावा, तितका होत नाहीं. आणि अखेरीस कवीना मनुष्याच्या मनांतील निरनिराळ्या मनोविकारांची चित्रें रंगवितांना आपल्या प्रतिभेवर आणि काव्यशास्त्रांतील संप्रदायावरच अवलंबून राहावें लागतें. तरी पण पूर्वीचे ठरलेले संप्रदाय हे कितपत पायाशुद्ध आहेत, याचा शास्त्रीय विचार करण्याला आपण उद्युक्त झाले पाहिजे. व अशा दृष्टीनें या आठ रसांचें पृथक्करण करूं लागलें असतां त्यांत पुष्कळ नवीन विचार सुचण्याला जागा आहे, यांत संशय नाहीं.

## गूढकाव्यें

येथपर्यंत आपण ज्या काव्यांच्याबद्दल विचार करीत आलों, त्या सगळ्या काव्यांतील विषय आपल्या वाचकवर्गापैकीं बहुतेकांना समजण्यासारखे असतात. पण अलीकडे गूढात्मक काव्यांची म्हणून एक जात निघालेली आहे. इंग्रजीमध्यें Mystic Poetry म्हणून एक काव्याची पद्धत आहे, त्याचें 'गूढकाव्यें' हें मराठींतील अनुकरण होय. आपल्या इकडच्या अद्वैत वेदान्तांतील निर्विवाद सिद्धान्तांच्या प्रगतीच्या मानानें पाश्चिमात्य देशांतील तत्त्वज्ञान

अजूनही किती मागें आहे, याची आतां आपल्या इकडील सुशिक्षितांना बरोबर कल्पना आलेली आहे. तत्त्वज्ञानाच्या मार्गांत पाश्चिमात्य लोक कांहीं एका अवधीपर्यंत जातात व त्याच्यापुढें आपल्याला कांहीं समजत नाहीं, असें मानण्याची त्यांची प्रवृत्ति आहे. अशा प्रकारच्या या अज्ञेयवादा (agnostieism) च्या पलीकडे जें सर्व कांहीं गूढ आहे, त्याच्यासंबंधानें कोणाला कांहीं कल्पना व्यक्त करणें झाल्यास त्यांनीं या mysticism च्या धुक्यामध्यें शिरून mystic (गूढ) कविता लिहिणें, हें योग्य होईल, व त्यांच्या त्या विशिष्ट मर्यादेच्या पलीकडील प्रांतामधील कांहीं तेजोमय कल्पनांची वीज एखाद्या कवीच्या डोळ्यांपुढें चमकली, तर त्यानें त्या आपल्या तत्त्वज्ञानाला Transcendental Philosophy असें गंभीर नांव द्यावें, व त्याच्यावरती गूढात्मक कविता लिहाव्या, हे ठीक आहे. पण 'अहं ब्रह्मास्मि' 'सर्वं खल्विदं ब्रह्म' येथपर्यंत ज्या आपल्या तत्त्वज्ञानाची मजल जाऊन पोंचलेली आहे, आणि ज्या तत्त्वज्ञानामध्यें गूढ असें कांहींच राहिलेलें नाहीं, त्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें आपल्या मराठीमध्यें गूढात्मक काव्यें कशाला पाहिजेत, आणि तीं तात्त्विक दृष्ट्या कशी उत्पन्न व्हावींत ? कांहीं गूढात्मक काव्येंही चांगली नसतात, असें नाहीं.

> नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी ।
> हरी जो तापातें उचलुनि कृपासिंधुलहरी ।।
> हरी वाटे काळा करिस विपती मृत्युभुजगा ।
> जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मज गा ।।

हा वामन पंडितांचा श्लोक आहे. वामन पंडित हे पूर्ण वेदांती असूनही त्यांनीं हा गूढात्मक श्लोक केला आहे; व तो अतिशय सुंदरही झालेला आहे. पण अलीकडच्या गूढात्मक काव्यांतून त्यांतील तत्त्वज्ञान अज्ञेय असतें, इतकेंच नव्हे, तर त्यांतील अर्थही तितकाच अज्ञेय असतो. असले दोष जेथें असतील, तेथें ते सुधारले जाणे अवश्य आहे.

## शुद्धलेखन, अनुस्वार, मोडी लिपि वगैरे

असो. येथपर्यंतचें विवेचन भाषा बोलावयाच्या दृष्टीनें झालें. पण तीच भाषा लिहावयाची झाली, म्हणजे ती कशी लिहावी, याबद्दलचे प्रश्न साहजिकपणेंच उपस्थित होतात. मोडी लिपि ही झरझर लिहितां येण्या-

सारखी असल्यामुळें ती आपल्यांतील जुन्याकाळची लघुलेखनपद्धतीचीच एक लिपि आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. त्या लिपीचा लोप होत चालला आहे, हें इष्ट नाहीं. आपण नवीन प्रकारची शॉर्ट हॅन्ड लिपि शिकू लागलों आहों, आणि आपली जुनी विसरूं लागलों आहों. याच्यापेक्षां आपल्या जुन्या मोडी लिपीतच कांहीं नवीन शॉर्ट हॅन्ड लिपीच्या आणि संक्षेपाच्या खुणा समाविष्ट केल्या तर आपली मोडी लिपि कायम राहून आपल्याला दुसऱ्यांच्या शॉर्ट हॅन्ड लिपीची आवश्यकता उरणार नाहीं. आतां जेव्हां आपल्याला बालबोध लिपीमध्ये लिहावयाचें असतें, तेव्हां तें शुद्ध रीतीने लिहिणें अवश्य असतें. या शुद्धलेखनापैकीं ऱ्हस्वदीर्घांचा जुना प्रश्न बाजूला पडून अनुस्वारांचा नवा प्रश्न हल्लीं पुढे आलेला आहे व याच्याबद्दल विद्वान् लोकांच्या मतांच्या अनुरोधानें योग्य तो निर्णय ठरविला गेला पाहिजे. कित्येक लोक अनुच्चारित अनुस्वारांना वांझ अनुस्वार, अजागळ अनुस्वार, अशा रीतीनें संबोधून आपले मत प्रदर्शित करीत असतात पण एखादी वांझ स्त्री असली, म्हणून तिला कांही कोणी मारून टाकीत नाहींत. किंवा शेळीच्या गळ्याखालील स्तन हा दूध देत नसला, म्हणून तो कोणी कापून टाकल्याचें उदाहरण अजून कोणाच्या दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ! आधीं अनुस्वाराचा उच्चार करावयाचा नाहीं आणि मग तो उच्चारला जात नाहीं म्हणून त्याला काढून टाकावयाचा, यांत एका गोष्टीमध्ये दोन दोष केल्याचें श्रेय पदरीं येतें, हें या पक्षांतील लोकांनीं लक्षांत घेणें अवश्य आहे. उच्चारांत अशुद्धता उत्पन्न झाली असली तर त्याच अशुद्धतेनें लेखनाचेंहि क्षेत्र विटाळून न टाकितां तें तरी निदान शुद्ध ठेवणें हें इष्ट नाहीं काय ? आणि जसा उच्चार तसेच लिहावयाचें आणि बाकीच्या शुद्धाशुद्धतेकडे किंवा पूर्वपीठिकेकडे लक्ष द्यावयाचें नाही, असें एकदां म्हटलें, तर आपल्या मराठी भाषेच्या शुद्धलेखनामध्यें किती तरी अनवस्था उत्पन्न होतील. यासाठीं या प्रश्नाचा विचार दूरवर दृष्टि देऊनच केला पाहिजे.

## कांहीं सूचना

येणेंप्रमाणें साहित्यसंमेलनांतील मुख्य मुख्य विषयांचा विचार झाल्यानंतर इतर कांहीं किरकोळ सूचनांकडे आपण वळूं.

पूर्वीच्या संमेलनांत झालेल्या ठरावांची अंमलबजावणी काय काय झाली, याबद्दलचा रिपोर्ट प्रत्येक पुढील संमेलनामध्यें सादर करण्यांत यावा.

संमेलनाच्या वर्षामध्यें जे नवीन ग्रंथ झाले असतील, ते संमेलनाच्या प्रसंगी एकत्र जमविण्यांत येऊन ते सर्वांच्या नजरेस पडतील अशा रीतीनें त्यांचें एक प्रकारचें प्रदर्शन भरविलें गेलें, तर त्यांत प्रत्यक्ष पुस्तक पहावयाला मिळाल्यानें ग्रंथकर्त्यांची प्रसिद्धि आणि वाचकवर्गाची सोय होण्यासारखी आहे.

प्रत्येक साल्यांत जानेवारीच्या सुरवातीपासून डिसेंबरच्या अखेरीपर्यंत जे नवीन ग्रंथ निर्माण होतात, त्यांचे क्वार्टर्ली रिपोर्ट गव्हर्मेंट गॅझेटमध्यें ओरिएंटल ट्रॅन्स्लेटरच्या मार्फत प्रसिद्ध होत असतात, हे सर्वांना माहीतच आहे. अशा प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांसंबंधानें रिपोर्टर ऑन् धी नेटिव्ह प्रेस या अधिकाऱ्याच्या मार्फत कांहीं विवेचनात्मक टीकाही सरकारी रीतीनें पूर्वी प्रसिद्ध होत असे. पण हल्लीं ती जाहीर करण्यांत येत नाही. परंतु ती पद्धत चांगली असल्यामुळें तिच्या पुनरुज्जीवनाच्या हेतूनें पुणें येथील डे. व्ह. ट्रा. सोसायटीचे चिटणीस, रा. कारखानीस यांनीं '१९२५ सालचें मराठी वाङ्मय' या नांवाचें एक पुस्तक तयार करून त्यांत त्यांनीं एका सालांत प्रसिद्ध झालेल्या निरनिराळ्या विषयांवरील सर्व मराठी पुस्तकांचें विहंगमदृष्ट्या पर्यालोचन केलें आहे. व हाच क्रम त्यांनीं कदाचित् पुढेंही चालू ठेविला असता; पण द्रव्याच्या अभावीं सदर सोसायटीला ती गोष्ट करणें अशक्य झालें आहे. आपल्या साहित्यसंमेलनांना दरसाल असें एखादें पुस्तक तयार करतां आलें तर, आपल्या संमेलनाची ती एक मोठी प्रशंसनीय कामगिरी होईल; व पुढील वाङ्मयाच्या इतिहासलेखकांना त्यापासून फार मदत होईल. मात्र त्यांत वऱ्हाड, मध्यप्रांत आणि मराठी संस्थानें, यांत प्रसिद्ध झालेल्या नवीन पुस्तकांचीं नांवेंही संग्रहीत केलीं जाणें जरूर आहे.

मराठींतील ग्रंथांना उत्तेजन देण्यासाठीं हल्लीं निरनिराळ्या ठिकाणीं खालसा मुलुखांत व नेटिव्ह संस्थानांतून कित्येक संस्था निघालेल्या आहेत. व सीनियर देवास या संस्थानच्या मार्फत 'भोजराज प्राइज' संबंधाची एक नवीन प्रशंसनीय योजना नुकतीच प्रसिद्ध करण्यांत आली आहे. या सगळ्या

संस्थांमधून एकसूत्रीपणा उत्पन्न करण्यांत आल्यास कोणत्या ग्रंथांना उत्तेजन द्यावें, कोणत्या विषयांवर पुस्तकें मागवावीं, वगैरे धोरण एकमेकांच्या विचारविनिमयानें ठरविलें जाऊन मराठी वाङमयाचा फायदा होईल.

हिंदी, बंगाली, गुजराथी, कानडी वगैरे निरनिराळ्या भाषांचीं हल्लीं जीं संमेलनें आहेत, त्या सगळ्यांचे रिपोर्ट आपल्या दप्तरीं असावे, त्यांच्याशीं स्नेहभाव संवर्धित करावा, आणि तुलनेनें त्यांच्या कामाच्या पद्धतींतील ज्या गोष्टी घेण्यासारख्या असतील त्या घ्याव्या; व या सर्व साहित्यसंमेलनांनीं मिळून करतां येण्यासारखें एकलिपिप्रचाराचें वगैरे काम करण्यांत यावें.

दक्षिण हैदराबाद संस्थाननें 'उस्मानिया युनिव्हर्सिटी' काढून उर्दू भाषेला उत्तेजन देण्याचे जसे प्रयत्न सुरू केले आहेत, त्याप्रमाणें बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, धार, देवास, कोल्हापूर, वगैरे मराठी संस्थानांनी मिळून मराठी भाषेच्या उन्नतीकरितां कांहीं तरी मोठ्या प्रमाणावरील प्रयत्न सुरू करण्याविषयी महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें त्यांना विनति करणें अवश्य आहे.

महाराष्ट्रीयांची वाङमयनिर्मिति आणि व्यासंग व सार्वत्रिक ज्ञानप्रसार हे हेतु शीघ्र सिद्धीस जाण्याकरितां एक सुव्यवस्थित व सर्वमान्य योजना करून ती कृतींत आणणारी एक मध्यवर्ती संस्था ( अखिल महाराष्ट्र शारदामंडळ Academy ) स्थापण्यांत यावी, अशा प्रकारचा एक ठराव ग्वाल्हेरच्या साहित्यसंमेलनानें पास केला आहे. त्याला व्यवस्थित स्वरूप प्राप्त होऊन त्याची अंमलबजावणी झाली, तर उस्मानिया युनिव्हर्सिटी उर्दू भाषेकरितां जसें कार्य करीत आहे, त्याचप्रमाणें ही महाराष्ट्र शारदामंडळाची Academy मराठी भाषेचें कार्य करूं शकेल. याकरितां त्या मंडळाच्या योजनेकडे योग्य लक्ष पोंचविलें जावें.

आपल्या देशी विद्यापीठांतून हिंदी, बंगाली, गुजराथी, कानडी, वगैरे भाषांचें साधारण तरी ज्ञान वरिष्ठ शिक्षणांतील विद्यार्थ्यांना देण्याची तजवीज अवश्य व्हावी, या विषयाकडे महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें लोकांचें लक्ष वेधणें जरूर आहे.

साहित्यसंमेलनांच्या प्रसंगीं जे ठराव आणि जीं भाषणें होतात, त्यांच्यापेक्षां पूर्वीं विचारपूर्वक रीतीनें लिहून पाठविले गेलेले निबंध जे येथें वाचण्याकरितां येतात, त्यांचें महत्त्व खरोखर जास्त असल्यामुळें असल्या

निबंधांची संख्या सालोसाल वाढली जावी, इकडे संमेलनानें लक्ष पुरविणें अवश्य आहे. व ज्या कोणत्या तरी विषयावर निबंध येतील ते तर वाचले जावेत च; पण व्युत्पत्तिशास्त्र, तत्त्वज्ञान, प्राचीनवस्तुसंशोधनशास्त्र, मानवोत्क्रांतिशास्त्र, वगैरे मराठी भाषेशीं संलग्न असलेल्या विषयांवरीलही निबंध मागविण्यांत यावेत. आणि शास्त्रीय विषयांच्या चर्चेकडे सामान्यतः जास्त लक्ष देण्यांत यावें.

## ग्वाल्हेरचें संमेलन व बेळगांवचें संमेलन यांच्या दरम्यान

गुदस्त सालचे ग्वाल्हेरचें संमेलन ता. ८ एप्रिल १९२८ रोजीं भरलें होतें व त्यानंतर हें बेळगांवचें संमेलन आज ता. २६ मे १९२९ रोजीं भरत आहे. या एका वर्षामध्यें आपल्या मराठी भाषेच्या क्षेत्रामध्यें ज्या कित्येक महत्त्वाच्या घडामोडी झालेल्या आहेत, त्यांचा येथें उल्लेख केल्यावांचून हें भाषण संपविणें उचित होणार नाहीं.

रा. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी, रा. सा. कृष्णाजी विनायक वझे, प्रो. महादेव मल्हार जोशी, बाळकृष्ण अनंत भिडे, नाथमाधव, रणदिवे यांच्यासारखे नामांकित आणि नांवाजलेले साहित्यसेवक आपल्यामधून या वर्षीं नाहीसे झाले, याबद्दल कोणालाही वाईट वाटल्यावांचून राहणार नाही. तरी पण 'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी' या रामदासांच्या वचनाप्रमाणें उत्कृष्ट लेखक आणि निरसीम वाङ्मयसेवक या दृष्टीनें त्यांची कीर्ति आपल्या महाराष्ट्र वाङ्मयामध्यें कायमची राहील अशी कृति त्यांच्या हातून झालेली आहे यांत संशय नाहीं, आणि लौकिकदृष्ट्या जरी ते मृत्युवश झालेले असले, तरी

जयन्ति ते मुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ।
नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ।।

या कविवचनाप्रमाणें त्यांचे यशोरूपी देह आपल्यामध्यें कायमच आहेत. त्यांचे ग्रंथ जोंपर्यंत वाचले जात आहेत, तोंपर्यंत ते आपल्यामध्यें हयातच आहेत!

परंतु ईश्वरी प्रेरणेनें फिरणाऱ्या या कालचक्राच्या नेमानेमाप्रमाणें कांहीं लोक जरी आपल्यामधून नाहीसे होत असले तरी तेंच कालचक्र प्रत्यहीं आपल्याला अनेक नवीन नवीन लोकही निर्माण करून देत असतें, हे आपण केव्हांही विसरतां कामा नये. आणि अशा प्रकारच्या या आशावादी आणि

उत्साहपूर्ण दृष्टीनें आपण आपल्या वाङ्मयाच्या वाढत्या विस्ताराकडे पाहिलें, तर ईश्वरी कृपेबद्दलच्या कृतज्ञतेनें आपलें अंतःकरण उचंबळून येतें. आपल्या महाराष्ट्र वाङ्मयाच्या विस्तीर्ण क्षेत्रामध्यें अनेक ग्रंथकार निर्माण होत आहेत, अनेक कवि आपलीं काव्यें गात आहेत, निरनिराळ्या प्रकारची नवीन नवीन ग्रंथसंपत्ति वाढत आहे, आणि आपल्या महाराष्ट्रांतील सर्व विद्वानांचें लक्ष आपल्या भाषेच्या आणि देशाच्या उन्नतीकडे वळलें आहे, असें पाहून कोणाचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून येणार नाहींत ! ज्ञानकोश, शब्दकोश, चरित्रकोश, रा. पुंडलीक यांचा हिंदी मराठी कोश, प्रो. हुदलीकर यांचा जर्मन भाषाप्रवेश, अशासारखी नवीन नवीन उपयुक्त साधनें तयार होत आहेत; ज्ञानेश्वरचर्चामंडळ, मयूरचर्चामंडळ (पुणें), वाङ्मयचर्चामंडळ (बेळगांव), अशासारखी मंडळें संस्थापित होऊन त्यांच्या द्वारानें वाङ्मयाची चर्चा सुरू होत आहे; महाराष्ट्र शारदामंडळ, रविकिरण मंडळ, आणि भ्रमरमंडळ (पुणें), भारत कविमंडळ आणि साहित्यस्नेहमंडळ (कोल्हापूर) कविमित्र मंडळ (दादर), साहित्यसेवामंडळ (कऱ्हाड), तांबेकविमंडळ (ग्वालेर), सत्कार्योत्तेजक मंडळ (धुळें), व याशिवाय औंध, नाशिक, जळगांव वगैरे अनेक ठिकाणीं अशाच हेतूसाठीं स्थापित झालेलीं अनेक मंडळें नवीन नवीन कविता आणि सुंदर सुंदर काव्यें निर्माण करण्यांत गुंतलीं आहेत; त्याचप्रमाणें पुण्यांतील डेक्कन व्हर्नॅक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी, बडोद्याची श्रीसयाजी साहित्यमाला, इंदूरचें महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळ, ग्वाल्हेरचें शारदा मंडळ, श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांची इचलकरंजी ग्रंथमाला, सीनीयर देवास येथील ज्ञानप्रसारक मंडळ, वगैरेसारख्या अनेक संस्था महाराष्ट्र वाङ्मयाला उत्तेजन देण्याला उत्पन्न झाल्या आहेत; अशा प्रकारचा हा साऱ्या महाराष्ट्रभर दिसून येणारा आपल्या महाराष्ट्र भाषेच्या संवर्धनाचा समाधानकारक देखावा पाहून कोणाचीं अंतःकरणें आनंदामध्यें निमग्न होऊन जाणार नाहींत? 'आशावादा'चे प्रतिपादक डॉ केतकर, साऱ्या महाराष्ट्रभर आपली 'दौलत' उधळून देणारे 'जादुगार' श्री. नारायण सीताराम फडके, 'बंधनाचे पलीकडे' जाऊं इच्छिणारे रा. देशपांडे, त्याचप्रमाणें 'लग्नाचा बाजार', 'विधवा कुमारी', 'पहाटे पूर्वीचा काळोख', इत्यादि कादंबऱ्यांचें कुशल कारागीर आपापल्या कादंबऱ्यांतील विचार-

प्रवर्तक कथानकांनीं आपल्या वाचकांची मनें युक्तीयुक्तीनें नवीन विचारांकडे वळवीत आहेत; टेंबे, वरेरकर, औंधकर, शुक्ल, देसाई, कमतनूरकर, यांच्यासारखे नवीन नवीन नाटककार आपली महाराष्ट्राची रंगभूमि मनोरंजक आणि शिक्षणप्रद करण्याचा प्रयत्न करीत आहेत; आणि कवि यशवंत यांचें 'यशोधन', माधव जूलियन यांचा 'सुधारक', कवि गिरीश यांची 'आंबराई', भोरचे युवराज श्री. पंतसचिव यांचें 'त्रिदल', वगैरे नवीन कवींच्या काव्यगुंजारवानें सर्व महाराष्ट्रांतील वाङमयात्मक वातावरण भरून गेलें आहे; आणि त्यांतच राजवाडे यांची 'ऐतिहासिक प्रस्तावना', रा. रा. दाजी नागेश आपटे यांची 'सुमेरियन संस्कृति' बेंद्रे यांची 'साधनचिकित्सा', तारकुंडे यांचा 'क्षत्रिय घराण्यांचा इतिहास', 'रा. यशवंत नरसिंह केळकर यांचे 'ऐतिहासिक पोवाडे', प्रो. बेहेरे यांचा '१८५७ सालच्या बंडाचा इतिहास' आणि श्री. देवगिरीकर यांचा 'रशियन राज्यक्रांतीचा इतिहास,' हे सर्व ऐतिहासिक ग्रंथ महाराष्ट्र वाचकांच्या अंतःकरणामध्यें स्वाभिमानाची आणि स्वदेशोद्धाराची ज्योत पेटवीत आहेत; आणि या सगळ्या नव्या वाङमयाला आपले जुने वाङमयात्मक पूर्वज किती मोठे होते याची ओळख पटवून देण्यासाठीं विदर्भांतील साहित्यसंघ आणि यवतमाळच्या शारदाश्रमांतील प्राचीन मराठी वाङमयमाला, यांच्या साहाय्यानें श्री. य. खु. देशपांडे यांच्यासारखे साहित्यभक्त 'श्रीऋद्धिपूरवर्णना'सारखीं जुनीं काव्यें प्रकाशित करीत आहेत; हा या वर्षांच्या वाङमयांतील हृदयस्पर्शी आणि प्रोत्साहक योगायोग पाहून आशेला अंकुर फुटतात, नैराश्याचा काळोख नाहींसा होतो, आणि उदयकाल जवळ येत आहे असें वाटू लागतें! विश्वनाथ नारायण मंडलिक, डॉ. भांडारकर व विजापूरकर यांचीं चरित्रें, लोकमान्य टिळकांच्या आठवणी व चरित्रें आणि प्रो. धोंडो केशव कर्वे यांचें 'आत्मवृत्त' हे सर्व सुंदर चरित्रग्रंथ महाराष्ट्रांतील तरुणांना त्यांचा योग्य मार्ग दाखविण्याला तत्पर होत आहेत; त्याचप्रमाणें रा. वैद्य यांचा 'प्रार्थना समाजाचा इतिहास' आणि पनवेलचे रा. सदाशिव कृष्ण फडके वकील यांच्या 'नवयुगधर्माचे पुस्तकखंड', श्री. गोविंदसुत यांचे 'आध्यात्मिक उन्नतीचे विचार' व श्री. चित्रावशास्त्री यांनीं केलेलें ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषांतर, यांच्यासारखीं धर्मकल्पनांचीं चर्चा करणारीं पुस्तकें महाराष्ट्र भाषेंतील वाचकांना

परमार्थाचा परिचय करून देत आहेत. याशिवाय श्री. वासुदेव गोविंद आपटे यांचें ज्ञानेश्वरीचें सुबोध गद्यात्मक रूपांतर हें ज्ञानेश्वरींतील गूढ तत्त्वें महाराष्ट्रीयांना सुबोध करून देण्याकरितां एकीकडे अवतीर्ण झालें असतां दुसरीकडे श्री. महादेव पांडुरंग ओक यांचें ज्ञानेश्वरीचें संस्कृत रूपांतर महाराष्ट्राबाहेरील बाकीच्या हिंदुस्थानांतील सर्व सुप्रबुद्ध जनतेला ज्ञानेश्वरीतील अत्युत्कृष्ट रसाचा आस्वाद देण्याला बद्धपरिकर होऊन बाहेर पडत आहे; त्याचप्रमाणें आपल्यांतील भक्तिपर ग्रंथांची कित्येक युरोपियन लोकांनाही गोडी लागून मि. जस्टिन ॲबट यांनीं अमेरिकन ओरिएंटल सोसायटीच्या जर्नलमध्यें 'दासोपंत दिगंबर' वगैरे कांहीं भगवद्भक्तांचीं चरित्रें इंग्रजी भाषांतरासह प्रसिद्ध केलीं असून, बहिणाबाईचेंही चरित्र ते लवकरच प्रसिद्ध करणार आहेत; अशी ज्या महाराष्ट्र वाङमयामध्यें सर्व बाजूनीं अनुकूल परिस्थिति उत्पन्न होत आहे, त्या वाङमयाच्या द्वारानें आपल्या महाराष्ट्राला लवकरच उन्नतीचे दिवस येतील यांत शंका नाहीं. 'विविध-ज्ञानविस्तार', 'चित्रमय जगत्', वगैरेंसारखी जुनीं मासिक पुस्तकें आणि 'रत्नाकर,' 'यशवत', 'मधुकर', 'अरुण', 'गृहलक्ष्मी', 'स्फूर्ति' 'मनोरमा', वगैरेसारखीं नवीन मासिक पुस्तकें आणि निरनिराळ्या प्रकारच्या 'भारतग्रंथगौरवमाले'सारख्या अनेक माला आपल्या महाराष्ट्र भाषेच्या उन्नतीकरितां अविश्रान्त श्रम करीत आहेत. पण या कामीं हे नुसते पुरुषांच्याकडूनच परिश्रम होत आहेत असें नसून, पूर्वीच्या कै. श्री. रमाबाई रानडे, श्री. काशीबाई कानिटकर, या विदुषींच्याप्रमाणेंच अलीकडच्या काळांतील श्री. गिरजाबाई केळकर, श्री. सरलाबाई नाईक, श्री. काशीबाई हेरलेकर, श्री. शांताबाई नाशिकर, श्री. कमलाबाई बंबेवाले, श्री. मनोरमाबाई रानडे, श्री. शांताबाई हेबळीकर श्री. गिरजाबाई विंचूरकर, श्री. गोदावरीबाई केतकर, वगैरेसारख्या कित्येक स्त्रियांनींही आपल्या मराठी भाषेंतील लेखनाचें पवित्र कार्य हातीं घेतलें असून 'गृहलक्ष्मी', 'मनोरमा', वगैरेसारखी मासिक पुस्तकें केवळ स्त्रियांकरितांच म्हणून चालविण्यांत येत आहेत, हें भूषणास्पद आहे. परंतु हे येथपर्यंत वर उल्लेखिलेले सामान्य वर्गांतील स्त्रीपुरुषच फक्त आपल्या महाराष्ट्र वाङमयाच्या सेवेला लागलेले आहेत असें नसून, कित्येक श्रीमंत घराण्यांतील राजे, राजपुत्र आणि सरदारही

आपल्या वाङमयाच्या विस्तारासाठीं विशेष कळकळीनें झटत आहेत. श्रीमंत संपतराव गायकवाड, श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि, श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, श्रीमंत सदाशिव रघुनाथ पंतसचिव, श्रीमंत सरदार चंद्रोजीराव आंग्रे, श्रीमंत सरदार माधवराव किबे, श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे वगैरे मंडळींचीं नांवें वाङमयाच्या अंतरिक्षामध्यें तेजस्वी ताऱ्यांप्रमाणें चमकत आहेत, हें त्यांना स्वतःला, त्यांच्या महाराष्ट्राला आणि त्या महाराष्ट्रांतील मराठी भाषेला किती भूषणास्पद आहे, याचें वर्णनहि करणें शक्य नाही !

प्रचलित वाङमयाच्या निरीक्षणामध्यें दिसणारा हा देखावा पाहून मन किती आनंदित आणि आशायुक्त होतें ! वर्षाऋतूतील पाऊस पडून गेला, म्हणजे शरद्ऋतूच्या प्रारंभीं जशी सर्वत्र अत्यंत रमणीय शोभा पसरलेली दिसते, तशी आपल्या या शारदोत्सवामुळें महाराष्ट्र वाङमयाच्या भूमिभागाची चित्ताकर्षक स्थिति झालेली आहे ! निराशेचे ढग वितळून गेले आहेत; सर्व दिशांनीं अनुकूल वारे वाहूं लागले आहेत; व पूर्वी गढूळ झालेल्या नद्यांचीं पाणी निवळत चाललीं आहेत ! वाङमयाचे वृक्ष नवीन नवीन 'द्विदलांनी' आणि 'त्रिदलांनी' आच्छादून गेले आहेत ! कवितारूपी वेलीवर निरनिराळ्या रंगांची चित्रविचित्र काव्यकुसुमें लटकून राहिलीं आहेत ! आणि 'दंवाचे थेंब' त्यांच्यावर पडून 'अश्रूंचे गुच्छ' आणि 'अश्रूंच्या माला' त्यांच्यावरून खाली ओथंबत आहेत ! आणि अशा प्रकारच्या या 'कवीच्या उद्यानांत' कांहीं 'वनवासी फुलें' कोठें 'रानांत एकटीच पडलेलीं' असली, तरी इतरत्र 'कुंदाच्या कळ्या' व 'गुलाबाच्या कळ्या' उमलत चाललेल्या आहेत ! 'सुवर्णचंपका'चीं सुंदर पुष्पें प्रफुल्लित झालीं आहेत ! 'तगरीच्या फुलां'चा अंतर्बाह्य साधेपणा आणि स्वच्छता जिकडे तिकडे दृग्गोचर होत आहे ! आणि 'झेंडूच्या फुलां'नीं सर्व भूभाग चित्रित करून सोडला आहे ! तसेंच 'पारिजाताच्या फुलां'च्या तर 'पखरणी' पडलेल्या असून अनेक 'फुलांच्या परड्या' सुंदर फुलांनीं भरून गेलेल्या आहेत ! जिकडे तिकडे कोमल 'रविकिरणां'च्या 'प्रभा' पसरलेल्या आहेत ! 'नैर्ऋत्येकडील वारे' पूर्व स्मृतींच्या भारामुळें मंदमंद गतीनें वाहत आहेत ! 'बुलबुल' पक्षी आपले सूर आळवीत

आहेत ! आणि त्यांतच कोणी आपल्या ' मुरली 'चे मधुर आलाप मिळवून देत आहेत ! अशा या शारदीय महोत्सवांत लहान लहान मुली जमिनीवर सुंदर ' रांगोळी ' घालून आपलीं ' फेरांचीं गाणीं ' गाऊन ' झपुर्जा गडे झपुर्जा ' असें म्हणून नाचूं लागल्या आहेत ! उत्कृष्ट ग्रंथांतील रस काव्य-लोलुपांना मोहून टाकीत आहे ! उत्कृष्ट वाङमयाच्या फुलांतील सुगंध सर्व दिशांनीं धांवत आहे ! कवींच्या कल्पना मानससरोवरांतून निघालेल्या राजहंसांप्रमाणें आकाशांत उंच भराऱ्या मारीत आहेत ! काव्यामोदानें रसिकजन वृक्षांप्रमाणें डुलत आहेत ! शरदृतूंतील पक्ष्यांप्रमाणें गान-लोलुप कवि आपलीं वीणाकाव्यें गात आहेत ! निरभ्र आकाशांतील तेजस्वी नक्षत्रांप्रमाणें उत्कृष्ट काव्यकल्पना ठिकठिकाणीं चमकूं लागल्या आहेत ! गगनचुंबित वृक्षांप्रमाणें आपल्या ऐतिहासिक वाङमयांतील महत्त्वाकांक्षा उंच उंच वाढत आहेत ! आणि शारदीय ज्योत्स्नेप्रमाणें आपल्या महाराष्ट्र भाषेची उज्ज्वल कीर्ति लवकरच सर्वत्र पसरेल, अशी आशा वाटत आहे !

सभ्य गृहस्थ हो, आपल्या भाषेची उन्नति व्हावी, अशी तुमच्या सर्वांच्या अंतःकरणामध्यें उत्कट इच्छा उत्पन्न झालेली असून आपण सर्वजण त्यासाठीं अशा रीतीनें परिश्रम करण्याला उद्युक्त झालां आहां, त्या अर्थी सृष्टीच्या नियमाप्रमाणें परमेश्वर आपल्या सर्वांच्या या सदिच्छा परिपूर्ण करीलच करील, यांत तिळप्रायही संशय नाहीं !

## चित्रें व चित्रकलेची टीका : : २

अलीकडे पुष्कळ मासिक पुस्तकांतून निरनिराळया प्रकारचीं चित्रें छापण्याची पद्धत सुरू झालेली आहे. ही पद्धत फार चांगली आहे; व तिचा जितका प्रसार होईल तितका तो इष्टच आहे. हें पाश्चिमात्य मासिक पुस्तकांचे एक प्रकारचें अनुकरणच आहे. तरी पण त्यापासून आपल्या इकडील चित्रकलेला पुष्कळ उत्तेजन मिळण्यासारखे आहे. हल्लींच्या मासिक पुस्तकांतून जी चित्रें घालण्यांत येतात, त्यांचा बहुतेक प्रसंगी मुख्य उद्देश लिहिलेल्या मजकुराचें विशदीकरण करणे हाच असतो. अशा हेतूनें काढलेल्या चित्रांचे बहुधा दोन विभाग करतां येण्यासारखे असतात. एक वस्तुस्थितिनिदर्शक अशा चित्रांचा विभाग होय; व दुसरी चित्रें उपहासात्मक आणि हास्यरसोत्पादक अशीं असतात. वस्तुस्थितिनिदर्शक अशीं नैसर्गिक आकाराची चित्रे काढण्याला चित्रकलेचें कौशल्य आणि सृष्टिनिरीक्षण यांची आवश्यकता असते. परंतु दुसऱ्या प्रकारचीं चित्रे काढण्याला चित्रकलेच्या ज्ञानापेक्षां कल्पकतेच्या वैचित्र्याची विशेष अपेक्षा असते. असली उपहासात्मक चित्रें इंग्लिशमधील ' पंच ', " टिटबिट्स " वगैरेसारख्या मासिक पुस्तकांतून पुष्कळ वेळां आढळून येतात. त्यांचें अनुकरण आपल्या इकडील कांही मासिक पुस्तकांतून करण्यांत येतें. पण असल्या चित्रांतून विनोदाच्या योग्य मर्यादेचें केव्हाही अतिक्रमण होऊन बीभत्सतेच्या प्रदेशामध्ये प्रवेश न होणें याच्याकरितां जितकी काळजी घेणें आवश्यक असते, तितकी काळजी आपल्याइकडे कधी कधी घेण्यांत येत नाही. लेखांमध्यें गंभीर विषयांवरील लेख आणि उपरोधिक लेख हे जसे लेखांचे दोन भेद आहेत, तसे त्यांच्याच अनुरोधानें चित्रांमध्येंही वर सांगितलेले दोन भेद उत्पन्न होतात. पण हे दोन्हीही भेद लिहिलेल्या मजकुराच्या विशदी-

करणासाठींच बहुधा उपयोगांत आणले जातात. पण याच्याशिवाय चित्रकलेच्या उन्नतीसाठी म्हणूनही कांही मासिक पुस्तकांतून कांहीं चित्रें प्रसिद्ध होत असतात. आणि तसल्या चित्रांच्या संबंधानेंच ऊहापोह करण्याचा प्रस्तुत लेखांतील मुख्य उद्देश आहे.

उदाहरणच देऊन बोलावयाचें झाल्यास 'रत्नाकर' मासिक पुस्तकाच्या चालू सालच्या जुलै महिन्याच्या अंकांत "प्रणयिनीचा मनोभंग" या नांवाचे जें एक सुदर चित्र प्रसिद्ध झालेले आहे, तें आपण घेऊं. 'रत्नाकर' मासिक पुस्तकाच्या दर अंकामध्ये दर्शनी असलें कांही तरी एखादे स्वतंत्र विचाराचें रंगीत चित्र देण्यांत येत असते. हा उपक्रम प्रशंसनीय आहे. आपल्या इकडील विविध विषयांनी भरलेली मासिक पुस्तके, त्यांतील गद्यात्मक निबंध आणि पद्यात्मक कविता, हे सर्व प्रयत्न काव्यकलेच्या परिपोषणार्थ आहेत, हें अगदी उघड आहे. पण हा जरी प्रधान हेतु असला तरी काव्यकलेच्याबरोबर दुसऱ्या एखाद्या कलेचा प्रसार करता आला, तर 'एका क्रिया द्व्यर्थकरी' या न्यायाने ती गोष्ट श्रेयस्करच होय. आणि अशा दृष्टीनें पाहतां ज्या ज्या मासिक पुस्तकांतून चित्रकलेला पोषक अशीं चित्रे प्रसिद्ध करण्यांत येतात, त्या त्या मासिक पुस्तकांचे अभिनंदन करणें आवश्यक आहे. 'रत्नाकर' मासिक पुस्तकामध्ये "प्रणयिनीचा मनोभंग" हें जें वर उल्लेखिलेलें चित्र दिलें आहे, त्याचा थोडासा इसिहासही त्या चित्राबरोबर दिलेला आहे.

आपल्या इकडील अनेक संस्थानिकांपैकी औध संस्थानचे हल्लींचे अधिपति, श्रीमंत बाळासाहेब पंत-प्रतिनिधि, हे फार विद्वान् असून त्यांना स्वतःला उत्कृष्ट चित्रें काढण्याचा अतिशय नाद आहे. त्यांच्यासारख्या संस्थानिकांना हें अत्यंत भूषणावह आहे. अशा गुणी पुरुषांच्या संग्रहामध्यें निरनिराळ्या चित्रकारांची चित्रे असणें हें अगदीं स्वाभाविकच आहे. त्याप्रमाणें त्यांच्या संग्रहामध्यें दुसऱ्या अनेक देशी आणि परदेशी चित्र-कारांची चित्रें एकत्रित केलेली आहेत; इतकेंच नव्हे, तर त्यांनी स्वतः काढलेल्या अनेक चित्रांचा समुदायही त्यांच्या येथें पाहावयास सांपडतो. औध संस्थानांतील त्यांचा राजवाडा हा एक चित्रमय राजवाडा आहे, असें म्हटलें असतां तें अन्यथा होणार नाही. जिकडे जावें तिकडे श्रीमंतांच्या

ह्यातच्या आणि इतर नामांकित चित्रकारांनीं काढलेल्या सुंदर तसबिरी दृष्टीस पडतात. राजवाड्यांतल्या कोणत्याही दिवाणखान्यांत जावें, किंवा त्यांच्या देवीच्या देवळाच्या भव्य सभामंडपांत जाऊन पहावें, तों प्रत्येक खांबावर श्रीमंतांच्या हातची भव्य आकाराची आणि सुंदर आकृतीनीं सुशोभित केलेली अशी कोणती ना कोणती तरी तसबीर टांगलेली दृष्टीस पडते. कोठें रामावतारांतील कथा, तर कोठे श्रीकृष्णाच्या लीला, एका पाठीमागून एक चित्रमय अक्षरांनीं लिहिलेल्या पाहून प्रेक्षकाचें मन सात्त्विक मनोविकारांनी अगदी उचंबळून येतें. आणि शिवाय शिवाजीच्या शौर्याचे निरनिराळे प्रसंग तर श्रीमंतांनी तेथें इतक्या तसबिरींतून चित्रांच्या रूपानें लिहून काढले आहेत कीं, तो महाराष्ट्राचा चित्रमय इतिहास पाहात असतांना आपण या गुलामगिरीच्या विसाव्या शतकामध्ये नसून शिवाजी-महाराजांच्या बरोबर त्या सतराव्या शतकामध्यें आपले स्वातंत्र्याचे किल्ले आपण एकामागून एक काबीज करीत चाललेले आहोत असाच भास उत्पन्न होतो. चित्रकलेच्या प्रत्यक्षतेचा प्रभाव इतका विलक्षण आहे. कागदावरील चित्रें, दगडाच्या मूर्ति, कलाकौशल्याचे निरनिराळे जिन्नस, जुन्या पदार्थांचे संग्रह, इत्यादि अनेक वस्तूनीं भरून गेलेला श्रीमंतांचा तो राजवाडा पाहिला, म्हणजे तो श्रीमंतांचा राजवाडा नसून, कला-कौशल्याच्या देवतेनें आपल्या राहण्यासाठीच ते एक सुंदर स्थान निर्माण केले आहे की काय, अशीच उत्प्रेक्षा कोणाच्याही मनांत उत्पन्न झाल्या-वाचून राहत नाहीं. श्रीमंतांच्या या संग्रहामध्यें राजा रविवर्म्याच्या चित्रांच्या मूळ प्रती आहेत; व पूर्वीच्या काळांतील सुप्रसिद्ध कारागीर भिवा सुतार याच्या हातची रामपंचायतनाची मूळ प्रत अत्यंत उत्कृष्ट स्थितीमध्यें आपल्याला तेथे पाहावयाला मिळते. चांदीचे मोठमोठाले भव्य आणि सुंदर देव्हारे, स्फटिकाच्या सुंदर मूर्ति, संगमरवरी दगडांचे मनोहर पुतळे, चंदनाच्या लांकडावर आमूलाग्र कोरलेलें रामायणाचें कथानक, इत्यादि अनेक अदृष्टपूर्व वस्तु या संग्रहामध्यें प्रेक्षकांच्या डोळ्यांना आनंदित करण्याचें कार्य करीत आहेत. श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि याच्या अशा या अमूल्य संग्रहामधूनच "प्रणयिनीचा मनोभंग" हे चित्र

'रत्नाकर'च्या अकांत प्रसिद्ध करण्याकरितां घेण्यांत आलेलें आहे, हें वर सांगितलेच आहे.

शब्दानी एखादी गोष्ट लिहावी आणि तिच्या स्पष्टीकरणाकरितां त्यांतील एखाद्या पात्राची आणि प्रसगाची आकृति रगाच्या कलमांनीं रेखाटली जावी, अशा प्रकारचा चित्राचा एक वर्ग असतो, हें पूर्वीं सांगितलें आहे. परंतु "प्रणयिनीचा मनोभग" यासारखी चित्रें ही या वरच्या वर्गामध्यें पडत नसून यांचा वर्ग अगदीं भिन्न आहे. ही चित्रें अशी आहेत कीं, ही एखाद्या लेखांतील भावार्थ व्यक्त करण्याकरिता काढलेलीं नसून या चित्रातील भावार्थ व्यक्त करण्याकरितां लेख लिहिले पाहिजेत, अशा योग्यतेची या वर्गातील चित्रें असतात. चौदा विद्या आणि चौसष्ट कला, असा आपल्याकडील विद्यांचा आणि कलांचा विभाग करण्यांत येतो; आणि याच तत्त्वाच्या अनुरोधानें उपयोगात्मक विद्या (useful Arts) आणि विनोदोपयोगी ललितकला (Fine Arts) असे विभाग पाश्चिमात्य शास्त्रज्ञां-कडून प्रयोजित करण्यांत येतात. त्यांपैकी या दुसऱ्या विभागांतील विनोदा-त्मक कलांमध्ये साहित्य, संगीत, चित्रकला, मूर्तीची कला व स्थापत्य, या पांच कलांचा अंतर्भाव करण्यांत येतो. त्यांपैकी साहित्य आणि संगीत यांचा शब्दांशीं संबंध येत असल्यामुळें त्यांचा एक वर्ग निराळा पडतो. व चित्रकला, मूर्तीची कला आणि स्थापत्य, यांचा हस्तकौशल्याशी संबंध असल्यामुळे, त्यांचा वर्ग निराळा पडतो. साहित्य आणि संगीत या वाग्देवतेच्या कला आहेत; आणि बाकीच्या तीन या हस्तकौशल्याच्या कला आहेत. अशा दृष्टीनें मुखोद्गत वाण आणि हस्तकृत चमत्कार हे जरी परस्परभिन्न दिसत असले, तरी या दोघांचेंही मुख्य अधिष्ठान मनुष्याचें मन हें एकच असतें, हे केव्हांही विसरता कामा नये. कागदावर लिहिलें जाण्याच्या पूर्वीचें पहिलें काव्य काय, किवा चित्र काय, मनुष्याच्या मनावर पहिल्यानें रेखाटलें जातें; आणि नंतर तेथून एक मुखाच्या द्वारानें प्रकट होतें, तर दुसरें हस्ताच्या साहाय्यानें प्रादुर्भाव पावतें; परंतु दोघांचेही आद्य जन्म एकाच स्थानापासून. आणि या दृष्टीनें पाहतां या मुखोद्गामी कला व हस्तोद्गामी कला या एकमेकांच्या बहिणीबहिणी आहेत. आणि या भगिनीत्वाच्या नात्यानें साहित्यकलेला चित्रकलेचें साहाय्य आणि चित्रकलेला

साहित्यकलेचें साहाय्य असणें अत्यंत आवश्यक आहे. पण त्यांतल्या त्यांत सुद्धां चित्रकलेला साहित्यकलेच्या साहाय्याची जास्त आवश्यकता आहे. कारण, साहित्यशास्त्र हें बोलकें शास्त्र आहे. तें आपल्यातील गुण आपल्या शब्दांनीं बोलून दाखवू शकतें. पण बिचारे हस्तकौशल्याचें शास्त्र हें एक मुकें शास्त्र आहे. ते हातानें फक्त कृति करूं शकते. पण त्या हाताला जीभ नसल्यामुळे त्या मानाने हें हस्तकौशल्याचे शास्त्र लगडे पडते त्यातील हस्त-कौशल्याचे गुण कोणी वर्णन करून सांगितले, तर तें जास्त विशद होण्याचा संभव असतो. चित्रकला व इतर तज्जातीय कला यांच्यामधील हस्त-कौशल्याची कृति पाहणारा जर कोणी तज्ज्ञ व मार्मिक असेल, तर त्या कृतीच्या कारागिराने आपल्या त्या कृतीमध्ये काय करामत करून ठेवलेली आहे, हे त्याच्या पूर्णपणें लक्षांत येईल; पण असले तज्ज्ञ आणि मार्मिक पाहणारे किती असतात? फारच थोडे. म्हणून बाकीच्या अज्ञ आणि अमार्मिक लोकांच्याकरितां त्या हस्तकौशल्यांतील सौंदर्याची वर्णनें कोणी तरी शब्दांनीं स्पष्ट करून सांगणे अत्यंत अवश्य असते. काव्याच्या स्पष्टीकरणासाठी एक वेळ चित्रे नसली तरी चालतील; पण चित्रांच्या स्पष्टीकरणासाठी काव्य असणें अत्यंत आवश्यक आहे. बहुतेक गांवढळ कवींची काव्यें ही उत्तानार्थकच असतात; आणि त्याही उथळ काव्यांतील गूढ रहस्ये लोकाना समजली नसतील; अशा भीतीने काव्यकारच अतिशय उल्लूपणाने आपल्या तुटपुंज्या कार्यांतील उदात्त स्थळें विस्तृत करून सांगण्याला उतावीळ झालेले असतात. आपल्या काव्यांतील व्यंग्य आपणच उघडे करून न दाखवितां ते शक्य तितक्या कौशल्यानें झांकून ठेवण्याकडेच आपला कल असावा, हे काव्यांतील उत्तमपणाचें लक्षण फारच थोडे लोक जाणतात. आणि म्हणूनच काव्यशास्त्रामध्यें उत्तम, मध्यम आणि अधम, असे जे काव्याचे तीन भेद करण्यांत आलेले आहेत, त्यांपैकी तिसऱ्या वर्गाच्या डब्यामध्येच बहुतेक उतारूंची गर्दी झालेली असते. आणि पहिल्या वर्गाच्या डब्यामध्यें बसणारे उत्तम प्रकारच्या ध्वनिकाव्यांचे कर्ते असे फारच थोडे कवि आढळतात. पण अशा लोकांच्या काव्यांमधूनच कोणता अर्थ व्यंजित केलेला आहे, हें सांगण्याकरितां टीकाकारांची आवश्यकता साहित्यशास्त्रामध्यें उत्पन्न होते. परंतु साहित्यशास्त्रामध्यें ध्वनिकाव्यांच्या सारख्या कांहीं थोड्या

ठिकाणीं टीकाकारांची आवश्यकता भासत असली, तर या चित्रकलेच्या शास्त्रामध्यें प्रत्येक ठिकाणीच टीकेची आवश्यकता भासते. कारण, काव्याच्या क्षेत्रांत कांही थोडीशींच काव्यें मात्र आपल्यांतील रहस्य गूढ ठेवण्याला उद्युक्त झालेली असतात. पण या चित्रकलेच्या क्षेत्रामध्यें जिकडे पाहावें तिकडे सर्वत्रच व्यंजनावृत्ति पसरलेली दिसते कारण, रंगाचीं चित्रें, दगडाच्या मूर्ति, किंवा स्थापत्याची मंदिरें, यांपैकी कोणीही—एखाद्या उत्कृष्ट कालिदासाप्रमाणे—आपल्यांतील गुण आपल्या तोंडानें बोलून दाखविण्याला केव्हांच तयार नसतात त्यांच्यांतील एक अक्षरही वाच्यार्थानें समजण्यासारखें नसून त्यांच्यांतील सगळा भावार्थ आपण व्यंजनावृत्तीनेंच जाणून घेतला पाहिजे. या हस्तकौशल्याच्या कृतींमधील रेषांची आणि रंगांची भाषा पुष्कळांना परिचित नसते; आणि आपले अभिप्राय व्यक्त करण्याची त्यांची परिभाषा फारच थोडक्यांना अवगत असते. यासाठीं अशा कृतींना टीकेच्या साहाय्याची फार आवश्यकता असते. या हस्तकौशल्याच्या कृतीचे कारागीर आपल्या कृतीमध्यें आपल्या कौशल्यानें एक प्रकारचें चैतन्य उत्पन्न करीत असतात. त्यांमध्यें ते आत्मरस ओतीत असतात, आणि आपल्या कृतीच्या मध्यभागीं ते एक अंतःकरणही घालून ठेवीत असतात. चांगल्या कारागिरांची कृति ही अशा रीतीनें नेहमी सजीव झालेली असते. पण एखादा गैरमाहीतगार मनुष्य त्या चित्रापुढे किंवा मूर्तीपुढें उभा राहिला, तर आपल्यासमोरचा कागद किंवा दगड हा निर्जीवच आहे, असें तो समजतो. आणि एका निर्जीव दगडासमोर दुसरा दगड उभा राहिला, तर तेथे गुणग्राहकतेची पाकपरिनिष्पत्ति काय होऊं शकणार आहे? पण वास्तविक स्थिति अशी असते की, तें सगळे चित्र आपल्याशीं बोलत असतें. पण त्याचें बोलणें ज्यांना समजेल असे कान मात्र आपल्याजवळ असले पाहिजेत. चांगल्या चित्रकाराचें चित्र, किंवा चांगल्या शिल्पकाराची मूर्ति, यांच्यांतील प्रत्येक अवयव चैतन्ययुक्त बनलेला असतो. पण तें चैतन्य अर्धोन्मीलित असतें. त्याला पूर्णत्वाला नेऊन पोंहोचविण्यासाठी प्रत्येकानें आपल्या बाजूच्या अर्ध्या मर्मज्ञतेच्या भागाची भर त्यामध्यें घातली पाहिजे. व यासाठींच अशा चित्रांसंबधानें टीकेची आवश्यकता असते. चित्रकार एकाच

कागदाच्या किंवा कापडाच्या पातळीवर भिन्न भिन्न प्रकारचे उंचसखल भाग रंगाच्या साहाय्यानें दाखविण्याचा प्रयत्न करीत असतो. ह्या त्याच्या अडचणी लक्षांत घेऊन आपण त्याच्या कल्पना समजून घेण्याला त्याला मदत केली पाहिजे. एखाद्या काव्यांत एखादा कवि आपल्या शब्दांनी जसे नाना प्रकारचे मनोविकार प्रदर्शित करतो, तसे तो चित्रकार आपल्या चित्राच्या चेहऱ्यावरही प्रदर्शित करीत असतो. आनंद, खिन्नता, कामुकता, क्रोध, मत्सर, द्वेष, इत्यादि निरनिराळ्या प्रकारच्या मनोविकारांच्या छटा अशा चित्रांतून फार सूक्ष्मतेनें दाखविलेल्या असतात. पण त्या समजण्याला आपण आपलें मनही तितकेंच सूक्ष्म केलें पाहिजे. व यासाठींच चित्रकलेवरील टीकेची आवश्यकता आहे.

आपल्या इकडे चित्रकला आणि शिल्पशास्त्र या दोन्ही ही कला फार पूर्वीपासून प्रचलित आहेत. मनुष्य उन्हांत उभा राहिला असतां त्याची सावली पडते, किंवा तो पाण्याच्या कांठी उभा राहिला असतां त्या पाण्यामध्यें त्याचें प्रतिबिंब पडलेलें दिसतें. यावरून अगदीं पुरातन काळच्या पहिल्या मनुष्याला चित्रकलेची कल्पना मिळालेली असली पाहिजे, असें दिसतें. प्रत्येक कला ही बहुधा सृष्टिधर्माच्या अनुकरणानेंच उत्पन्न झालेली असते. सावलीवरून बाह्य रूपरेषा रेखाटण्याची कल्पना ही अगदीं प्राथमिक अवस्थेमधील चित्रकला असली पाहिजे. आणि मनुष्याच्या रानटी अवस्थेमध्यें जेव्हां त्याचें शब्दशास्त्र हल्लीच्याप्रमाणें पूर्ण कार्यक्षम झालेलें नव्हतें, तेव्हां त्याला आपले व्यवहार या प्राथमिक चित्रकलेच्या साहाय्यानेंच करावे लागत असले पाहिजेत, असे कित्येक प्रमाणांवरून दिसून येतें. कारण, चिनी वगैरेसारख्या भाषांमधून आज जे कित्येक शब्द लिहिले जात आहेत, ती त्या शब्दांच्या उच्चारांतील अक्षरें नसून त्या शब्दांनी द्योतित होणाऱ्या वस्तूचीं चित्रेच आहेत, ही गोष्ट महशूर आहे. यावरून चित्रांच्या ओबडधोबड आकृतीचा अक्षरांच्या पूर्वी उपयोग करण्यांत येत असला पाहिजे, हें उघड होतें; व या ओबडधोबड आकृतीमध्यें कालांतरानें मूळ वस्तूंचा हुबेहुबपणा आणण्याची कला वृद्धिंगत झाली असली पाहिजे. पण चित्रकलेची परिपूर्णता ही नुसत्या रेखांच्या आकृतीनी संपन्न होणें शक्य नाहीं. त्यांत रंगाची भर घातल्याशिवाय तें चित्र अपूर्णच राहणार. सूर्याच्या

प्रकाशांत पडणारी एखाद्या झाडाची सावली ही जरी नुसती रेखामात्रच असली, तरी त्या सावलीचें मूलभूत असें जें झाड त्यांत नुसत्या रेखाच असतात असें नाहीं. तर त्या झाडाचें सगळें सौंदर्य त्या झाडांतील निर-निराळ्या रंगांनी त्याच्यामध्यें उत्पन्न केलेलें असतें. व तें आपल्या चित्रामध्यें कसें आरण आणलें पाहिजे. अशी महत्त्वाकांक्षा चित्रकाराच्या मनामध्यें साहजिकपणें उत्पन्न होते. हा पहिला मानवी चित्रकार आपलें रंगांचें काम कोणापासून शिकला असावा ? याचा गुरु कोण असला पाहिजे ? तर एकनाथमहाराजांनी आपल्या एका अभंगांत वर्णन केल्याप्रमाणे सूर्याच्या किरणांनी ढगांच्या पृष्ठभागावर इंद्रधनुष्याचे रंग भरणारा प्रत्यक्ष परमेश्वर हाच त्याचा गुरु असला पाहिजे. एकनाथ त्या अभंगांत म्हणतात:—

देव रंगारी रगारी ।। त्रिभुवनाचा रंग करी ।।
लक्ष चोऱ्यायशीचे ठसे ।। वेगळाले केले कसे ।।

परमेश्वर हा एक मूर्तिकारही आहे आणि एक रंगारीही आहे, हें जे एकनाथांनीं येथें काव्यात्मक वर्णन केलें आहे, ते किती तरी हृदयंगम आहे ! या अभंगांतील वेदान्ताच्या आणि सृष्टपदार्थशास्त्राच्या नियमा-प्रमाणें परमेश्वर हा पहिला शिल्पकार आणि पहिला चित्रकार होय. आणि त्याचीं चित्रें व त्या चित्रांवरील त्याचे रंग पाहून मनुष्य आपली चित्रें काढून ती रंगवूं लागला असला पाहिजे,अशा आपल्या गुरूच्या हातच्या सृष्ट-पदार्थाच्या नानाविध सुंदर तसबिरी आपल्या डोळ्यापुढे ठेवून आपल्या आर्यावर्तांतील जे चित्रकार आपल्या कलेचा व्यासंग करूं लागले, त्यांनीं ती कला पूर्वीच्या काळांत परमावधीला नेऊन पोंहोचविली असली पाहिजे, याबद्दल शंका नाहीं. या कलेच्या कौशल्याची निदर्शक अशीं पुष्कळ उदाहरणें आपल्या प्राचीन इतिहासांतून व पुराणांतून आपल्याला पाहावयाला सांपड-तात. महाभारतांतील मयासुराचें शिल्पशास्त्रविषयक नैपुण्य किती होतें, हें आपणां सर्वांना माहीतच आहे. हरीवंशामध्यें बाणासुराची जी गोष्ट आहे, तिच्यामध्यें त्या वेळच्या चित्रकलेच्या प्रगतीचा एक उल्लेख जो एका प्रसंगानें आलेला आहे, तोही मननीय आहे. बाणाची मुलगी उषा हिनें आपल्या स्वप्नामध्यें कोणी एक सुंदर पुरुष पाहिला, पण तो कोण हें तिला जागृतीमध्यें निश्चित करण्याला कांही मार्ग सांपडेना. तेव्हां अन्वर्थक नांव

धारण करणारी तिची चित्रलेखा या नांवाची जी एक मैत्रीण होती, तिनें त्या वेळच्या अनेक सुंदर पुरुषांचीं चित्रें हुबेहुब काढलीं व त्यातून उषेनें आपला प्रियकर अनिरुद्ध हा ओळखून काढला. अशा प्रकारची पौराणिक काळापासून आपल्यांत चालत आलेली जी आपली चित्रकलेची परंपरा, ती जुनी देवळें, जुने राजवाडे, जुन्या गुहांतील लेणीं, वगैरे ठिकाणांमधून अजूनही आपल्या दृष्टोपत्तीस येते. प्राचीन काळी कांहीं लोक जेव्हां गुहांमधून राहत असत, तेव्हां त्यांनीं त्या गुहांतील लेण्यामधून जीं चित्रांची आणि मूर्तीची कामें करून ठेवलेलीं आहेत, तीं खरोखर आश्चर्यकारक आहेत. देवतांच्या मूर्ति आणि देवतांची मंदिरे, याच्या द्वारानें आपल्या धार्मिक भावनांनीही आपल्या शिल्पशास्त्राच्या प्रगतीला पुष्कळ साहाय्य केले आहे. बौद्ध, जैन, मुसलमान, वगैरे आर्यधर्माहून भिन्न अशा धर्माचे लोक जरी हिंदुस्थानांत उत्पन्न झाले, तरी शिल्पशास्त्राच्या आणि चित्रकलेच्या बाबतीत सगळ्याचा धर्म एकच होता. उत्तर हिंदुस्थानांत आर्यन सस्कृतीच्या योगानें या कलांना ज्या वेळीं उत्तेजन मिळत होतें, त्याच सुमाराला दक्षिण हिंदुस्थानांत द्रविडियन संस्कृतीच्या जोरावर शिल्पशास्त्रांतील अत्यंत अद्‌भुत व आश्चर्यकारक अशा मूर्तीच्या आणि मंदिरांच्या प्रचंड कल्पना मूर्त स्वरूपामध्ये आणण्यांत येत होत्या. अशा रीतीनें ज्या कला आपल्यामध्यें उन्नतावस्थेला जाऊन पोंहोचलेल्या आहेत, त्यांतील रहस्याचा आस्वाद घेण्याची योग्यता आपल्यामध्यें उत्पन्न होण्यासाठी या चित्रकलेवरील आणि शिल्पकलेवरील टीकेच्या शास्त्राची आपल्याला आजकाल फार आवश्यकता आहे. काव्यनाटकादिकांवर जशा टीका केल्या जातात, तशा निरनिराळ्या चित्रांतील गुणदोषांचें आविष्करण करणाऱ्या टीका लिहिल्या गेल्या, तर त्यापासून चित्रकलेचा तर फायदा होईलच होईल, पण त्यापासून हल्लीच्या आपल्या ललित वाङमयामध्येंही एका नवीन विषयाची भर पडल्यासारखें होईल. चित्रांची काव्याइतकीच मोठी योग्यता असते; आणि चित्रकार हे एक प्रकारचे कविच असतात. कवीची कल्पकता चित्रकाराच्या मनांत असल्यावांचून त्याचें चित्र चांगलें वठावयाचेंच नाहीं. कल्पनेच्या अत्युच्च भराऱ्या या कवि आणि चित्रकार या दोघांनाही सारख्याच अवगत असतात. व या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास कवि

हा एक चागला चित्रकार असतो आणि चित्रकार हा एक चांगला कवि असतो. कालिदास हा आज जगामध्यें एक उत्तम कवि म्हणून सुप्रसिद्ध आहे; पण त्यानें मनांत आणलें असतें, तर तो एक उत्तम चित्रकार म्हणूनही तितकाच प्रसिद्धीला आला असता. व चित्रकलेच्या अभिज्ञतेचा हा कालिदासाचा गुण त्याच्या शाकुंतल नाटकामध्येंच आपल्याला पाहावयाला सांपडतो. त्या नाटकाच्या सहाव्या अंकामध्यें दुष्यंतानें शकुंतलेचें एक चित्र काढलेलें असल्याचा एक प्रसंग कालिदासानें आणिलेला आहे व त्या चित्राची पार्श्वभूमिका कशी असावी ह्यासंबंधानें कालिदासानें त्या ठिकाणीं

> कार्या सैकतलीनहंसमिथुना स्रोतोवहा मालिनी
> पादास्तामभितो निषण्णहरिणा गौरीगुरोः पावनः ।
> शाखालम्बितवल्कलस्य च तरोर्निर्मातुमिच्छाम्यधः
> शृङ्गे कृष्णमृगस्य वामनयनं कण्डूयमानां मृगीम् ।।

या सुंदर श्लोकानें आपली कल्पना व्यक्त केली आहे. याच्यापेक्षां जास्त चांगली पार्श्वभूमिका कोणता चित्रकार आपल्या कल्पनाशक्तीनें निर्माण करूं शकणार आहे ? चित्रकाराची सर्व कांही बारकाई कवीच्या या शब्द-चित्रामध्ये आलेली आहे. आणि कालिदासानें या श्लोकामध्यें शब्दानें जें वर्णिले आहे, तें त्यानें आपल्या चित्रफलकावर आपल्या रंगाच्या कलमानेंही तितक्याच उत्तम रीतीनें रंगविलें असतें, याबद्दल शंका नाही. सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक, टॉमस कार्लाईल, यानें आपल्या "हीरो वर्शिप" नामक ग्रंथामध्ये हेंच तत्त्व प्रतिपादित केलें आहे कीं, जी बुद्धीची विशालता एखाद्या प्रसिद्ध पुरुषाच्या ठिकाणी एखाद्या विशिष्ट कार्यात आज प्रकट झालेली आपल्याला दिसत असते, तीच बुद्धीची विशालता त्यानें दुसऱ्या एखाद्या कामांत खर्च केली असती, तर त्या कामांतही तो तितक्याच उत्कृष्टतेला जाऊन पोंहोचला असता. आणि हेंच कार्लाईलचें तत्त्व कवि आणि चित्रकार यांच्या बाबतीमध्येंही कसें लागू पडतें, हें कालिदासाच्या वरील उदाहरणावरून स्पष्टपणें दिसून येतें.

सारांश, चित्र ही एक कविताच आहे. आणि त्या कवितेंतील काव्य हें एखादें सामान्य काव्य नसून तें ध्वनिकाव्य आहे. त्या चित्रस्वरूपी काव्या-

मध्ये सजीव मनुष्याच्या मनांतल्याप्रमाणेंच सुखदुःख, कामक्रोध वगैरे नाना प्रकारचे मनोविकार अनुच्चारित स्थितीमध्यें भरून राहिलेले असतात. त्यांचें उद्घाटन करण्याकरितां टीकाशास्त्राची फार आवश्यकता आहे. आपल्या मुक्या प्राण्यांचे मनोविकार कोणी बोलका प्राणी जगापुढे बोलून दाखवील काय, म्हणून हीं सगळीं चित्रें वाट पाहात बसलेली असतात. त्यांची आकांक्षा तृप्त करणें हें प्रत्येक सहृदय प्रेक्षकाचें कर्तव्यकर्म आहे. शिवाय या चित्रांतून जसे कांही गुण असतात, तसे त्यांच्यांत कांहीं दोषही अतर्भूत झालेले असतात. ते दोष टीकेच्या रूपानें दाखविले गेले असतां दुसऱ्या चित्रांतून तसले दोष उत्पन्न होण्याचा संभव उरणार नाही. म्हणून मानसशास्त्राचा आणि मनुष्यस्वभावाचा ज्यांना पूर्ण परिचय झाला आहे, अशा मर्मज्ञ लोकांकडून हे टीकेचें कार्य झालें, तर तें मार्गदर्शक झाल्यावाचून राहणार नाही.

अशा टीका सर्वच चित्रांवर करण्याची आवश्यकता नाहीं. हल्लीची चित्रे ही बहुतेक फोटोग्राफीने घेतलेली छायाचित्रेच असतात. तेव्हां अशा चित्रांच्या ठिकाणीं टीकेला फारच थोडा अवकाश असणार, हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. पण जीं चित्रें कल्पकतेच्या आणि प्रतिभेच्या अनुरोधानें काढण्यांत आलेली असतात, तींच चित्रें वर सुचविलेल्या टीकेला विषय होत. इंग्लंड, फरान्स, हॉलंड, इटली, वगैरे देशांतून आर्ट-गॅलरीज, रॉयल ॲकॅडमीज् वगैरेसारख्या चित्रकलेच्या उत्तेजनासाठी कायमच्या संस्था निर्माण करण्यांत आलेल्या आहेत, तशा आपल्या इकडे नाहीत. कांही कांही ठिकाणी चित्रांचीं प्रदर्शनें भरविण्यांत येतात; व औंध संस्थानचें अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांना या चित्रकलेची विशेष हौस असल्यामुळें त्यांच्या परिश्रमानें येथील कौन्सिल हॉलमध्यें वगैरे अलीकडे कांही चित्रांचे संग्रह प्रेक्षकांच्या मनोरंजनासाठी दाखविण्यांत येतात. पण याच्यापेक्षां जास्त कायम स्वरूपाच्या संस्था आणि चित्रांच्या नॅशनल गॅलरीज आपल्याकडे उघडल्या गेल्या पाहिजेत. आणि अशा या 'नॅशनल गॅलरीज'मध्यें ठेवण्याला योग्य अशी जी चित्रें ठरतील, त्यांची प्रतिकृति प्रसिद्ध करून त्यावर गुणदोषविवेचनात्मक टीका लिहिल्या गेल्या पाहिजेत; तरच त्या टीकांना कांहीं महत्त्व प्राप्त होईल, व त्याच टीका

उपयुक्ततेची योग्यता पावतील. अशा टीका करण्याला केवळ लेखन-व्यवसायाचेंच ज्ञान असून भागणार नाही. तर त्या लेखकांना चित्रकलेचेंही ज्ञान असणें आवश्यक आहे. असे दोन्ही गुण ज्यांच्या अंगामध्यें एकवटलेले आहेत, अशी श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांच्यासारखी कांहीं माणसें सुदैवानें आज आपल्यामध्यें आहेत. त्यांच्यासारख्यांनी हें कार्य हाती घेतलें, तर चित्रमय वाङमयावर त्यांचे फार उपकार होतील. हल्ली चित्रकला आणि शिल्पकला आपल्यामध्यें नाही, असें नाही; पण ती अंधारांत पडलेली आहे. तिच्यावर जर टीकात्मक विवेचनाचा प्रकाश कोणी मर्मज्ञ पाडतील, तर ती अंधारातील कौशल्ये उजेडांत येऊन स्वाभाविकपणेंच अधिक तेजस्वी दिसू लागतील.

---

## प्रणयिनीचा मनोभंग या चित्रावरील टीका : : ३

नोव्हेंबर १९२८ च्या अंकांत 'चित्रें आणि चित्रकलेची टीका' या विषयावर चित्रकलेच्या संबंधानें कांही विचार व्यक्त करण्यांत आलेले आहेत. त्यावरून चित्रकलेच्या संबंधाच्या टीकेची कशी व किती आवश्यकता आहे आणि त्यापासून चित्रकलेच्या आणि वाङमयाच्या अभिवृद्धीला कशी मदत मिळणें शक्य आहे, हें लक्षांत येण्यासारखें आहे. त्या दृष्टीनें 'रत्नाकर' मासिक पुस्तकाच्या १९२८ सालच्या जुलै महिन्याच्या अंकामध्यें 'प्रणयिनीचा मनोभंग' या नांवाचें जें एक सुंदर चित्र प्रसिद्ध करण्यांत आलें आहे, त्या चित्रासंबंधानें एक टीकात्मक लेख मर्मज्ञ वाचकांच्या पुढें सादर करण्याचें योजिलें आहे. अशा प्रकारचे उपक्रम वास्तविकपणें पाहिलें असतां चित्रकलेंतील अभिज्ञ आणि मर्मज्ञ अशा चित्रकार लेखकांकडूनच व्हावयाला पाहिजे आहेत. परंतु त्यांच्या अभावीं एखाद्या अनभिज्ञ आणि अमर्मज्ञ

लेखकानें त्या दिशेनें प्राथमिक प्रारंभ करण्याचा प्रयत्न केला, तर त्याच्या या असल्या चापल्याबद्दल कृपाळु वाचक क्षमा करतील, अशी आशा आहे.

## मूळ चित्राचा फोटो

आतां या चित्रावरील टीकात्मक विवेचनाला सुरवात करावयाची; परतु तसें करण्याच्या आधी येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. ज्या चित्रावर टीका करावयाची, तें चित्र 'रत्नाकर' मासिक पुस्तकाच्या जुलै १९२८ च्या अंकामध्यें प्रसिद्ध झालेलें आहे; आणि त्याच्यावरील ही प्रस्तुतची टीका जानेवारी १९२९ च्या अंकामध्यें प्रसिद्ध होत आहे. तेव्हां तें टीकाविषयक मूळ चित्र वाचकांच्या समोर प्रत्यक्ष असल्यावांचून टीकेच्या यथार्थतेची अथवा अयथार्थतेची जाणीव वाचकांना होण्याला अवघड जाईल. यासाठीं त्या चित्राच्या फोटोवरून एक लहान साइझचा ब्लॉक तयार करून तो या अंकामध्यें या लेखाबरोबर देण्यांत आलेला आहे. त्यावरून वाचकांना सामान्य कल्पना येण्यासारखी आहे. तरी पण या चित्रांतील सौंदर्याची सपूर्ण कल्पना येण्याकरितां शक्य असेल तर वाचकांनी तें मूळचें जुलैच्या अंकांतील चित्रच आपल्यापुढें ठेवणें आवश्यक आहे. या अकांतील चित्रापेक्षां त्या मूळ चित्राचा आकार मोठा आहे; त्या चित्रांतील सगळी बॅकग्राउंड या चित्रांत आलेली नाही; आणि शिवाय तें चित्र तीन रगांत असल्यामुळें त्याच्यांतील सौंदर्य जसें खुलून दिसतें, तसें तें या चित्रामध्यें दिसणें शक्य नाही. तरी पण सामान्य कार्यभाग पूर्ण करून घेण्याला हें प्रस्तुतचें चित्र पुरेसें होईल. अशी आशा व्यक्त करण्याला कांहीं हरकत नाही.

## चित्राचें नांव

गेल्या जुलैच्या 'रत्नाकर'च्या अंकामध्यें जें चित्र दिलेलें आहे, त्याचें नाव 'प्रणयिनीचा मनोभंग' असें आहे हे चित्र प्रस्तुतच्या टीकेचा विषय म्हणून घेण्यांत येत आहे. 'प्रणयिनीचा मनोभग' हें या चित्राचे मराठींतील नांव आहे. पण या चित्राचें मूळचें नांव 'Letter-hit' असें आहे. हे मनोवेधक चित्र ज्या एका सुदर स्त्रीचें आहे, ती एक हिंदी स्त्री आहे; व हें चित्र काढणारे चित्रकार, श्रीयुत ठाकूरसिंग (कलकत्ता), हेही एक हिंदी चित्रकार आहेत असें असतांना (हें चित्र मूळचें इंग्रजी नसून स्वतत्र कल्पनेनें निर्मिलेलें आहे, अशा समजुतीनें पाहतां) या चित्राला

'Letter-hit' असें इंग्रजी नांव दिलें जावें, याबद्दल कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. पण या आश्चर्यकारक गोष्टीचें कारण शोधून काढण्याकरितां आपल्याला फारसें दूर जावयास पाहिजे आहे असें नाहीं. हल्लीच्या मन्वंतराला अनुरूप अशीच ही गोष्ट आहे. हल्लींची अशी स्थिति आहे की, अलीकडच्या काळांतील बहुतेक चांगल्या चित्रांचें जें गुणग्रहण करण्यात येतें, किंवा त्यांना प्रदर्शनांतून जी पारितोषिके देण्यात येतात, त्या बाबतीत बहुतेक इंग्लिश लोकांच्याच गुणग्राहकतेचा आणि दातृत्वाचा संबध येतो. व त्या दृष्टीनें, आपली चित्रें असली तरी, त्यांना परकीय भाषेंतील इंग्रजी नावे देण्याला आपल्या चित्रकारांना प्रवृत्त व्हावे लागतें. वास्तविकपणें चित्रकलेकडे निव्वळ शास्त्रीय दृष्टीनें पाहिलें असतां चित्रांना एखादें शाब्दिक नांव देण्याची मुळी आवश्यकताच नाही. चित्रांतील परिस्थिति ही नांवावरून जाणावयाची नसून डोळ्यांनी पाहूनच तिचें आकलन करावयाचें असते. चित्र हा कानाचा विषय नसून तो प्रांत डोळ्याचा आहे. कानानें चित्राचें नांव ऐकण्यांत स्वारस्य नसून डोळ्यांनी पाहून चित्राचें नांव मनांत निश्चित करावयाचें असते. व अशा दृष्टीनें पाहिलें असतां एखाद्या चांगल्या चित्राला नांव असण्यापेक्षां तें नसलेलेच जास्त चांगलें. कारण, त्या योगानें त्या चित्राच्या परीक्षणाच्या कामी आपल्या मानसिक कल्पनांच्या व्यापाराला आणि विस्ताराला जास्त अवकाश सांपडतो. तेव्हां चित्राला नांव नसणें हा उत्तम पक्ष. परंतु जर नाव द्यावयाचेंच असेल, तर मग आपल्या देशी चित्राला एखादें परकीय इंग्रजी नाव असण्यापेक्षां तें स्वकीय आणि सुसंस्कृत असें नांव असावें, हेच जास्त योग्य होय. आणि या दृष्टीनें पाहता 'प्रणयिनीचा मनोभंग' हें नांव 'Letter-hit' या नांवापेक्षां निखालसपणें जास्त चांगलें आहे. कारण, 'प्रणयिनीचा मनोभंग' या नांवामध्यें त्या प्रणयिनीची निराशापूर्ण मनःस्थिति प्रतिबिंबित झालेली आहे. आणि 'Letter-hit' या नांवानें त्या मनःस्थितीचें फक्त कारणच काय तें दिग्दर्शित केलें जाते. आणि या चित्रांतील भावार्थाच्या प्रदर्शनाच्या दृष्टीनें पाहिलें असतां कारणापेक्षां कार्याच्या प्रकटीकरणाचीच आवश्यकता जास्त आहे, हें कोणाच्याही लक्षात येण्यासारखें आहे.

## चित्र हें एक काव्यच आहे

चित्र हें एक अशब्दरचित काव्यच आहे. आणि ज्या काव्यामध्यें रस असेल, तें काव्य उत्तम. त्याप्रमाणें चित्राच्या बाबतीतही असें विधान करतां येण्यासारखें आहे कीं, ज्या चित्रामधून रसाची प्रतीति होईल, तें चित्र उत्तम होय. जशीं कित्येक काव्यें रसहीन असतात, त्याचप्रमाणें कित्येक चित्रेंही रस-हीन असतात. आणि असल्या रसहीन चित्रांचें कोणी कौतुकही करीत नाहीत. आतां सगळीच चित्रें म्हणजे कागदावर किंवा कापडावर कांही तरी वेड्या-वांकड्या काढलेल्या रेघोट्याच होत. त्या रेघोट्यांचा आणि आपल्या मना-मध्यें रसोत्पत्ति होण्याचा काय संबध असावा, हें सकृद्दर्शनी कदाचित् कोणाच्या लक्षांत येण्यासारखें नसेल. पण ही गोष्ट कशी संभवनीय होते, हें दुसऱ्या कांही दृष्टान्तांवरून लक्षांत येण्यासारखें आहे. दोरी म्हणजे कांहीं सर्प नव्हे, किंवा मृगजळ म्हणजे कांही पाणी नव्हे. त्याचप्रमाणें रामाचें सोंग घेणारा नट हाही कांही तो खरा मूळचा दाशरथि राम नव्हे. तरी पण सादृश्याच्या योगाने दोरीच्याही ठिकाणीं सर्पाचा भास उत्पन्न होतो. मृगजळ पाहूनही हें पाणीच असले पाहिजे असें वाटतें, आणि एखाद्या नाटकांतील नटाच्या बाबतीतही हा कोणी तरी नट नसून रामच असला पाहिजे, अशी प्रतीति होऊं लागते. या सर्व गोष्टी अनुभवसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें कागदा-वर ओढलेल्या रेघाच का असत ना, परंतु त्या अनेक रेघांच्या संयोगापासून जें एखाद्या विवक्षित वस्तूचें सादृश्य निर्माण होतें, त्याच्या योगानें त्या रेघां-पासूनही त्या वस्तूची प्रतीति होणे शक्य आहे आणि अशा रीतीनें निर्माण केलेल्या एकाद्या सुंदर चित्रामध्यें जर त्यांतील मनोविकार चांगल्या रीतीनें चित्रित केलेले असतील, तर त्यांचें स्वसदृश प्रतिबिंब आपल्या मनामध्यें उमटणें हेंही अगदी स्वाभाविक आहे. दुष्यंताचें सोंग घेणारा नट शकुंतलेच्या विरहासाठीं शोक करीत असलेला पाहून आपल्याला वाईट कां वाटतें, आणि आपल्याला रडूं कां येतें ? ज्या नटाने दुष्यंताचें सोंग घेतलेले असतें, त्याचा शकुंतलेपासून कधीं विरह झालेला नसतो; व त्याला त्या खोट्या विरहा-बद्दल कधी खरा शोकही होत नसतो. पण असें असतानाही त्या नाटकांतील दुष्यंताचा शोक पाहून आपल्या मनामध्यें करुण रसाच्या ऊर्मि उचंबळूं लागतात. आणि एकादें भावप्रधान चित्र पाहिलें असतांही आपल्या मनाची

तशीच स्थिति होऊन जाते. आणि अशा रीतीनें चित्रदर्शनापासूनही सत्य आणि साक्षात् रसोत्पत्ति संभवूं शकते.

दर्शनसुखमनुभवतः साक्षादिव तन्मयेन हृदयेन ।
स्मृतिकारिणा त्वया मे पुनरपि चित्रीकृता कान्ता ।।

या शाकुंतल नाटकाच्या सहाव्या अकांतील आर्येमध्यें कालिदासानें चित्रांपासूनही साक्षात् रसाची प्रतीति कशी होते, याचें उत्कृष्ट वर्णन केलेलें आहे. त्याचप्रमाणें—

वत्सैतस्माद्विरम विरमातः परं न क्षमोऽस्मि
प्रत्यावृत्तः पुनरिव स मे जानकीविप्रयोगः ।

या उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकांतील चरणद्वयामध्यें श्रीरामचंद्र चित्रपट पाहात असतांना त्याच्या अतःकरणाची कशी तदाकार वृत्ति झाली होती, व त्या चित्रपटांतील चित्रांनी त्याच्या मनामध्यें साक्षात् रसाची प्रतीति किती प्रत्यक्षत्वानें उत्पन्न करून दिली होती, याचें उत्कृष्ट शब्दचित्र भवभूतीनें काढिलेलें आहे. सारांश, एखाद्या काव्याप्रमाणेंच सुदर चित्रें हींही प्रेक्षकांच्या अंतःकरणामध्यें रसाचा प्रादुर्भाव उत्पन्न करण्याला समर्थ असतात. आणि काव्याच्या श्रवणाप्रमाणेंच एखाद्या संदर चित्राच्या दर्शनानेंही रस उत्पन्न होऊन तो आपल्या हृदयामध्यें प्रवेश करतो, आपलीं सर्व अंगे व्यापून टाकतो, आणि बाकीच्या सर्व गोष्टीचे विचार बाजूला सारून तो आपल्या अतःकरणामध्यें पूर्ण तन्मयता प्रस्थापित करतो. अशी मनःस्थिति निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्या चित्रांमध्यें असतें, ती चित्रेंच उत्तम ध्वनिकाव्ये होत. राजा रविवर्मा यांनी काढलेलें 'शकुंतलाजन्म' हें चित्र अशाच कोटीमध्यें समाविष्ट करण्याच्या योग्यतेचें आहे. आणि अशा जातीच्या इतर अनेक चित्रांप्रमाणें 'प्रणयिनीचा मनोभंग' हें चित्रही या वर्गांत पडण्याला पात्र आहे, यांत संशय नाही. कारण, हें भावप्रधान चित्र आहे. यांतील मनोविकार उत्कटतेनें दाखविलेले आहेत. आणि त्यांच्यापासून अनुमानानें जी व्यजना उत्पन्न होते, तीही फार आल्हाददायक आहे.

## या चित्रकाव्यांतील रस विप्रलंभशृंगार हा आहे

आतां जर चित्रांतही काव्यातल्याप्रमाणे रस असू शकतो, तर मग 'प्रणयिनीचा मनोभंग' या चित्रात्मक काव्यामध्ये कोणता रस द्योतित केलेला आहे, असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. आणि या प्रश्नाचे उत्तर असें आहे की, या चित्रामध्ये विप्रलंभशृंगार अथवा करुणविप्रलंभ, हा रस आहे. शृंगार रसाचेच संभोगशृंगार आणि विप्रलंभशृंगार असे दोन भेद आहेत. या दोन भेदांपैकी संभोगशृंगार हा काव्यांत काय किंवा चित्रात काय, नीतिमत्तेच्या नाजुकपणाच्या कारणामुळें उत्कटतेनें दाखविण्याला नेहमीच पुष्कळ गैरसोयीचा असतो. त्याच्यापेक्षां विप्रलंभशृंगार हा कवीला आणि चित्रकाराला दोघानाही आपल्या अंगचें कौशल्य दाखविण्याला जास्त चांगल्या रीतीनें उपयोगी पडण्यासारखा असतो. त्यामध्यें शृंगारालाही यथावकाश जागा असते; आणि करुणरसानेंही त्याच्यामध्यें जास्त माधुर्य उत्पन्न करितां येते. या तत्त्वाप्रमाणें शृंगार आणि करुण या दोन्ही रसांचें मिश्रण या प्रस्तुतच्या चित्रामध्ये फार मार्मिकपणानें करण्यांत आलेलें आहे. आतां या विप्रलंभशृंगाराचें आलंबन अशी जी ही प्रस्तुत चित्रांतील प्रणयिनी, तिच्या या विप्रलंभशृंगाराच्या प्रसंगामध्यें कोणकोणती उद्दीपने उपस्थित झालेलीं आहेत, हे पाहण्याकरितां आपण या चित्राच्या सूक्ष्म परीक्षणाकडे वळणें जरूर आहे. व तशा दृष्टीने परीक्षण करीत असतांना त्या ओघामध्यें जे कित्येक महत्त्वाचे प्रश्न उपस्थित होतात, त्यांच्या निर्णयाकडेही आपण वळणें जरूर आहे.

## अनुमानाचा उपयोग

कागदावरील चित्रें ही आपण होऊन कांही बोलत नाहींत. ती मुकी असतात. या नियमाप्रमाणें या चित्रांतील ही नायिका मी अमुक अमुक प्रकारची तरुणी आहे असें आपल्या मुखानें कधीही सांगणार नाहीं. तर असल्या गोष्टी प्रेक्षकांनीं आपल्या अनुमानांनीच ठरवावयाच्या असतात. आणि हीं अनुमानें जितकीं जितकीं जास्त बरोबर, तितका तितका त्या चित्रांतील रसस्वाद अनुभवितांना आपल्या मनाला जास्त आनंद वाटतो. अत्यंत रसास्वाद हा व्यंजनावृत्तीपासूनच उत्पन्न होतो. आणि ती व्यंजना अनुमानापासून निर्माण होते. आणि म्हणून असल्या बाबतींमध्यें अनुमानांना

एक प्रकारचें विशेष महत्त्व प्राप्त होतें. असल्या अनुमानांच्या बाबतींत एका दरवेशाची आणि एका उटाची गोष्ट सुप्रसिद्ध आहे. त्या दरवेशानें तो उंट कधीही पाहिलेला नव्हता; तरी पण त्याचा पुढला दांत पडलेला असावा, त्याचा उजवा डोळा आंधळा असून त्याचा डावा पाय लगडा असला पाहिजे, त्याच्या पाठीवरच्या एका बाजूला गहूं असून दुसऱ्या बाजूकडे मधासारखा कांहीं तरी गोड पदार्थ लादलेला असला पाहिजे, वगैरे गोष्टी त्या दरवेशानें बरोबर जाणल्या होत्या. आणि या त्यानें प्रत्यक्ष दर्शनाने नव्हे, तर केवळ अनुमानानें जाणलेल्या होत्या. आणि यांतच त्याचें चातुर्य होते. त्याप्रमाणें प्रस्तुत चित्रांतील प्रणयिनी ही कोण आहे? कोठील आहे? ती कोणत्या वयाची आहे? तिचा मनोभग कशानें झालेला आहे? इत्यादि उद्‌भवणाऱ्या अनेक प्रश्नांची प्रत्यक्ष माहिती आपल्याला बिलकूल नाही. व ती आपल्याला सांगावयालाही येथें कोणी नाही. आणि ती कोणी प्रत्यक्ष सागितली, तर मग त्यांत कांहीं चमत्कारही उरणार नाहीं. आपल्या अनुमानांनी ती सर्व माहिती आपण निश्चित केली, तर त्यांतच चमत्कार आहे, त्यांतच आनंद आहे आणि त्यांतच व्यंजनावृत्तीचें सार्थक आहे. आणि म्हणून असले निरनिराळे प्रश्न उपस्थित करून त्याची समर्पक उत्तरे शोधून काढण्याचा आपण येथें यथामति प्रयत्न करूं.

### मध्यमा

सामान्यतः नायिकांचे त्यांच्या वयाच्या मानानें बाला, मध्यमा, प्रौढा, असे 'सापि कथिता त्रिभेदा मुग्धा मध्या प्रगल्भेति' यांत सांगितल्याप्रमाणें तीन विभाग मानण्यांत येतात. त्यांपैकी प्रस्तुत चित्रांतील मनोभग पावलेली नायिका ही कोणत्या वर्गांतील असावी? या चित्राच्या सभोंवताली जी परिस्थिति दाखविलेली आहे, त्या परिस्थितीवरून ही 'बाला' असणें शक्य नाही. शिवाय या चित्रामध्यें जी थोड्याशा क्रोधाची आणि खिन्नतेची छटा स्पष्टतेनें दाखविलेली आहे. तितकीही बाल्यावस्थेंतील नायिकेच्या ठिकाणीं व्यक्त करण्याची प्रवृत्ति असणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें या चित्रांतील नायिकेचें जें अवयवसौष्ठव दाखविण्यांत आलेलें आहे, त्यावरून ती फारशी प्रौढही नसावी, हें व्यक्त होत आहे. तेव्हां

ती बाला किंवा प्रौढा नसल्यामुळें ती मध्यम नायिकेच्या वर्गांतीलच असावी, हें स्पष्ट होत आहे. बाल्यांतील कृशता तिच्या अंगांतून गेलेली आहे आणि प्रौढपणांतील स्थूलत्व अद्यापि तिच्या अंगामध्यें उत्पन्न झालेले नाही. त्याचप्रमाणें बाल्यावस्थेतील लाजाळूपणा आणि प्रौढावस्थेंतील बेपर्वाई या दोहोंचाही अभाव या चित्रात दिसून येत असून त्या दोहोच्या मधली मन:स्थिति मात्र यांत व्यक्त होत आहे. आणि यावरूनसुद्धां ही सुनारें चौवीसपंचवीस वर्षाच्या वयाची मध्यमा नायिका असावी, असे अनुमान केलें असतां तें अन्यथा होईल, असें दिसत नाहीं.

## स्वकीया किंवा परकीया ?

बाला, मध्यमा, आणि प्रौढा हे नायिकांचे त्यांच्या वयाच्या दृष्टीनें जसे तीन विभाग होतात, त्याचप्रमाणें नायिका ही स्वकीया आहे किंवा परकीया आहे, अशा दृष्टीनेंही साहित्यशास्त्रकारांनी विभाग कल्पिलेले आहेत. त्या दृष्टीनें पाहतां ही प्रस्तुतची नायिका कोणत्या वर्गातील असावी ? म्हणजे ही प्रणयिनी आणि हिचा प्रणयी प्रियकर यांच्यामध्यें पतिपत्नीभाव असावा, किवा अन्य कांही संबंध असावा ? शिवाय आणखीही एका दृष्टीने अष्टनायिका म्हणून आठ नायिकांचे प्रकार मानण्यांत आलेले आहेत. त्या आठ प्रकारामध्यें स्वाधीनपतिका, अभिसारिका, वासकसज्जा, इत्यादि भेद येतात. यांपैकी प्रत्येक प्रकारची उत्कृष्ट वर्णनें जयदेवाच्या 'गीतगोविंदा'मध्यें देण्यांत आलेलीं आहेत. त्या आठ प्रकारच्या नायिकांपैकी ही प्रस्तुतची नायिका कोणत्या प्रकारची असावी, असाही एक प्रश्न मनामध्यें उत्पन्न होतो. या प्रश्नाच्या उत्तरासंबंधानें अनुमान काढण्याला या चित्रामध्यें आपल्याला कांहीं साधनें उपलब्ध होतात काय, याचा आपण विचार करूं.

## रंगमहालांतील पलंग

या प्रणयिनीच्या चित्राच्या सभोंवतालची परिस्थिति आणि तिची स्वत:ची मन:स्थिति यांचें आपण वरील प्रश्नांच्या दृष्टीनें पर्यालोचन करूं लागलों, तर आपल्याला या बाबतींत काय आढळून येतें ? ही सुंदर कामिनी जेथें आहे, तो एक रंगमहाल असावा, असें दिसतें. त्या रंगमहालांतील एका पलंगाचा कांहीं भाग मात्र चित्रकारानें आपल्याला दाखविलेला आहे.

आतां हा जो पलंगाचा भाग आपल्याला दिसत आहे, ही उशाकड
बाजू आहे किंवा पायगतची बाजू आहे हा एक सूक्ष्म अवलोकन
निश्चित करतां घेण्यासारखा प्रश्न आहे. ही उशाकडची बाजू असतं
तर त्या पलंगाच्या गादीवरील उशाकडच्या बाजूला उशा, गिरद्य
वगैरे कांही आपल्याला दिसल्या असत्या. पण तशा त्या आपल्याला
चित्रामध्यें दिसत नाहीत. शिवाय पायगतच्या बाजूपेक्षां उशागतच्या बाज
कडील पलंगाच्या कठड्याला बहुधा कांही तरी जास्त नकशी असते. तश
नकशी या चित्रांत दाखविलेल्या पलंगाच्या कठड्यावर कांहीं एक दिस
नसल्यामुळें सुद्धां ही पायागतकडचीच बाजू असली पाहिजे, हें उघड आ
या स्पष्टपणें सिद्ध होणाऱ्या गोष्टीला एकाद्या प्रमाणाची आवश्यकता असेल
तर त्याला असेंही एक गमक आहे कीं, ही नायिका हल्लीं मनोभं
पावलेल्या स्थितीत आहे. तेव्हां तिच्या कामना जेव्हां पूर्ण होण्याचा संभ
नाहीं, तेव्हां तशा त्या निराशेच्या अवस्थेमध्यें खिन्न होऊन उभें राहण्यास
उशागतच्यापेक्षां पायगताचीच बाजू तिला जास्त अनुरूप नाही काय
असो. या पलंगाच्या संबंधानें आणखीही एक गोष्ट लक्षांत घेण्यासारख
आहे, ती ही कीं, हा पलंग अलीकडच्या पद्धतीचा असून त्याच्याव
शालीनतेच्या दृष्टीनें अवश्य असावयाला पाहिजे असलेले मच्छरदाणी
आच्छादन नाहीं.

## पलंगावरील बुरखा

आतां या पलंगावर पायगतच्या बाजूला लांकडी कठड्याच्या जव
काय दिसत आहे, हे आपण पाहूं. व तें निश्चित करण्याकरितां ही स्
कोणत्या प्रांतांतील असावी या प्रश्नाचाही येथें त्याच्या आधी आप
थोडासा विचार करूं. कानांत घातलेल्या इअररिंग्ज् आणि भांगा
घातलेला शेंदूर, हीं दोन चिन्हें सकृद्दर्शनीं या बाबतीत आपल्यापुढें येता
पण त्यांच्यापेक्षां जास्त महत्त्वाचें चिन्ह म्हटलें म्हणजे या स्त्रीच्या दोन
दंडांमध्यें असलेलीं विशेष प्रकारचीं कडीं हीं होत. असल्या प्रकारच
कड्यांच्या दोन्ही तोंडाला वाघाच्या तोंडाचे आकार केलेले असतात, म्हण
त्यांना व्याघ्रमुखी असें नांव देण्यांत येतें. कांहीं प्रांतांतून त्यांना नागमु
वेळा असेंही म्हणतात. हा दागिना घालण्याचा प्रघात आपल्या इक

फारसा नसून उत्तर हिंदुस्थानांतच तो जास्त प्रचारांत आहे. शिवाय या चित्राचे चित्रकार, श्रीयुत ठाकूरसिंग, हेही कलकत्त्याचे एक चित्रकार आहेत. त्यामुळें त्यांच्या मनांत त्यांच्या चित्राला विषयीभूत असणारी स्त्री उत्तर हिंदुस्थानांतील, किंबहुना, विशेषत: बंगाल्यांतीलच, असणें हें अगदीं स्वाभाविक आहे. आणि उत्तर हिंदुस्थानांत व बंगाल्यांत पडद्याची चाल आहे, हेंही सर्वांना माहीतच आहे. या पडद्याच्या वस्त्राला ओढणी, चादर, बुरखा, वगैरेसारखे शब्द तिकडे लावतात. आणि अशा प्रकारच्या बुरख्याला उपयोगी पडण्यासारखें हें एक विरविरीत जांभळ्या रंगाचें बुरख्याचें वस्त्र या पलंगाच्या पायगताशी असले पाहिजे असें दिसतें.

## परकीया आणि अभिसारिका

आतां हा आपल्या अंगावरचा बुरखा जर या विलासिनीनें आपल्या अंगावरून काढून पलंगावर ठेविलेला असेल तर यावरून पुढे आणखी काय बरें अनुमानें निघू शकतात ? ही स्त्री आपल्या घरांतल्या घरांतच जर असती, आणि ती ज्या या रंगमहालामध्ये आहे तो रंगमहाल जर तिच्या घरांतलाच असता, तर तिच्या अंगावरचा बुरखा या वेळी येथें या पलंगावर असणें संभवनीय होईल काय ? गोषामध्यें असणाऱ्या स्त्रियांनीं आपल्या घरांतल्या घरांत देखील बुरखा घेणें जरूर असतें काय ? निदान आपल्या स्वत:च्या घरच्या रंगमहालांत आपल्या पलंगावर विराजमान होण्याकरितां येणारी कोणतीही कामुक स्त्री आपला विरविरीत बुरखा पांघरून तेथे येईल. हे कोणाला केव्हांही संभवनीय वाटणार नाही. आणि यावरून जें एक अपरिहार्य अनुमान निघतें, तें हें कीं, ही स्त्री आपल्या अंगावर बुरखा घेऊन बाहेरून कोठून तरी या रंगमहालामध्यें आलेली असली पाहिजें; आणि तेथें आल्यानंतर तिनें तो आपल्या अंगावरचा बुरखा काढून या पलंगावर ठेविलेला असला पाहिजे. आणि हीं येथपर्यंतची अनुमाने जर बरोबर असतील, तर ही परकीय नायिका असून आपल्या नायकापाशीं रममाण होण्याकरितां

अभिसारयते कान्तं या मन्मथवशंवदा ।
स्वयं वाभिसरत्येषा धीरैरुक्तायिसारिका ।
अवगुंठनसंवीता कुलजाभिसरेद्यदि ।

इत्यादि वचनांनीं वर्णिलेल्या अभिसारिकेच्या वेषामध्यें ती या रंगमहालां-तील संकेतस्थळी प्राप्त झालेली असली पाहिजे, असें दिसतें. ही परकीय नायिका असावी, या अनुमानाला बळकटी आणाणारे आणखी एक सूक्ष्म प्रमाण या चित्रामध्ये दृग्गोचर होत आहे. या चित्रांत आपण असें पाहतों कीं, या सुंदरीच्या उजव्या हाताच्या करंगळीमध्ये एक हिऱ्याची अंगठी आहे. आणि ही अंगठी ऊजव्या हातांत आहे, हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. बहुदा असा संप्रदाय आहे की, गरती स्त्रिया हातात आंगठ्या घालावयाच्या झाल्या तर त्या उजव्या हातांत न घालतां डाव्या हातांत घालीत असतात. हा कांहीं अगदी बिनचूक नियम म्हणून येथें सांगण्यांत येत आहे, असें नव्हे. तरी पण या नेहमींच्या वहिवाटीनें वरील अनुमानाला कांहीं तरी बळकटी मिळते, यांत शंका नाही. याशिवाय दोन भिवयांच्यामध्यें लावलेले बारीक कुंकू, भांगामधील शेंदूर, कानांतील इअररिंग्ज्, गळयांतील फक्त एक दोनच माळा, ने लेलें गुलाबी जरीचें पातळ, इत्यादिकांवरूनसुद्धां वरील अनु-मानालाच पुष्टि मिळते.

## दिवस किंवा रात्र?

असो. याप्रमाणेंवरील प्रश्नांच्या संबंधाचीं अनुमानें निश्चित केल्या-नंतर या प्रणयिनीच्या मनोभंगाची ही वेळ कोणती असली पाहिजे, दिवस असावा किंवा रात्र असावी, या प्रश्नाचा आपण विचार करूं. या प्रश्नाचा निर्णय करण्याची मुख्य साधनें म्हटलीं म्हणजे या चित्रांत दिसून येणारा प्रकाश (Light) आणि छाया (shade) हीच होत. या चित्रांतील प्रकाश चित्रविषयक स्त्रीच्या समोरून किंचित् डाव्या हाताच्या बाजूनें येत आहे, हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. कारण, यासमोरून येणाऱ्या प्रकाशाच्या मुळेच पलंगाच्या खांबाची छाया या चित्रांतील प्रणयिनीच्या उरोभागावरून डाव्या हाताच्या खांद्यावर पडलेली आहे. त्याचप्रमाणें तिच्या हनुवटीची छाया तिच्या गळयाच्या मध्यभागापासून सुरू होऊन उजव्या कानांतील इअररिंगच्या खालपर्यंत पसरलेलो दिसत आहे. त्याच-प्रमाणें तिच्या डाव्या गालावर प्रकाशाची छटा जास्त दिसत असून तिच्या उजव्या गालावरील रंग छायेमुळें जास्त काळसर झालेला दाखविलेला आहे. यावरून डाव्या हाताच्या बाजूनें समोरून प्रकाश येत आहे, हें उघड आहे.

पण हा प्रकाश सूर्याच्या किरणांचा आहे किंवा दिव्याच्या किरणांचा आहे ? या बाबतीत तज्ज्ञ लोकांचें असें मत पडतें कीं, हा जर रात्रीचा दिव्याचा प्रकाश असता, तर त्याच्य मध्यें एकंदरीनें जास्त काळसरपणा यावयाला पाहिजे होता; म्हणून एकदर चित्रावरील प्रकाश पाहिला, तर तो दिवसाचाच असला पाहिजे, असें दिसतें. आतां एखाद्या अभिसारिकेच्या अभिसरणाला रात्रीची वेळ ही जरी जास्त अनुकूल असली, तरी 'गणयन्ति न शीतोष्णं रमणाभिमुखाः स्त्रियः' यांत म्हटल्याप्रमाणें कामवासनेचा उताविळपणा 'ही रात्र आहे किंवा दिवस आहे' हें पाहाण्याला थोडाच थांबत असतो! याशिवाय, दिव्याचा प्रकाश किंवा दिवसाचा प्रकाश, या शंकेचें निरसन करण्याला या चित्रामध्ये आणखी एक साधन आहे. तें असें कीं, या स्त्रीच्या डाव्या हातामध्यें एक पत्र आहे. आणि त्या पत्रांतील मजकूर वाचून तिचा मनोभंग होऊन तिनें आपला डावा हात निराशेनें आपल्या डोक्यावर धरलेला आहे. आणि या पत्राकडे आपण सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें, तर त्याच्यावर लिहिलेलीं कांही अक्षरेंही आपल्याला या चित्रांत दिसत आहेत. पण येथे हा रात्रीचा दिव्याचा प्रकाश असता, तर या प्रणयिनीच्या मस्तकावरील केशकलापाच्या पाठीमागें धरल्या गेलेल्या या पत्रावर तिच्या मस्तकाची छाया पडणे व त्यामुळे त्या पत्रांतील अक्षरें न दिसणें हें आवश्यक होतें. परंतु ती अक्षरें तर दिसत आहेत. तेव्हां ही गोष्ट दिवसाच्या प्रकाशांतच होणे शक्य आहे. आणि म्हणून या चित्रांत दाखविलेला हा प्रसंग दिवसाचाच असला पाहिजे, असे मानावयाला कांहीं हरकत नाहीं. व ही दिवसाचीच वेळ आहे, असें जर सिद्ध होत असेल, तर ही मत्त कामिनी परकीय नायिकेच्या वर्गांतील असली पाहिजे, हे जें वर एक अनुमान करण्यांत आलेलें आहे, त्याला या योगानें जास्त बळकटी येते.

आतां याच्या पुढील प्रश्न म्हटला म्हणजे वर ज्या पत्राचा उल्लेख करण्यांत आलेला आहे, त्या पत्रामध्ये काय मजकूर असला पाहिजे हा होय. या पत्रांतील मजकुरामुळेंच या प्रणयिनीचा मनोभंग झालेला असला पाहिजे हें 'Letter hit' या नांवावरून स्पष्ट होत आहे, तेव्हां या पत्रांत असा काय मजकूर असावा, की ज्याच्यायोगाने या सुंदरीचा मनोभंग झाला असला पाहिजे ? आतां मनोभंग केव्हां होतो ? तर मनांत असलेली इच्छा परिपूर्ण

होत नाहीं तेव्हां ! तर मग हिच्या मनामध्यें या वेळीं कोणती इच्छा होती, कीं जी या पत्रामुळें सफळ न झाल्याकारणानें तिचा प्रस्तुत देखाव्यांतील हा मनोभंग झालेला आहे ? आतां तिच्या मनांत या वेळीं कोणती इच्छा होती, हें जर आपल्याला कळावयाला पाहिजे असेल, तर तें आपल्याला कळविण्याकरतां या सुंदरीचा या सुंदर चित्राशिवाय येथें दुसरें कोणींही आपल्याजवळ नाही आणि म्हणून या चित्रांतील परिस्थितीवरून अनुमाने काढूनच आपण या इच्छावतीच्या इच्छेसंबंधाचा निश्चय केला पाहिजे.

## अचिरप्राप्य—सुरतसमुत्सुकता

चित्रांतील परिस्थितीवरून चित्रविषयक नायिकेची काय इच्छा असावी, हे ठरविलें पाहिजे. हे तत्त्व वर प्रतिपादन करण्यांत आलेंच आहे. तेव्हां आतां या चित्रांत विशिष्ट अशी परिस्थिति आपल्याला काय अढळून येते ? या चित्रांतील परिस्थितीसंबंधाने पूर्वीं ज्या कित्येक गोष्टींचा उल्लेख करण्यांत आलेला आहे, त्यांच्याशिवाय आतां या प्रसंगी विशेष लक्ष पोंचविण्यासारखी जी गोष्ट आहे, ती ही की, या प्रमदेचे केश तिच्या नितंब भागापर्यंत मोकळे सुटलेले आहेत व तिच्या अंगामध्ये चोळी नाही. आणि तिच्या अतिशय गोंडस अशा त्या मुखकमलाकडे पाहिले असतां आपल्याला असेंही आढळून येतें की, तिचा अधरोष्ठ ईषदारक्त झालेला आहे. तिच्या आधरोष्ठावरील हा आरक्तपणा दोन कारणांनी संभवण्यासारखा आहे. या रमणीचा तो अधरोष्ठ कदाचित् स्वभावतःच एखाद्या तोंडल्यासारखा किंवा पोवळ्यासारखा लाल असेल ; किंवा तसा तो स्वभावतः लाल असूनही विडा खाल्लेला असल्याच्या योगानें तो आरक्तपणा जास्त वाढलेला असेल. पण पलंगाचें सान्निध्य, अंगावरील बुरखा खाली उतरून ठेविलेला, केशकलाप मोकळा सुटलेला, अंगांत चोळी नाही, अशा एकंदर परिस्थितीमध्यें या विलासिनीच्या अधरोष्ठावरील लाली विड्याच्या योगानेंच जास्त खुलून दिसत असली पाहिजे. अशी कल्पना केली तर ती अप्रासंगिक होणार नाहीं. तेव्हां या सगळ्या चिन्हांवरून ही नितंबिनी सुरतसुखसमुत्सुक झालेली असून या तयारीवरून तो सुरतप्रसंग अगदीं समीप प्राप्त असला पाहिजे, असेंच अनुमान ओघानें निघतें.

## आक्षेप

येथें कदाचित् कोणी अशी कल्पना सुचवितील कीं, हा सुरतसमुत्सुकतेचा प्रसंग नसून तो दुसरा कांहीं तरी एखादा साधा प्रसंग मानावा. तर मग तो साधा प्रसंग कोणता ? तर ते असें म्हणतील की, ही एक संध्याकाळची वेळ असून ही कोणी तरी कुलीन स्त्री आपल्या प्रियकराच्या बरोबर हवा खाण्यासाठीं बाहेर जाण्याच्या बेतांत होती, इतक्यांत तिच्या त्या प्रियकराकडून "मी आज तुझ्याबरोबर फिरावयाला जाण्यासाठी येऊं शकत नाहीं" अशा अर्थाचें पत्र आल्यामुळे तिचा हा मनोभंग झालेला असावा, असें कांहीं तरी मानावे म्हणजे झाले. आणि अशी कल्पना केली असतां पलंगावरील बुरख्याची त्याला अचडण येईल असेंही नाही. कारण, मग त्या स्थितीत हा अंगावरून काढून ठेवलेला बुरखा नसून बाहेर जातेवेळी अंगावर घेण्यासाठी तयारीच्या दृष्टीनें जवळ आणून ठेवलेला तो बुरखा आहे, असा त्याचा अर्थ करता येण्यासारखा आहे. व असा अर्थ मानला, म्हणजे प्रस्तुत चित्रावर सुरतप्रसंगाच्या कल्पनेंतील उत्तानशृंगाराचा जो दोष येतो, तो न येतां त्या सगळ्या चित्रावर शालीनतेचे सौम्य पांघरूण घातल्याचाही फायदा आपल्याला मिळण्यासारखा आहे.

## अडचण

होय ! ही कल्पना कांहीं वाईट नाहीं. पलंगावरील बुरखा (त्याच्याच पलीकडील गुलाबाच्या फुलासह) अंगावरून काढून ठेवलेला नसून तो अंगावर घेण्यासाठी जवळ ठेवलेला आहे, असेंही होऊं शकेल. व त्याच्यायोगानें या चित्रांतील शालीनतासुद्धां थोडीशी वाढेल, यांत शंका नाहीं. पण या कल्पनेवर कांही शंका येण्यासारख्या आहेत; त्यांची वाट काय ? पलंगावरील बुरखा अंगावर घेण्यासाठीं म्हणून जवळ आणून ठेवलेला असा दाखविलेला असेल, हें कबूल आहे. पण या मदनोन्मुख विलासिनीच्या अंगांत येथें चोळी नाहीं, याची वाट काय ? या साध्या आणि संभावित स्त्रीला जर केवळ बाहेर फिरावयाला जावयाचें होतें, तर त्यासाठीं जिनें आपला अगावर घ्यावयाचा बुरखा जवळ आणून ठेविला होता, तिनें आपली अंगांतील चोळीही जवळ आणून ठेविलेली होती, आणि अशा सामग्रीसह ती बाहेर जाण्याची तयारी करीत होती, असें या चित्रांत

दाखवावयाला नको होतें काय? पण या चित्रांत ती चोळी किंवा पोलकें, किंवा एखादें जाकीट कोणाला कोठें दिसत आहे काय? तसे तर कांही या चित्रांत कोठेंच दाखविलेलें नाही. यासाठीं ही फिरावयाला जाण्याच्या तयारीची वगैरे कल्पना बरोबर जमत नाहीं. आणि शिवाय फिरावयाला जाण्याची तयारी कोणी सभ्य स्त्री पलगावर बसून सहसा करीत नसते. पलंगावर बसून कोणी स्त्री जी तयारी करीत असते, ती फिरावयाला जाण्याची नसते, हें रसिक वाचकांना सांगितलें पाहिजे असें नाहीं.

## अंगांत चोळी कां नाहीं?

कोणीही प्रतिष्ठित आणि सभावित चित्रकार चित्रांतील आपल्या नायिकेला कांहीं एखाद्या तशाच विशेष प्रसंगावांचून उगीच चोळीविरहित अशा अवस्थेमध्यें दाखवील, हे केव्हांही संभाव्य नाही. आणि कोणीहीं स्त्रिया फिरावयाला जावयाच्या असल्या, तरी त्याच्या आधीं तयारीच्या वेळीं त्या चोळीविरहित अशा अवस्थेमध्यें असतात, असेंही सहसा कोठें आढळून येत नाही. राजा रविवर्मा यांनीं शकुंतलाजन्म या नावाच्या आपल्या सुप्रसिद्ध चित्रामधील शकुंतलेची आई मेनका हिला चोळीविरहित अशा अवस्थेमध्यें दाखविलें आहे, हें खरें आहे. पण मद्रासेकडील मल्याळम् वगैरे लोकांमध्ये चोळी न घालण्याचा जो बराच प्रघात असतो, त्याला अनुसरून त्या चित्रांतील तो देखावा क्षम्य मानला पाहिजे. परंतु इतर देशांतून असा रिवाज कोठेही नाही. आणि म्हणून प्रस्तुतच्या बंगाल प्रांतांतील या चित्रांतील हा देखावा वर सूचित केलेल्या सुरतसमुत्सुकतेच्या प्रसंगाला अनुलक्षूनच असला पाहिजे असें मानण्याशिवाय दुसरी कांहीं कल्पना करून निर्वाह होणे शक्य नाही, हें उघड आहे.

या सुरतप्रसंगाच्या कल्पनेला परिपोषक अशी आणखीही कित्येक प्रमाणें सूक्ष्म दृष्टीनें पाहणाराला या चित्रामध्यें दिसून येण्यासारखीं आहेत. या तुगस्तनीच्या अंगामध्यें चोळी नाही, इतकेंच नव्हे, तर या चित्रांत तिनें आपल्या उजव्या हाताने आपल्या जरीकांठी गुलाबी पातळाचें जें टोक आतां आपल्या वक्षोजांच्यावर आच्छादनार्थ उचलून धरलेलं आहे, तेंही पूर्वी तेथें नसले पाहिजे, हेंही आपण लक्षांत आणणें जरूर आहे. शिवाय कमरेखालच्या नितबभागाकडील त्या गुलाबी रंगाच्या पातळाचा जो भाग दाखविला

आहे, तो ढिला झालेला दाखविला असून तो चापून चोपून नेसलेल्या पातळा-सारखा मुळीच दिसत नाहीं, हेंही लक्षांत घेणें जरूर आहे.

## अंगावरील थोडे दागिने

शिवाय, या सहजसुंदरीच्या—या पद्मनिभेक्षणेच्या—या पद्मिनीच्या—अंगावर चित्रकारानें जे थोडेसेच दागिने ठेविले आहेत, त्यांच्या औचित्या-वरूनही हा प्रसंग कोणता असला पाहिजे, हे तज्ज्ञ वाचक तेव्हांच जाणू शकतील. चित्रकाराला एखाद्या स्त्रीच्या अंगावर वाटतील तितके दागिने घालण्याला कांही खर्च पडतो, असें नाही. रंगाचीं दहापांच कलमें जास्त ओढली म्हणजे झालें! एखाद्या राणीच्याही अंगावर नसतील, इतके दागिने कोणताही चित्रकार आपल्या चित्रांतील नायिकेच्या अंगावर आपल्या रंगाच्या पेल्यांतील दोनचार रंगाच्या थेंबांनीं घालू शकेल. असें असतांना या ठिकाणी चित्रकाराने या स्वभावसुंदर तरुणीच्या अंगावर जास्त दागिने कां चढविले नाहीत? यांत अभिप्रेत प्रसंगाच्या अनुरोधानें त्याचा कांहीं तरी हेतु असला पाहिजे, हे उघड नाही काय? स्त्रियांना मिरवण्याच्या वेळीं आपल्या अंगावर पुष्कळ दागिने असावे, असें वाटत असले, तरी सुरत-प्रसंगी दागिन्यांचा कमीपणा हाच त्यांच्या नैसर्गिक शरीरसौष्ठवाला जास्त शोभा देण्याला कारणीभूत होतो, याचा अनुभव सर्व रसिक वाचकांना आहेच.

> विदूरे केयूरे कुरु करयुगे रत्नवलयै-
> रल गुर्वी ग्रीवाभरणलतिकेयं किमनया।
> नवामेकामेकावलिमयि मयि त्वं विरचिये
> र्न पथ्यं नेपथ्यं बहुतरमनंगोत्सवविधौ ॥

या शृंगारशास्त्रांतील एका सर्वांगसुंदर श्लोकामध्ये कोणात्या एका शृंगारसुंदरीकडून हेंच तत्त्व मोठ्या सुंदर रीतीनें बदलविण्यांत आलेले आहे. आणि म्हणून अशा प्रसंगीं प्रस्तुतच्या चित्रकारानें जे थोडेसेच दागिने या तरुणीच्या अंगावर ठेविलेले आहेत, त्यांत किती तरी औचित्य आणि अर्थगांभीर्य भरलेलें आहे.

या रमणीच्या दोन बाहूंमध्यें चित्रकारानें व्याघ्रमुखी नांवाची दोन कडीं घातलेली आहेत. तीं दाबून बसली असतां स्त्रीच्या बाहुप्रदेशांना एक प्रकारचा पिळदारपणा येऊन त्यांच्यांतील गोंडसपणा किती वृद्धिगत होतो,

हें सांगितलें पाहिजे, असें नाहीं. तसेच हातांतील बांगड्या आणि कंकणें, यांच्यापासून प्रसगविशेषीं रुणझुणत राहणारा ध्वनि कामुकांच्या कर्णरंध्रांमध्यें किती आनंदामृत ओतीत असतो, याची कल्पना ब्रह्मचारी लोकांशिवाय इतरांना सहज होण्यासारखी आहे. गळ्यांत दागिन्यांची ओझीं नसून सगळा पांढरा शुभ्र गळा मोकळा असावा, आणि त्या गळ्यांत प्रसंगविशेषीं विस्तीर्ण स्तनमंडळावर आंदोलन पावणारे फक्त एकदोनच सोन्यामोत्यांचे हार आसावेत, यांत जे स्वारस्य आहे, ते सुरतसंग्रामांत उपरोध करणाऱ्या टोपलीभर दागिन्यांमध्ये खात्रीने नाहीं. व्याघ्रमुखी बाहुभूषणें, हातातील कंकणें आणि गळ्यांतील फक्त एक दोनच हारावली, यांच्याशिवाय चित्रकारानें आपल्या नायिकेच्या अंगावर आणखी फक्त एकच दागिना ठेविलेला आहे, आणि तो म्हटला म्हणजे तिच्या कानांतील लोलक हे होत. केशकलाप आनितब मोकळा सुटलेला, त्यांतीलच कांही कुरळे केश मुखचंद्रम्यावर वळू लागलेले, बाहूंमध्यें व्याघ्रमुखी बाहुभूषणें, इत्यादिकांनीं उत्पन्न केलैल्या आनंदातिरेकामध्यें जर कानांतील हे लोलक प्रसंगविशेषी मंदमंद गतीनें डुलू लागलें तर त्या डुलणाऱ्या डुलांचें तें डुलणें पाहून त्या डुलण्याच्या कारणामुळें कोणता कामुक रसिक आपल्या मनामध्ये डुलू लागल्यावांचून राहणार आहे ?

शिवाय या चित्रांत आपण असेंही पाहतों कीं, येथें चित्रकारानें कांहीं दागिने जसे या स्त्रीच्या अंगावर मुद्दाम प्रस्तुत प्रसंगाला उचित म्हणून घातले आहेत, त्याचप्रमाणें कांही दागिने त्यानें प्रस्तुत प्रसंगाला अनुचित म्हणून मुद्दाम घातलेले नाहीतही. इतक्या सुदर स्त्रीच्या नाकामध्यें एखादी मोठी झुबकेदार नथ घालून देण्याला त्याला काय मोठेंसें अवघड होतें ? सराफाच्या दुकानांत मोत्यें महाग असतील, पण चितारयाच्या घरीं मोत्यांना कांही तोटा नाहीं. त्याच्या रंगाच्या लहानशाही पेल्यामध्यें सगळा सीलोनचा समुद्र आणि सगळे पर्शियन गल्फ सदोदित सांठवून ठेविलेलें असतें ! पण अनवरत चुंबनाला अडथळा करणारी नथ अशा प्रसंगीं कोणता सुज्ञ पुरुष या रमणीला आपल्या नाकांत घालूं देईल ? यावरूनही या चित्रांतील हा प्रसंग कोणता आहे, हें निर्विवादपणे व्यक्त होत आहे.

## विप्रलंभ

आतां वर दिलेल्या अनुमानांवरून ही नायिका सुरतसमुत्सुक अशा

स्थितीमध्येच असली पाहिजे, हें जर सिद्ध होत आहे तर तिची ही इच्छा जेणे करून विफल होईल, असाच कांही तरी मजकूर तिच्या हातांत आलेल्या पत्रामध्यें असला पाहिजे, हें उघड होतें. हें पत्र ज्या पाकिटांत होतें, ते फोडून तिनें तें वरचें पाकिट आपल्या पलंगावरील बुरख्याच्या वस्त्रावर टाकलेलें प्रस्तुतच्या चित्रांमध्यें दिसत आहे त्या पाकिटांतून ते पत्र काढून तिनें वाचलें असले पाहिजे, आणि त्यांतील मजकुरावरून तिची पूर्ण निराशा झाली असली पाहिजे. तें पत्र वाचीपर्यंत ती संभोगशृंगाराच्या विभावांत आणि अनुभवांत अगदी दंग होऊन गेलेली होती. येथपर्यंत तिचा शृंगारस अगदीं कळसापर्यंत नेऊन पोंचविण्यांत आलेला आहे आणि येथून पुढे तिच्या करुणविप्रलंभाला सुरवात झाली आहे. या प्रसंगी हा येथील शृंगाररस जास्त झाला, असा अरसिकपणाचा आक्षेप या ठिकाणी कोणीही उत्थापित करणें इष्ट नाही. कारण, या भावप्रधान चित्रांतील रसाचें पर्यवसान करुण-विप्रलंभामध्यें चित्रकाराच्या मनांतून करावयाचें आहे हे आपण लक्षांत घेतलें पाहिजे. आणि त्या विप्रलंभांतील करुणरस हा नितांतपराकाष्ठेला केव्हां जाऊन पोंचेल? तर तो आत्यंतिक श्रृंगाराच्या संभोगलालसेपासून समुत्पन्न होऊन त्याच्या निराशेमुळे भासमान होऊं लागेल तेव्हाच! आपण संभोगशृंगार जितका जितका उत्कर्षाला न्यावा तितका तितका आपला विप्रलंभ जास्त उत्कर्षाला जातो. कालिदासाच्या उर्वशीवर पुरुरव्याचें आत्यंतिक प्रेम होतें, आणि तिच्याशी तो गंधमादन पर्वतावर आधी अनेक प्रकारच्या श्रृंगारविषयक क्रीडा करीत होता, म्हणूनच विक्रमोर्वशीय नाटका-च्या चौथ्या अंकांतील पुरुरव्याचा करुणविप्रलंभ इतक्या पराकाष्ठेच्या पदवीला जाऊन पोंचलेले आहे.

## संभोगांतून विप्रलंभांत

असो! अशा रीतीनें विप्रलंभ रसाच्या उपपन्नतेचें प्रतिपादन करून झाल्यानंतर आतां तो विप्रलंभरस या प्रस्तुतच्या चित्रामध्यें चित्रकाराने कसा प्रदर्शित करून दाखविला आहे, याचें निरीक्षण करण्याकडे आपण वळू. चित्र हें एक काव्यच आहे. आणि तें चित्र जर चांगलें असेल तर तें चित्र-काव्य असूनही तें एक उत्तम ध्वनि काव्य होऊं शकतें. आणि ज्याप्रमाणें एखाद्या ध्वनिकाव्यांत अनेक अनभिव्यक्त गोष्टी व्यंजनावृत्तीनें अभिव्यक्त

केलेल्या असतात, त्याचप्रमाणे कोणतेही उत्तम चित्र आपल्या तोंडानें कांहीं एक बोलून न दाखवितां आपलें सर्व मनोगत भाव आपल्या मूकवृत्तीनेंच व्यक्त करीत असतें. त्याप्रमाणें या चित्रातील ही वासकसज्जा प्रणयिनी आतां आपल्या मनोभंगाची अवस्था कशी प्रदर्शित करीत आहे, आणि ती कोणकोणत्या चिन्हांनीं व्यंजित होत आहे, याचे परीक्षण करण्यामध्येंही एक प्रकारचा निरतिशय कावानंद भरलेला आहे. ही वासकसज्जा सुरत-समागमाच्या लालसेनें आपल्या मनामध्ये जी आशा धरून बसलेली होती, ती तिची आशा या पत्राच्या वाचनानें समूळ नष्ट झाली! कल्पनेचे सगळे किल्ले कोसळून पडले! आणि सुखाच्या प्रकाशाच्या जागी जिकडे तिकडे निराशेचा अंधकार पसरला! मिल्टनच्या 'पॅरेडाइज लॉस्ट'मधील ईव्ह प्रमाणे तिच्या वस्त्रविहिनत्वाची तिला आतां लाज वाटूं लागली! आणि एवढा वेळपर्यंत जो पदर कोठे तरी खाली पडलेला होता, तो तिने आतां अर्धवट वर उचलून त्याच्या योगानें आपले वक्षस्थळ दुर्लक्षतेमुळें कसें तरी अर्धेंमुर्धें झाकण्याचा प्रयत्न केला आहे! Letter-hit या नांवांतील hit शब्दाच्या अन्वर्थकतेप्रमाणें ती या पत्रांतील मजकुराच्या आघातानें इतकी प्रतिहत होऊन गेली आहेत की, तिनें कशाचा तरी आश्रय घेतला नसता, तर एखाद्या तुटलेल्या झाडावरील वेलीप्रमाणें ती खरोखर खालीच जमिनीवर पडली असती! पण तसें होऊं नये म्हणून तिनें आपल्या जवळच्या पलंगाचा आश्रय केला. जो उरोज तिनें आपल्या प्रियकराच्या उरावर टेकला असतां तो तिनें लांकडाच्या खांबावर मोठ्या कष्टानें केवळ आश्रयासाठीं म्हणून टेकला! आणि जो बाहु तिने आपल्या प्रियकराच्या कंठामध्ये घातला असता, तो त्या पलंगाच्या लांकडी खांबावर टेकण्याशिवाय तिला दुसरा आधार उरला नाही! पूर्वीच्या मदनविव्हलतेनें विगलित होत चाललेलें आपलें विरविरीत वस्त्र एका हातानें कसें तरी वर अर्धवट सांवरून धरून दुसऱ्या हातानें त्या पलंगाच्या शुष्क काष्ठाचा अवलंब करणारी ही करुणरसाची मूर्ति एकदम इतक्या स्थित्यंतरामध्ये येऊन पडलेली पाहून कोणाबरें सहृदय मनुष्याच्या मनामध्यें करुण रसाचा प्रादुर्भाव झाल्यावांचून राहील! चित्रकाराच्या मुक्या चित्रकलेचें जें बोलकें कौशल्य आहे, तें हेंच! चांगले चित्रकार आपल्या चित्राच्या निर्जीव

कागदाला किंवा कॅन्व्हासलाही बोलावयाला लावितात ! आणि चांगले शिल्पकार आपल्या शिल्पकलेच्या मंत्रांनी दगडामध्येही प्राणप्रतिष्ठा करून त्यांच्याकडून वाटतील ते हावभाव प्रकट करवितात ! असें या कलांच्या अंगीं विलक्षण दैवी सामर्थ्य असतें ! आपल्या आत्म्यांतील चैतन्य जड वस्तूंमध्यें ओतून त्या निर्जीव वस्तूंना सजीव करणें हे ईश्वरी कार्य 'करणारे कवि, गायक, चित्रकार आणि शिल्पकार, यांच्या अंगामध्यें दैवी गुणांचा खरोखरच मोठा सांठा असला पाहिजे ! त्याशिवाय असली कार्ये त्यांच्या हातून होणें शक्य नाही.

## करुण रसाची परमावधि

या चित्रांतील या युवतीच्या मनांतील विप्रलंभाचा आणि विरहोत्कंठिततेचा भाव या चित्रांत अतिशय उत्कृष्टतेनें दाखविण्यांत आलेला आहे. आपल्या उजव्या हातात आपल्या पातळाचा पदर धरून आपले उघडे पडलेलें वक्षस्थळ कसें तरी झांकून घेण्याकरितां तिने आपला जो हात वर उचलला आहे, तो आपल्या लज्जेचें संरक्षण करण्याकरितां तिनें उचलिला आहे असे जरी सकृतदर्शनीं दिसत असले तरी आतां तोच हात निराशेच्या दुःखामुळें धडधड उडू लागलेल्या छातीचे स्थिरीकरण करण्याला उपयोगी पडत आहे ! हें करुणरसाचे गुणग्रहण करूं [illegible]ऱ्या मर्मज्ञ वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार [illegible]. तिच्या गळ्यातील एकावलीचे हार, जे सुरतसमा[illegible] प्रसंगी तिच्या स्तनमंडलावर इकडून तिकडे रुळत [illegible] असते, ते आतां बिचारे दुःखातिरेकाने स्तभित होऊन [illegible]ताच्या दडपणाखाली मुकाट्यानें बसले आहेत ! तिच्या [illegible]नातील लोलक, जे कदाचित् तिच्या शृंगरसंग्रामातील वीररसामध्यें लुटुलुटु हलून आनंदातिशय उत्पन्न करण्याला समर्थ झाले असते, ते आतां बिचारे आपले सगळे नृत्य आणि लास्य विसरून अगदीं स्तब्ध होऊन राहिलेले आहेत ! तिच्या ज्या डाव्या हातानें अनेक लीला केल्या असत्या, तो बिचारा हात तिनें खिन्न होऊन आतां आपल्या मस्तकावर निश्चल ठेविला आहे !

## विगलित होणारी बाहुभूषणें

या वेळची तिच्या या दोन्ही हातांची रेखाटणी फारच उत्कृष्ट

रीतीनें कल्पिण्यांत आलेली आहे. तिचा एक हात तिची पूर्वींची कामोत्सुकता झांकून ठेवण्याच्या कामांत गुंतलेला आहे, तर तिचा दुसरा हात तिची हल्लीची निराशा व्यक्त करीत आहे. अशा रीतीनें या दोन हातांना हीं दोन निरनिराळीं कामे लावून दिल्याच्या योगानें तर त्यांच्यामध्यें सौंदर्य उत्पन्न झालेले आहेच; पण या दोन्ही हातांच्या रेखाटणीमध्यें जो स्वभावोक्तीचा अलकार साधण्यांत आलेला आहे, त्यांतील कौशल्याचें जर आपण गुणग्रहण केले नाही, तर या चित्राच्या कारागिराची कल्पकता फुकट गेल्यासारखे होईल. स्वभावोक्ति हा अलकार फक्त शब्दकाव्यांतूनच असतो, असें नसून चित्रकाव्यातील चित्रांच्या अगावरही तो अलंकार कसा घालता येण्यासारखा असतो, हे येथें चांगलें दिसून येण्यासारखें आहे. या तरुणीच्या दोन्ही हातांमध्यें दोन व्याघ्रमुखी केयूरांचीं भूषणें—बाहुभूषणें—आहेत. या सामान्य गोष्टीचा उल्लेख पूर्वी करण्यांत आलेला आहे. पण त्यांत जो विशेष मार्मिकपणा आहे, तो प्रकट करण्याचें स्थळ हें आतां आलेले आहे. तिच्या उजव्या हाताचें कोपर खाली वळलेलें असल्यामुळे तिच्या उजव्या बाहूमधील बाहुभूषण कोंपराच्या बाजूला बरेंच खाली आलेलें दिसत आहे. आणि तिचा डावा हात मस्तकावर ठेवण्याकरितां वर उचलला गेल्या कारणानें तिच्या डाव्या बाहूमधील बाहुभूषण तिच्या कोंपरापासून उलट दिशेनें बरेंच खाली उतरलेलें दिसत आहे. थोड्या वेळापूर्वी जेव्हां तिच्या अगामध्ये मदनाचा संचार झालेला होता, आणि त्याच्या योगानें जेव्हा तिचे प्रत्येक अवयव पुष्ट झालेले होते, त्या वेळी जी ही बाहुभूषणें तिच्या बाहूंमध्यें अगदी बसून गेलेलीं होती, तीच बाहुभूषणें तिचें भुजयुगल आतां निराशेनें शिथिल झाल्यामुळें आपापल्या स्थानापासून खाली सरकलेली पाहात असतांना ''मुहुर्मणिबंधनात्कानकवलयं स्रस्तं स्रस्तं मया प्रतिसार्यते" या कालिदासाच्या सूक्ष्म वर्णनाची आठवण कोणाला बरें झाल्याशिवाय राहणार आहे ?

## शोकानें मूर्च्छित झालेली बांगडी

त्याचप्रमाणें या चित्रामध्ये आणखी एक उत्कृष्ट स्वभावचित्र फार मार्मिकपणानें दाखविण्यांत आलें आहे. या मनोभग पावलेल्या प्रणयिनीनें जो डावा हात आपल्या मस्तकावर निराशेनें ठेविलेला आहे,

त्या हाताच्या मनगटामध्यें कांहीं बांगड्या वगैरे भूषणें आहेत. त्यांपैकी मागच्या बांगड्या आहेत तशाच असून त्यांच्यांतील सगळ्यात पुढची एकच बांगडी वांकडी पडलेली दाखविली आहे. सगळ्याच बांगड्या अशा पुढें कलून पडलेल्या दाखविल्या असत्या, तर त्यांत इतकें सौदर्य उत्पन्न झालें नसतें. पण बाकीच्या बांगड्या नेहमीच्या स्थितीत दाखवून एकच बांगडी पुढें कललेली दाखविली आहे. आणि हा जो या तुलनेंतील भेद, त्याच्या योगानें त्या पुढील कललेल्या बांगडीमध्यें विशेष सौंदर्य उत्पन्न झालेलें आहे. त्या बांगडीच्या खालच्या भागाला मस्तकावरील केशकलापाचा प्रतिबंध झाल्यामुळें त्या बांगडीच्या वरचा भाग स्वाभाविकपणें पुढें कलून पडलेला आहे. हें जरी मुळांत खरें असलें, तरी ती बांगडी जणु काय शोकानें व्याकुल होऊनच अशी विकल झाल्यासारखी दिसत आहे!—पण तिला कसला शोक! आणि जी निर्जीव बांगडी तिच्या शोकाला काय कारण?–होय! तिच्याही शोकाला कारण आहे! मदनसंग्रामाच्या सामग्रीतील प्रत्येक निर्जीव वस्तुलाही सजीवत्व प्राप्त होत असतें! फार काय, या बांगडीलाही असें वाटत होतें कीं, आतां लवकरच होणाऱ्या सुरतसमरांतील झटापटीमध्यें आपणही आपला "रुणझुण रुणझुण" "छुम छुम" असा किंचित् किंचित् कलशब्द उत्पन्न करून आपणही आपल्या प्रियकरणीच्या प्रियकराचे थोडेंबहुत मनोरंजन करूं! पण आतां ती तिची सर्व आशा नष्ट झाल्यामुळें ती बांगडी देखील शोकानें आपलें अंग टाकून पडल्यासारखी दिसत आहे!

थोड्या वेळापूर्वी ते तिचे डोळे जे एखाद्या कमलपत्राप्रमाणें दीर्घ आणि प्रफुल्लित झालेले होते त्यांची तर स्थिति आता फारच वाईट झालेली आहे! चंद्राकडे कैरविणी पाहत असते, त्याप्रमाणें जीं नेत्रकमलें आपल्या प्रियकराच्या मुखचंद्राकडे टक लावून पाहण्यांत गर्क होऊन गेलीं असतीं, तीच आतां अधोमुख होऊन आपल्या वरच्या पापण्यांच्या खालीं झांकून गेलेलीं आहेत! फक्त डाव्या डोळ्याची एकच भिवई मात्र "उन्नमितैकभ्रूलतमाननमस्याः" या पंक्तीत कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें किंचित् वर उचलली गेली असून 'असें हें कसें बरें झालें असावें' असा तिच्या मनांतील विचार ती व्यक्त करीत आहे! बाकीचे तिचे डोळे

धरणीकडे लागलेले आहेत ! वरच्या पापण्या खालीं पडल्या आहेत ! खालच्या पापण्या अश्रुसंचयानें जड झालेल्या आहेत ! आणि त्यांतील अश्रु बाहेर येण्याच्या अगदीं बेतांत आलेले आहेत ! मुख तर म्लान झालेलें दिसतच आहे; पण या चित्रामध्यें रंगांच्या सूक्ष्म छटांनीं तसें दाखविणें शक्य नसलें, तरी या वेळी या प्रणयिनीच्या नासिकेमधून जे दुःखाचे दीर्घ निःश्वास निःसंशय बाहेर पडत आहेत, तेही भावनामय प्रेक्षकाला येथें भासमान झाल्यावांचून राहणार नाहींत !

## तात्पर्य

जग हें असें आहे ! एका क्षणापूर्वीं या प्रणयिनीची किती आनंदमय स्थिति होती ! पण फक्त एका क्षणामध्येंच तिची आतां ही किती दुःखमय स्थिति झालेली आहे ! एक पत्र आलें आणि त्यानें सगळ्या सुखाच्या दुधांत मिठाचा खडा टाकला ! आणि एका क्षणांत सगळ्या शृंगाररसाचें परिपूर्ण करुणारसामध्यें परिवर्तन झालें ! सगळ्या शृंगारांच्या वस्तु जागच्या जागी राहिल्या ! सज्ज असूनही या वासकसज्जेला शय्येवरील सुख न मिळतां तिच्या कपाळीं एका लहानशा पत्रानें एका लहानशा क्षणामध्यें विरहोत्कंठिततेचें दुःख भोगण्याची पाळी आली ! मोकळे सोडलेले केश तसेच राहिले ! तोंडांतील विड्याचा आरक्तपणा फुकट गेला ! दोन भिवयांच्या मधील तो बारीक कुंकुमतिलक निरुपयोगी झाला! या सीमंतिनीच्या भांगामधील शेंदूरही अकृतार्थ झाला ! आणि तें दुर्दैवी पत्र मात्र अखेरीस या सगळ्या सुखसामग्रीच्या शिरोभागीं आरूढ होऊन राहिलें ! हें या चित्रांतील शेवटचें दृश्य किती दुःखदायक आणि किती दुर्दैवाचें द्योतक आहे ! दुर्दैवापुढें मनुष्याचें कांही चालत नाहीं ! सगळें जग हे असेंच आहे ! या दुर्दैवी जगामध्यें परमेश्वराच्या कृपेवांचून दुसरी कोणतीही स्पृहणीय वस्तु नाहीं !

# श्रीमद्भगवद्गीतेंतील एक शंकास्थान : : ४

भगवद्गीतेच्या आठव्या अध्यायामधील २३ वा श्लोक पुढील-प्रमाणें आहे—

> यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।
> प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतवर्षभ ।।

मरणाच्या मार्गानें इहलोकांतून कोणत्या काळीं प्रयाण केलें असतां मनुष्य मुक्तीला जातो किंवा फिरून इहलोकीं जन्म पावतो यासंबंधींच्या काळाचें निरूपण मी तुला करून सांगतों, असें भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला या श्लोकामध्यें सांगत आहेत. म्हणजे अमुक एका काळीं मरण आलें तर मुक्ति प्राप्त होते, आणि त्याहून भिन्न काळीं मरण आलें तर प्राण्याला पुनरपि जन्म प्राप्त होतो, असा या श्लोकांतील अर्थ उघड दिसतो. म्हणून याच्यावर स्वाभाविकपणें अशी शंका उत्पन्न होते कीं, मोक्ष किंवा पुनर्जन्म हीं मरणाच्या वेळेवरच अवलंबून आहेत की काय ?

परंतु असें असणें शक्य नाहीं. 'ज्ञानादेव कैवल्यम्' हा वेदान्त-शास्त्राचा मुख्य सिद्धान्त आहे आणि या सिद्धान्तप्रतिपादक वाक्यामध्यें 'एव' हें जें पद घालण्यांत आलेलें आहे, तें मुद्दाम घालण्यांत आलेलें असून इतर कारणांचा निरास करण्याकरितांच त्या पदाची योजना करण्यांत आलेली आहे. दुसऱ्या कोणत्याही कारणापासून कैवल्यरूपी मोक्ष उत्पन्न होत नसून तो फक्त ज्ञानापासूनच उत्पन्न होतो. असें प्रतिपादन करण्याचा या सिद्धान्तवाक्यांतील अभिप्राय स्पष्ट आहे. मग या सिद्धान्तवाक्याची आणि वरील गीतावाक्याची एकवाक्यता कशी व्हावयाची ? एखाद्या विशिष्ट वेळीं मरण आल्यानें जर अनायासानें मोक्ष प्राप्त होऊं लागला,

तर मग ज्ञानाचें महत्त्व तें काय राहिले ? आणि एखादा मनुष्य आपल्या ज्ञानाने मोक्षाचा अधिकारी बनला असूनही जर त्याला दक्षिणायनासारख्या एखाद्या निषिद्ध कालामध्ये मरण आले, तर त्याचें सगळें ज्ञान व्यर्थ जाण्याचा प्रसंग प्राप्त होतो. तेव्हां मोक्षाची प्राप्ति किंवा अप्राप्ति ही मरणाच्या काळासारख्या एखाद्या अनियमित गोष्टीवर अवलंबून ठेवणे हें शास्त्रीय दृष्टया केव्हांही उचित होणार नाहीं. आणि म्हणून 'ज्ञानादेव कैवल्यम्' हा सिद्धान्तच प्रमाणभूत मानणें आवश्यक आहे. आणि हा सिद्धान्त जर स्थिर ठेवणें अवश्य आहे, तर अर्थातच भगवद्गीतेंतील वाक्याचा अर्थ कांही तरी अन्य अभिप्रायानें लावणें जरूर आहे. प्रबळ वाक्याच्या अनुरोधानें दुर्बळ वाक्यांचे अर्थ लाविले पाहिजेत, हा मीमांसा शास्त्राचा ठरलेलाच नियम आहे व म्हणून गीतेंतील वचनाचा अर्थ संकोचित करणें अवश्य आहे.

## कलाविषयक कल्पना

तरी पण भगवद्गीतेंतील उपरिनिर्दिष्ट श्लोकामध्ये प्रयाणकालाच्या ज्या कल्पनेला इतकें महत्त्व देण्यांत आलेलें आहे, ती कल्पना कशी उत्क्रांत होत गेली असली पाहिजे, याच्याबद्दलचें आपण संशोधन सुरू केलें, तर त्यांत पुष्कळ मनोरंजकपणा दिसून येण्यासारखा आहे. मनुष्यप्राणी हा प्रथमतः निसर्ग ठेवील त्याप्रमाणें राहत असतो; आणि त्याचें तत्त्वज्ञान हें त्याला पाठीमागून प्राप्त होत असतें. सामान्य विचार पहिले आणि शास्त्रीय विचार मागाहूनचे, हा नेहमींचाच क्रम ठरलेला आहे. लौकिक समजुती सकृद्दर्शनीं उत्पन्न होतात आणि शास्त्रीय सिद्धान्त हें गहन विचारांचें मागाहून उत्पन्न होणारें फळ होय. या बाबतींत कोणाचा मतभेद होणें शक्य नाहीं. अशा दृष्टीनें पाहतां चांगल्या वेळी मरण येणें हें चांगली गति मिळण्याला कारणीभूत असलें पाहिजे, अशी एक सामान्य कल्पना प्रथमतः लोकांच्या मनांत रूढ झालेली असणें अगदीं संभवनीय आहे. परंतु काकतालीयन्यायानें केव्हां तरी अनिश्चित रीतीनें येणाऱ्या मरणावर मोक्षप्राप्तीसारखी महत्त्वाची गोष्ट अवलंबून ठेवणें हें केव्हांही योग्य नाहीं, असें पाठीमागून विचारी आणि तत्त्वज्ञानीं माणसांना वाटू लागून त्यांनीं मोक्षाच्या कार्यकारणभावाचा विचार सुरू केला असला पाहिजे; आणि त्या द्वारानें त्यांनीं 'ज्ञानादेव कैवल्यम्'

अशा स्थिर पायावरील सिद्धान्त निश्चित केला असला पाहिजे. काकतालीय-न्यायानें चांगल्या वेळेवर मरण येऊन मुक्ति मिळणें यांत दैववाद ध्वनित होतो; आणि परिश्रमानें ज्ञान प्राप्त करून घेऊन त्यापासून मोक्ष मिळविणें यांत पुरुषकाराचा ध्वनि स्पष्ट आहे. आणि केव्हांही झालें, तरी सामान्य मनुष्याला प्रथमतः पुरुषकारापेक्षां दैववादच जास्त प्रिय वाटतो. परंतु तो अन्वयव्यतिरेकाच्या शास्त्रीय आणि तर्कशुद्ध पायावर उभारलेला नसल्यामुळें त्यांतील कार्यकारणभाव सदोदित निश्चयानेंच खरा ठरेल, अशी केव्हांही शाश्वती नसते.

## स्थलविषयक कल्पना

अमुक काळीं मरण आलें, तर त्यापासून मोक्ष मिळतो, ही जशी एक कालविषयक अशास्त्रीय कल्पना रूढ झालेली आहे, त्याचप्रमाणे मोक्षाच्या बाबतींत एक स्थलविषयक कल्पनाही अशीच रूढ झालेली आहे. काशी-सारख्या एखाद्या पुण्य क्षेत्रामध्यें मरण आलें असतां त्यापासून मोक्ष प्राप्त होतो, ही कल्पना आपल्यामध्यें पुष्कळ प्रचलित झालेली आहे. व त्याकरितां पुष्कळ लोक काशीसारख्या क्षेत्रामधून मुद्दाम जाऊन राहिलेलेही आढळतात. परंतु स्थल आणि काल या दोन्हीही संबंधींच्या या कल्पना धर्मभोळेपणाच्या आहेत. वास्तविकपणें मीमांसेच्या दृष्टीनें पाहिलें असतां उत्तरायणासारखे काळ आणि काशीसारखी स्थळें यांच्यासंबंधीचे हे केवळ स्तुतिपर अर्थवाद आहेत. या काळांत किंवा या स्थळांत मरण आलें असतां मोक्ष मिळतो, इतके हे काळ आणि हीं स्थळें चांगलीं आहेत, अशी ही निव्वळ अर्थवादात्मक स्तुति आहे; येथील मरणापासून मोक्ष प्राप्त होतो, असें कार्यकारणात्मक विधान करण्याचा अभिप्राय या वाक्यामध्यें मुळींच नाहीं. शिवाय काशीसारख्या क्षेत्रांत कोणी मुद्दाम जाऊन राहिला आणि तो तेथून केव्हांही हलला नाहीं, तर त्याला कदाचित् आपलें मरण काशीमध्येंच घडवून आणतां येईल. पण आत्महत्या केल्यावांचून अमुकच काळामध्यें आपल्याला मरण आणणें हे कोणाला कसें शक्य करतां येणार आहे? सारांश, काळ आणि स्थळ हीं अशा रीतीनें अनिश्चित असल्यामुळें त्यांच्या ठिकाणी मोक्षाचें कारणत्व नियमेंकरून उत्पन्न होणें केव्हांही शक्य नाहीं.

## अंतकाळची वासना

पण येथें याच्याचबरोबर सृष्टीचा दुसरा एक नियम विचारांत घेणें जरूर आहे. मनुष्याच्या मनाचा असा एक धर्म दिसून येतो की, त्या मना-मध्यें जशी वासना असेल तसें कधी कधीं घडून येतें, ही गोष्ट जिवंतपणीं देखील क्वचित् प्रत्ययाला येते. यावरून मनुष्याला स्वाभाविकपणेंच असें वाटतें की, अंतकाळीं आपण जर चांगली वासना मनामध्यें धारण केली, तर त्यापासून आपल्याला चांगली गति मिळेल व हीच कल्पना भगवद्-गीतेच्या आठव्या अध्यायांतील पुढील दोन श्लोकांमध्यें व्यक्त करण्यांत आलेली आहे.

> अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
> यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ।। ५ ।।
> यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।
> तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ।। ६ ।।

या वर दिलेल्या दोन श्लोकांपैकीं सहाव्या श्लोकांतील खरोखरीचा सामान्य सिद्धान्त म्हटला म्हणजे 'य यं भावं स्मरति तं तमेति' एवढाच होय. व तो वास्तविकपणें तसाच मांडावयास पाहिजे होता. परंतु त्या सिद्धा-न्ताच्या प्रतिपादनामध्ये अंतकाळचा उल्लेख आणून त्या सिद्धान्ताचा येथें संकोच करण्यांत आलेला आहे हे कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. अंतकाळीं स्मरण केलें, तरच तो भाव प्राप्त होतो, आणि एरव्ही होत नाही, असा या सिद्धान्ताचा अभिप्राय नव्हे; तर जेव्हां जेव्हां एखाद्या वस्तूचें चिंतन करावें, तेव्हां तेव्हां ती वस्तु प्राप्त होते, असा सामान्य नियम असून तो नियम अंतकाळच्या स्थितीमध्येंही बरोबरपणें लागू पडतो, असे त्या सामान्य सिद्धान्ताचें एका विशिष्ट प्रसंगाला अनुलक्षून येथें हे एक विशेष विधान करण्यांत आलेलें आहे.

आतां या सिद्धान्ताच्या अनुरोधाने कोणी एखादा मनुष्य एखाद्या तीर्थाच्या ठिकाणीं जाऊन बसला आणि येथें मरण आल्यानें देव मला मोक्ष देईल, असें जर तो प्रत्यही चिंतन करीत राहील, तर कदाचित् त्या भगवच्चिंतनजन्य ज्ञानानें त्याला मोक्षप्राप्ति होईल. परंतु अशा रीतीनें मिळालेला मोक्ष हा कांहीं त्या स्थळामुळें मिळाला असें म्हणतां यावयाचें

नाही. सारांश, स्थलविशेष आणि मोक्ष यांच्यामध्यें प्रत्यक्ष कार्यकारणभाव असणें शक्य नसून तो कांहीं अप्रत्यक्ष रीतीनें कदाचित् जोडतां येण्यासारखा आहे. आणि कालाच्या संबंधानेंही असाच कांहीं तरी दूरान्वय लावण्याचा प्रयत्न केला, तर उत्तरायणादिक कालामध्यें मरण आल्यानें मोक्ष प्राप्त होतो, हें विधानही कदाचित् कांही प्रसंगी उत्पन्न होऊं शकेल; पण मुख्यत्वानें कालविशेष आणि मोक्षप्राप्ति यांच्यामध्येंही अर्थाअर्थी कोणताही निमित्तनैमित्तिक भाव असणें शक्य नाही, हे अगदी उघड आहे.

## उत्तरायणांतील सोय

शिवाय एखाद्या भलत्याच अप्रशस्त ठिकाणीं मरण्यापेक्षां एखाद्या पुण्यक्षेत्रामध्यें मरण येणे चांगले, ही जशी स्थलविषयक कल्पना स्वाभाविक आहे, त्याचप्रमाणें एखाद्या वाईट वेळीं मरण येण्यापेक्षां चांगल्या वेळीं मरण येणें चांगलें, अशी कल्पना रूढ होणें हेंही तितकेंच स्वाभाविक आहे. आणि अशा बाबतींत चांगली वेळ कोणती, तर सामान्यतः जी सोईची वेळ असेल, तीच त्यांतल्या त्यांत चांगली वेळ होय. आपले पूर्वीचे आर्य लोक उत्तरध्रुवाच्या जवळ राहत असत, तेव्हां त्यांना तेथें सहा महिन्यांची रात्र आणि सहा महिन्यांचा दिवस अशा निसर्गाच्या विलक्षण परिस्थिती-मध्यें आपलें आयुष्य कंठावें लागत असे, हें सर्वांना माहीतच आहे. त्या वेळी ज्या उत्तरायणामध्यें सहा महिन्यांचा दिवस असावयाचा, तें उत्तरायण त्या वेळच्या लोकांना स्वाभाविकपणें सोईस्कर असल्यामुळें प्रत्येक कार्याला ती वेळ त्यांना शुभदायक वाटणें हें अगदी ओघानेंच प्राप्त होते. सारांश, प्रकाशयुक्त वेळ ही सोयीची आणि म्हणून शुभदायक मानली जाण्याचा प्रघात पडून 'अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्' या सगळ्या वेळांनाच शुभप्रदत्व प्राप्त झालेलें असावें. सृष्टीच्या आणि मानवजातीच्या प्राथमिक अवस्थेमध्यें मनुष्यांच्या सामान्य कल्पना कशा बनत जात असतात, हें यावरून लक्षांत येण्यासारखें आहे. आणि अशा अनेक सामान्य कल्पना रूढ होऊन गेल्यानंतर मग त्यांतील तर्कशास्त्रदृष्ट्या बरोबर कल्पना कोणत्या आणि चुकीच्या कल्पना कोणत्या यांच्याबद्दलचा सारासारविचार मागाहून उत्पन्न होतो, हा मनुष्याच्या मनाचा स्वाभाविक धर्मच आहे. आधी भाषा बोलली जाऊं लागते, आणि मग व्याकरणाचा विचार उत्पन्न होतो, त्या-

प्रमाणेंच आधीं वस्तु आणि त्यांचे संबंध यांच्या कल्पना मनांत प्रादुर्भूत होतात, आणि पाठीमागून त्यांचे कार्यकारणभाव निश्चित करण्याच्या कार्याला तर्कशास्त्र हें प्रवृत्त होतें. हा नैसर्गिक स्वरूपाचा पौर्वापर्यसंबंध आपण लक्षांत घेतला, तर

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।।
धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चद्रमासं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।।

इत्यादि वचनांतून वर्णिलेल्या कालविषयक कल्पना या आधीच्या असल्या पाहिजेत, आणि असल्या सामान्य व लौकिक कल्पनांचें तर्कशास्त्राच्या नियमांप्रमाणें परीक्षण करण्यांत येऊन 'ज्ञानादेव मोक्षः' हा तर्कशुद्ध सिद्धान्त पाठीमागून ठरविण्यांत आला असला पाहिजे. असा या दोन कल्पनांमधील कालक्रमाचा इतिहास असावा, असें उघडपणें दिसून येतें.

## अन्य उल्लेख

उत्तरायणासारख्या कालांत मरण येणे हे शुभप्रद होय, ही कल्पना फक्त भगवद्गीतेंतच आहे, असें नसून अन्यत्रही त्या कल्पनेचा उल्लेख आढळून येतो.

य यवं विद्वान् उदगयने प्रमीयते देवानामेव महिमानं गत्वादि-
त्यस्य सायुज्यं गच्छति । अथ यो दक्षिणे प्रमीयते पितृणामेव
महिमानं गत्वा चंद्रमसः सायुज्यं सलोकतामाप्नोति ।

या नारायणोपनिषदांतील मंत्रामध्येंही असे प्रतिपादन करण्यांत आलें आहे कीं, जो उदगयनामध्यें मरण पावतो, त्याला देवांचें महत्त्व मिळून त्याला आदित्याशीं सायुज्य प्राप्त होतें. आणि जो दक्षिणायनामध्यें मरण पावतो, त्याला पितरांचें महत्त्व मिळून त्याला चंद्रलोकांतील सायुज्य आणि सलोकता प्राप्त होतात. अशा प्रकारच्या या वचनाशिवाय महाभारतांतील भीष्माच्या मरणाची कथाही याच कल्पनेचा परिपोष करितें. भीष्म शरपंजरीं पडले, त्या वेळीं दक्षिणायन होतें, म्हणून ते इच्छामरणी असल्याच्या योगानें उत्तरायण सुरू होईपर्यंत त्यांनीं वाट पाहिली, आणि उत्तरायणांत सूर्य आल्यानंतर त्यांनीं आपला देह ठेविला, अशी त्यांची कथा

आहे. सारांश, हीं वर दिलेलीं वचनें आणि भीष्माचार्यांचें उदाहरण यांवरून या कालविषयक कल्पनेला एक प्रकारचें महत्त्व आलेलें आहे. परंतु वास्तविक रीतीने पाहिलें असतां ही कल्पना बरोबर नाहीं.

## उलट प्रबळ प्रमाणें

कोणी मनुष्य अमक्या वेळी मरण पावला, तर त्याला मोक्ष मिळेल, ही कल्पना तर्कशास्त्राच्या प्रमाणापुढें कशी टिकत नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. आतां 'अग्निर्ज्योतिरहः शुक्लः' इत्यादि प्रकारचीं जीं वचनें आहेत, त्यांची वाट काय, असें कोणी विचारील; तर त्याला उत्तर असें कीं, याच्या उलटही वचनें आहेतः—

'ते अर्चिषमभिसम्भवन्त्यर्चिषोऽहरहन् आपूर्यमाण पक्षमापूर्यमाणपक्षाद्यान् षडुदङेति मासास्तान्मासेभ्यः सवत्सरं संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान् ब्रह्म गमयति। एष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते।'

अशा प्रकारचीं वचनें छांदोग्य उपनिषद्, बृहदारण्यक उपनिषद्, वगैरे उपनिषदांतून आलेलीं आहेत. आणि त्यांच्या धोरणानेंच भगवद्गीतेंतील वचनाचा अर्थ लाविला पाहिजे, हे ब्रह्मसूत्रांवरील आणि भगवद्गीतेवरील आपल्या भाष्यांमध्यें शंकराचार्यांनी सिद्ध करून दाखविलें आहे.

वर दिलेल्या उपनिषदांतील अवतरणांमध्यें 'अहन्', 'आपूर्यमाणपक्ष', 'मास' वगैरे शब्द सकृद्दर्शनीं कालवाचक दिसतात; व त्यावरूनही उत्तरायणादिक कालांतील मरण आणि मोक्ष यांच्यामध्यें कार्यकारणभावसंबंध असला पाहिजे असा कोणाचा गैरसमज होण्याचा संभव आहे परंतु वास्तविक स्थिति तशी नसून व 'अहन्', 'पक्ष', 'मास' हे शब्द येथें कालवाचक नसून त्या त्या ठिकाणीं अधिष्ठान करणाऱ्या ज्या देवता आहेत, त्यांचे ते शब्द द्योतक आहेत, हे शंकराचार्यांनीं 'आतिवाहिकास्तल्लिङ्गात' [४, ३, ४] या सूत्रावरील भाष्यांत सिद्ध केलें आहे व हाच अर्थ बरोबर असला पाहिजे. कारण, भगवद्गीतेंतील 'अग्निर्ज्योतिरहः शुक्लः' इत्यादि श्लोकांमध्यें कालाचेंच वर्णन केलेलें आहे, असा जर कोणी आग्रह धरील, तर त्याला असें विचारलें पाहिजे कीं, या श्लोकांतील 'अग्नि' आणि

'ज्योतिः' हे जे पहिलेच दोन शब्द आहेत, ते काय काल दाखवितात? आणि दाखवीत असले, तर ते कोणत्या कालाचें द्योतक आहेत? परतु 'अग्नि' आणि 'ज्योतिः' हे शब्द कोणताही काल दाखवूं शकत नाहीत आणि म्हणून त्या त्या वस्तूंच्या ठिकाणीं राहणाऱ्या ज्या देवता त्याच येथें अभिप्रेत आहेत, असें मानलें पाहिजे.

## रात्रीं येणारें मरण

ब्रह्मसूत्रांमध्ये या आतिवाहिक देवता आहेत, असें सांगितलें आहे. इतकेंच नव्हे, तर या प्रकरणामध्यें कोणत्याही कालविशेषाचा संबध असणें अशक्य आहे, असेंही अध्याय ४, पाद २ यांतील १८, १९, २० या सूत्रांत स्पष्ट रीतीनें सिद्ध केलें आहे. मरणानंतर जीवात्मा मृत शरीरांतून निघाल्यानंतर 'अथयत्रैतदस्माच्छरीरादुत्क्रामत्यथैतैरेव रेरश्मिभिरुर्ध्वमाक्रमते' या छांदोग्य उपनिषदांतील वचनांत सांगितल्याप्रमाणें तो सूर्याच्या रश्मींच्या (किरणांच्या) आधारानें वर जातो, असें १८ व्या सूत्रांत प्रतिपादन करण्यांत आलें आहे. परतु या प्रतिपादनावर साहजिकपणेच अशी शंका येते की, जर सूर्याच्या किरणांच्या आश्रयानें जीवात्म्याला वर जावयाचें आहे, तर रात्री मरण पावलेल्याच्या देहांतील आत्म्याला सूर्य-किरणांचा आश्रय न मिळाल्यामुळें तो वर जाऊं शकणार नाहीं. या शंकेचें समाधान 'निशि नेति चेन्न संबन्धस्य यावद्देहभावित्वाद्दर्शयति च' या १९ व्या सूत्रामध्ये अशा रीतीने केलें आहे कीं, मनुष्याच्या शरीरांतील नाड्या आणि सूर्याचे किरण यांचा सर्व शरीराच्या ठिकाणी नेहमीचाच संबंध असतो, असें श्रुतीत सांगितलेलें आहे. शिवाय, सूर्य मावळला, तरी रात्रींही सूर्याचे किरण पाठीमागें सूक्ष्म स्वरूपामध्यें अवशिष्ट असतातच. उन्हाळ्याच्या रात्री जे उकडत असतें, ते सूर्याच्या अवशिष्ट किरणांमुळेंच होय. आतां ते किरण अगदी सूक्ष्म प्रमाणांत असतात, म्हणून ते आपल्याला दिसत नाहींत एवढेंच.

## दक्षिणायनांत येणारें मरण

अशा रीतीनें रात्रिमरणासंबंधाच्या शंकेचें निवारण झाल्यानंतर त्याच्याच पुढें दुसरी एक शंका अशी उत्थापित करण्यांत आली आहे कीं, दक्षिणायनामध्यें मृत्यु आला असतां अशा प्रसंगी आत्म्याला गति प्राप्त

होते किंवा नाहीं. व या शकेचें निराकरण करण्याकरितां 'अतश्चायनेऽपि दक्षिणे' या २० व्या सूत्रामध्यें असें सांगितले आहे की, ब्रह्मवेत्ता मनुष्य दक्षिणायनामध्यें मरण पावला तरीही त्याला मोक्षाची प्राप्ति होतेच. कारण, मरणाची वेळा ही अनिश्चित असल्यामुळे दक्षिणायनांत मरणाऱ्या ब्रह्मवेत्त्याची सर्व ब्रह्मविद्या व्यर्थ होऊं लागेल, व ब्रह्मविद्येच्या संपादनाला कधीं फळ मिळेल आणि कधी कदाचित् फळ मिळणार नाही, अशी आपत्ति येऊं लागेल. म्हणून दक्षिणायनामध्ये मरण आलें असतांही मोक्ष प्राप्त होतो, असाच सिद्धान्त मानला पाहिजे. आतां भीष्माचार्यांनीं उत्तरायण प्राप्त होईपर्यंत प्रतीक्षा केली, हें जरी खरें असलें, तरी त्यावरून वरील सिद्धान्ताला बाध येत नाही. कारण, भीष्माचार्यांनी दक्षिणायनांत देह ठेविला असता, तर त्यांना मोक्षप्राप्ति झाली नसतीच, हे सिद्ध करण्याला प्रतिपक्षापाशीं काय स्वतंत्र साधन आहे? सारांश, भीष्माचार्यांचें उदाहरण अर्थवादात्मक असून त्यांतील तात्पर्य असें आहे की, 'तुझ्या इच्छेला वाटेल तेव्हां तुला मृत्यु येईल', असा भीष्माचार्यांना त्यांच्या पित्याकडून वर-प्रसाद मिळालेला होता; त्यामुळे लौकिकाचार प्रतिपालनाच्या प्रशंसेसाठीं त्यांनी उत्तरायण येईपर्यंत आपला देह ठेविला नाही. पण यावरून दक्षिणायनामध्यें मृत्यु आला असतां मोक्ष प्राप्त होत नाहीं असें बिलकुल सिद्ध होत नाही. तर केव्हांही मृत्यु आला, तरी ज्याला ब्रह्मज्ञान झालेले आहे, तो मनुष्य कोणत्याही मरणकालाच्या निरपेक्षतेनें मोक्षाला जातो, हाच सिद्धान्त खरा आहे.

## मूळ शंकेचें समाधान

आतां हा सिद्धान्त जर खरा आहे, तर मग--

> यत्र काले त्वनावृत्तिमावृत्ति चैव योगिनः ।
> प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥

या भगवद्गीतेंतील श्लोकामध्यें मोक्षाला जाण्याचा आणि पुनर्जन्माला येण्याचा काळ मी तुला सांगतों, असें जे म्हटलेलें आहे, तें कसें उपपन्न होतें, अशी शंका साहजिकपणेंच उत्पन्न होते व या शंकेचें समाधान शंकराचार्यांनीं 'योगिनः प्रति च स्मर्यते स्मार्ते चैते' या (४, २, २१) सूत्रावरील भाष्यामध्यें असें सांगितले आहे कीं, भगवद्गीतेच्या या स्मृतिग्रंथामध्यें जें

सांगितलें आहे, त्या स्मार्त प्रमाणांनीं वर सांगितलेल्या छांदोग्यादिक श्रुतींतील जो सिद्धान्त तो बाधित होऊ शकत नाहीं. म्हणून भगवद्गीतेंतील वचन विषयभेदानें लावावें, असें त्यांनीं सुचविलें आहे व हा विषयभेद कसा करावयाचा हें आचार्यांनीं ' यत्र काले त्वनावृत्तिम् ' इत्यादि भगवद्गी-तेंतील श्लोकावरील आपल्या भाष्यामध्यें दाखवून दिलेलें आहे. जे सगुण उपासक असतील आणि ज्यांना कालातरानें मुक्ति प्राप्त व्हावयाची असेल त्यांच्याकरितां केवळ हे अर्चिरादि मार्ग सांगितलेले असून ' ज्ञानादेव कैवल्यम् ' या सिद्धान्ताला या देवयान आणि पितृयान या मार्गांच्या वर्णनानें बिलकुल बाध येत नाही, असें त्यांनी स्पष्टपणें प्रतिपादन केलेलें आहे.

## एकवाक्यतेचा आग्रह

सारांश, शुभकालों मरण आले असतां ते शुभप्रद होतें, अशी पूर्वींची एक सामान्य लौकिक कल्पना प्रचलित असली पाहिजे. पण या कल्पनेमध्यें मृत्युकालाचा अनिश्चितपणा हा मोठा दोष असल्यामुळें तर्कशास्त्रदृष्ट्या ही असली अनिश्चित स्वरूपाची कल्पना ग्राह्य होणें केव्हांही शक्य नव्हतें. म्हणून ती कल्पना मागें पडून 'ज्ञानादेव कैवल्यम्' हा सिद्धान्त प्रस्थापित करण्यांत आला. आणि तो उपनिषदें आणि ब्रह्मसूत्रें या दोहोंमध्यें प्रतिपादन करण्यांत आला आहे. यावरून एका बाजूला उपनिषदें व ब्रह्मसूत्रें, आणि दुसऱ्या बाजूला श्रीमद्भगवद्गीता, या दोन पक्षांमधील हा प्रस्तुतचा विरोध अगदीं स्पष्ट आहे. आचार्यांनी त्या विरोधाची कशी तरी व्यवस्था लाविली असली, तरी तो विरोध आहे, ही गोष्ट त्यांनाही कबूल करावी लागलेली आहे, यांत संशय नाहीं. उपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि भगवद्गीता, हे तीन ग्रंथ मिळून वेदांतशास्त्रांची प्रस्थानत्रयी होय असें मानण्यांत येतें, व या तिन्ही ग्रंथांमध्यें एकवाक्यता आहे, असें प्रस्थापित करण्याचे पुष्कळांकडून प्रयत्नही करण्यांत येत असतात पण असले प्रयत्न किती डळमळीत पायावर उभारलेले असतात, हें प्रस्तुतच्या प्रसंगावरून कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे. विशिष्ट काळीं मरण आलें असतां मोक्ष मिळतो, ही एक कल्पना आणि मोक्ष हा मरणाच्या अनिश्चित कालावर अवलंबून नसून तो ज्ञानावरच अवलंबून असला पाहिजे, ही दुसरी कल्पना, या दोन कल्पना अगदीं परस्परविरुद्ध आहेत. आणि त्यांच्यांत एकवाक्यता खुद्द शंकरा-

चार्यांनाही करतां आली नाहीं, मग इतर आचार्यांचा पाड काय? कल्पनांच्या उत्क्रांतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें पाहिले, तर कालविषयक कल्पना ही पहिली दिसते आणि ज्ञानानें मोक्ष प्राप्त होत असला पाहिजे, ही कल्पना तर्कशुद्ध आणि जास्त परिपक्व विचाराची असल्यामुळे ती मागाहून उत्पन्न झालेली असली पाहिजे, हें अगदी उघड आहे.

## पौर्वापर्याविषयीं एक प्रमाण

भगवद्गीता आधीची किंवा ब्रह्मसूत्रें आधीची असा एक वाद आहे. त्या वादांत शिरण्याचें येथें प्रयोजन नाही. तरी पण येथें प्राप्त झालेल्या प्रसंगानें त्या वादावर थोडासा निराळ्या दृष्टीनें प्रकाश पडण्याचा संभव असल्यामुळें त्या मुद्द्याचा येथें थोडक्यांत उल्लेख करण्यांत येत आहे. अमुक काळीं मरण आलें असतां तें शुभप्रद होय, असल्या प्रकारच्या सामान्य आणि लौकिक धर्मभोळेपणाच्या कल्पना समाजाच्या अपरिपक्व स्थितीमध्यें उत्पन्न होत असतात आणि त्यामुळें त्या आधींच्या होत; व 'ज्ञानादेव कैवल्यम्' अशासारखे सिद्धान्त हे विचाराच्या परिपक्वतेच्या योगानें कालक्रमाच्या दृष्टीनें मागाहून उत्पन्न होतात; हें वर सांगितलेलें आहे. आतां हा कालक्रम जर खरा असेल, तर 'यत्र काले त्वनावृत्तिम्' ही लौकिक कल्पना ज्यांत समाविष्ट झाली आहे, ती भगवत्गीता पूर्वकालीन असून 'ज्ञानादेव मोक्षः' हा सिद्धान्त ज्यांत प्रस्थापित करण्यांत आलेला आहे, तीं ब्रह्मसूत्रें भगवद्गीतेच्या अपेक्षेनें उत्तरकालीन असली पाहिजेत असें उघड होतें. शिवाय 'निशि नेति चेन्न' (४–२–१९) व 'अतश्चायनेऽपि दक्षिणे' (४–२–२०) या दोन ब्रह्मसूत्रांमध्यें रात्रीचें मरण आणि दक्षिणायनांतील मरण यांच्यासंबंधीचें जे पूर्वपक्षखंडनासाठी म्हणून घेतलेले आहेत, ते भगवद्गीतेवरूनच घेतलेले असावेत, असें दिसते. व यावरूनही भगवद्गीतेचें पूर्वकालीनत्व अनुमित करण्याला आधार सांपडतो.

## प्रस्तुत वाद आणि श्रीज्ञानेश्वर महाराज

मोक्षप्राप्ति ही मरणकालाच्या अनिश्चितपणावर अवलंबून ठेवावयाची किंवा ज्ञानाच्या निश्चित कारणाशीं तिचा कार्यकारणभाव निगडित केलेला असावा, हा एक न्यायशास्त्रांतील मोठा महत्त्वाचा आणि मनोरंजक प्रश्न आहे. असल्या शास्त्रीय प्रश्नांची चर्चा संस्कृत

ग्रंथांतून फार पद्धतशीर रीतीनें करण्यांत येत असते. पण ती दृष्टि मराठी ग्रंथांतून फारशी आढळून येत नाहीं. ज्ञानेश्वरी ही भगवद्गीतेवरील मराठींतील एक उत्कृष्ट टीका आहे. त्या टीकेमध्यें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं या उपरिनिर्दिष्ट वादाच्या बाबतींत आपलें काय मत दिलें आहे, हें या प्रसंगीं पाहण्याचें कुतूहल कोणाच्याही मनामध्यें उत्पन्न होणें अगदीं साहजिक आहे. या बाबतींतील श्रीज्ञानेश्वमहाराजांच्या ओव्या पुढीलप्रमाणें आहेत :–

तेवींचि आणिकेंही एकें प्रकारें। हें जाणतां आहे सोपारें।
तरि देह सांडितनि अवसरें। जेथ मिळती योगी ॥ २०४ ॥

अथवा अवचटे ऐसें घडे। जे अनवसरें देह सांडे।
तरि माघौतें येणें घडे। देहासीचि ॥ २०५ ॥

म्हणोनि काळशुद्धि जरी देह ठेविती। तरी ठेवित खेवीं ब्रह्मचि होती।
एऱ्हवीं अकाळीं तरी येती। संसारापुढती ॥ २०६ ॥

तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ती। ये दोन्ही अवसरा आधीन आहाती।
तो अवसरू तुजप्रति। प्रसंगें सांगों ॥ २०७ ॥

या प्रसंगामधील श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ओंव्या फार सरस आहेत; व त्यांतील दृष्टान्त फार समर्पक आहेत. परंतु वर ज्या ओंव्या उद्धृत केलेल्या आहेत, त्यांवरून पाहतां वरील वादाचा गंधही या ओंव्यांमध्यें दिसून येत नाहीं. मरणकालाशी मोक्षाचा संबंध ठेविला, तर शास्त्रीयदृष्ट्या त्यांत कांहीं अनुपपत्ति उत्पन्न होते, इकडे यत्किंचितही लक्ष दिलें न जातां संस्कृत श्लोकांतील शब्दांचा केवळ यथाश्रुत अर्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या मराठी ओंव्यांमधून विस्तारानें दिलेल्या आहे, ही गोष्ट कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

पण याच प्रश्नासंबंधाचे श्रीरामदासस्वामींचे पुढें दिलेले विचार मात्र पूर्णपणें स्पष्ट आणि सर्वभ्रमनिरसनकारक असे आहेत. ते येणेंप्रमाणें–

पुण्यनदीचें जें तीर। तेथेंचि पडावें शरीर।
हा इतर जनांचा विचार। साधु नित्यमुक्त ॥ १२ ॥

उत्तरायण तें उत्तम । दक्षिणायन तें अधम ।
ह्या संदेहीं वसे भ्रम । साधु तो निःसंदेह ।। १३ ।।
शुक्लपक्ष उत्तरायण । गृहीं दीप दिवा मरण ।
अंतीं रहावें स्मरण । गती कारणें ।। १४ ।।
इतुकें नलगे योगियासी । तो जीतचि मुक्त पुण्यराशी ।
तिळांजुळी पापपुण्यासीं । दिधली तेणें ।। १५ ।।

—दासबोध, ७-१०.

# दोन काळोखांत तीन काजव्यांचा लुकलुकाट! : : ५

'अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत अव्यक्त निधनान्येव'

हा भगवद्गीतेंतील एका सुप्रसिद्ध श्लोकांतील एक भाग आहे. हा श्लोक बऱ्याच लोकांच्या पाठांतरांतील असेल; किंवा कदाचित् नसेलही. परंतु यांतील तत्त्व मात्र प्रत्येकाच्या परिचयाचें आहे. परंतु तें तत्त्व या श्लोकांत जितक्या सुंदर रीतीनें मांडून दाखविण्यांत आलेलें आहे, तितक्या रीतीनें तें दुसऱ्या कोणाला क्वचितच मांडतां येईल. हीं सर्व भूतें, आणि त्यांत विशेषतः मनुष्यप्राणी, हे सगळे जन्मास येण्याच्यापूर्वीं यांची काय स्थिति असते हें कोणाला माहीत नसतें; त्याचप्रमाणें त्यांच्या निधनानंतर पुढें त्यांची काय स्थिति होते, हेंहि कोणाला माहीत नसतें, तर यांचे फक्त आदि आणि अंत यांच्यामधील स्थिति तेवढी काय ती प्रत्यक्ष दृग्गोचर होत असते. या विधानांतील सत्य कोणी सामान्य भाषेंत बोलून दाखविलें, तर त्याच्यावर कोणीहि नास्तिकपणाचा आरोप केल्याशिवाय राहाणार नाहीं. भगवद्गीतेमध्यें अर्जुनाला आत्मैक्यज्ञान करून देण्याच्या प्रकरणामध्यें या गोष्टीचें विधान समाविष्ट झालेलें असल्यामुळें त्याला

वेदान्तातील एका गहन तत्त्वाची बहुमानाची जागा प्राप्त झाली आहे. इंग्रजीमध्ये ॲडिसन या नावाचा एक सुप्रसिद्ध लेखक दोन शतकां-पूर्वी होऊन गेला. त्यानें याच तत्त्वाच्या प्रतिपादनासाठीं एक सुंदर रूपक रचून ही कल्पना मोठ्या मोहक रीतीने आपल्या वाचकांपुढें मांडली आहे. त्यानें अशी कल्पना केली आहे की, एका नदीवर एक मोठा पूल आहे, आणि त्या पुलावरून पुष्कळ लोकांची रहदारी चाललेली आहे. परंतु ते लोक पुलाच्या ज्या बाजूकडून येत आहेत, त्या बाजूकडे पुलाच्या सुरवाती-जवळ अतिशय दाट धुके पसरलेले आहे व तो पूल जेथें संपतो आणि ज्याच्या पलीकडे ते लोक जातात, त्या पुलाच्या दुसऱ्या टोंकालाहि अतिशय दाट धुकें पसरलेलें आहे. त्यामुळे हे सगळे प्रवासी त्या पुलावरून चालत जात असतांना मात्र दृष्टीस पडतात; पण ते आले कोठून आणि पुढें गेले कोठें, याच्याबद्दल कांहीं एक कळत नाहीं. अशा प्रकारचें ॲडिसननें हें जें रूपक रचिलेलें आहे, त्यांतील कल्पना आणि 'अव्यक्तादीनि भूतानि' इत्यादि श्लोकांतील कल्पना यांमध्यें पुष्कळच साम्य आहे. व यावरून असें निष्पन्न होतें कीं, या दोन टोकांच्या मधल्या स्थितीची मात्र काय ती आपल्याला प्रत्यक्ष माहिती असणें शक्य आहे; व त्याच्या आधीची आणि नंतरची कोणतीही प्रत्यक्ष माहिती असणें शक्य नाहीं.

पण जेथील प्रत्यक्ष माहिती आपल्याला नाहीं, अशा प्रदेशांतील व्यव-हार प्रत्यक्ष ज्ञानाच्या अभावी मनुष्याने बंद ठेवले आहेत, असें मात्र नाहीं. मनुष्य हा एक महत्त्वाकांक्षी प्राणी आहे आणि त्याच्या बुद्धीनें त्याला तसें बन-विलें आहे. त्याची बुद्धि जेथपर्यंत डोळे पोंचत असतील, तेथपर्यंत तर पहातेच; पण जेथें डोळे पोंहोचू शकत नाहीत, तेथेंहि पाहण्याचा ती प्रयत्न करीत असते. आणि या प्रयत्नामध्यें मनुष्याच्या बुद्धीनें कांहीसें यशही मिळविलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. जेथें डोळे प्रत्यक्ष पाहूं शकत नाहीत, तेथें डोळ्यांवांचून पाहण्याची कला आणि जेथें कान प्रत्यक्ष ऐकूं शकत नाहीत, तेथें कानांवांचून ऐकण्याची एक कला मनुष्याच्या बुद्धीनें शोधून काढिली आहे, यांत शंका नाहीं. या कलेला अनुमान असें नांव देण्यांत येतें. दृष्टावरून अदृष्ट जाणणें हें अनुमानाचें मुख्य कार्य होय. अशा रीतीनें मनुष्यानें अनुमान या नांवाचा एक नवीन मदतनीस आपल्या मदतीला

निर्माण करून घेतला असून प्रत्यक्ष आणि अनुमान या दोन प्रमाणांच्या साहाय्यानें तो आपलें व्यवहार चालवितो. अनुमानाशिवाय उपमान, अर्थापत्ति, अनुपलब्धि वगैरे आणखीही कित्येक प्रमाणें कित्येक शास्त्रकारांनीं अस्तित्वांत आणलेली आहेत. परंतु ते सगळे अनुमानाचेच प्रकार आहेत. कांहीं थोडथोडया फरकासाठी त्याना जरी ही निरनिराळीं नांवें देण्यांत आलेलीं असली, तरी सामान्यतः पाहिले असतां हे सगळे अनुमान प्रमाणाचेच निरनिराळे प्रकार असून अनुमानप्रमाणाचें तत्त्व हेंच त्या सगळयांत प्रधान आहे. सारांश, प्रत्यक्ष आणि अनुमान हीं मनुष्यापाशीं सर्वमान्य अशी ज्ञानसंपादनाचीं दोन साधनें आहेत, हे यावरून लक्षांत येण्यासारखे आहे.

आतां अव्यक्तादि आणि अव्यक्तनिधन असे जे दोन दुर्ज्ञेय प्रांत असल्याबद्दल वर सांगितलें आहे, त्या प्रांतांच्या विषयामध्यें मनुष्य आपल्या हातांतील प्रत्यक्ष आणि अनुमान या दोन साधनांचा कसा आणि कितपत उपयोग करूं शकतो, हें आपण पाहूं. मनुष्यानें आपल्या या अनुमानाच्या बळावर तर्कशास्त्राच्या पद्धतीनें बरेच सिद्धान्त प्रस्थापित केलेले आहेत. त्यांपैकीं व्यापकतेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आणि प्रस्तुत प्रश्नाच्या बाबतींत अत्यंत उपयुक्ततेचा असा सिद्धान्त म्हटला, तर तो कार्यकारणभावासंबंधींचा होय. कारणावांचून कार्य उत्पन्न होत नाहीं, आणि जेथें जेथें कार्य असतें तेथें तेथे कारण असलेंच पाहिजे, असा एक सत्य सिद्धान्त मनुष्याच्या तर्कशास्त्रानें सिद्ध करून ठेविलेला आहे. मनुष्याच्या डोळयांनीं लाखो वेळां असें पाहिले आहे कीं, जेथें जेथें अंकुर उत्पन्न होतो, तेथें तेथें त्याच्यापूर्वीं त्याच्या मुळाशी बीज असतें; आणि जेथे बीज नसतें, तेथें अंकुर केव्हांहि उत्पन्न होत नाही. असेच आणखीही निरनिरनिराळया प्रकारचे बीजांकुरन्याय मनुष्याच्या डोळयांनीं अनेक स्थळीं आणि अनेक वेळीं अव्यभिचरित रीतीनें पाहून आपल्या मनाला सांगितलें कीं, या जगाच्या सर्व व्यवहारांमध्ये कार्यकारणभाव सर्वत्र पसरलेला असला पाहिजे, असा तू सिद्धान्त बांधलास, तर त्यांत तुला कोठेंही हरकत येणार नाहीं. अशा पूर्वपरंपरेनें सिद्ध झालेला आणि सर्वव्यापी अशा वंशविस्तारानें शुद्ध झालेला असा हा कार्यकारणभावाचा सिद्धान्त जो मनुष्याच्या हातीं आलेला आहे, त्याच्यावरून मनुष्यानें वरील बिकट

प्रश्नाच्या बाबतीत काय अनुमान केलें ? तर या जीवनक्रमरूपी पुलाच्या प्रारंभीं जें दाट धुकें पसरलेलें होतें, त्यांत या अनुमानाच्या साधनानें त्यानें थोडासा प्रवेश केला; आणि 'अव्यक्तादीनि भूतानि' यांत सांगितल्याप्रमाणें तेथें जे अव्यक्तत्व होतें, त्यामध्यें थोडासा व्यक्तत्वाचा प्रकाश पाडण्याचा त्याने प्रयत्न केला म्हणजे मनुष्य जन्मास येतो, त्याच्यापूर्वीं त्याच्या पूर्वजन्मांतील कांहीं तरी कारणें अस्तित्वांत आलेलीं असलीं पाहिजेत कीं, ज्यांच्यामुळें हल्लीचा जन्म हें पूर्वीच्या जन्माचें कार्य उत्पन्न होतें, असें अनुमान मनुष्य बांधतो, व अशा रीतीनें तो पूर्वजन्माची सिद्धता करतो.

या पूर्वजन्माप्रमाणेंच आपल्याला पुनर्जन्मही असला पाहिजे असेंही अनुमान मनुष्य तर्कशास्त्राच्या जोरावरच बांधण्याला प्रवृत्त होतो. या बाबतीमध्ये विचारी मनुष्य आपले विचार असे मांडतो कीं, केलेल्या कर्माचें चांगलें किंवा वाईट जें कांही फळ असेल, तें मनुष्याला केव्हां तरी मिळालें पाहिजे. इहजन्मामध्यें आपल्याला जें कांहीं सुखदुःख प्राप्त होत आहे, तें जर आपल्या पूर्वजन्मीचें फळ म्हणून आपल्याला या जन्मामध्यें भोगावें लागत आहे, तर या जन्मांतील कर्मांचे जे परिपाक आपण येथें भोगिले नसतील, ते भोगण्याकरितां आपल्याला कोठें तरी आणि केव्हां तरी जन्म घेतला पाहिजे, हें अगदी उघड आहे. नाही तर कृतहानाचा, म्हणजे जें केलेलें असेल तें फुकट जाण्याचा, दोष आपल्या विचारसरणीवर येऊं लागेल. तेव्हां हा कृतहानाचा दोष टाळण्यासाठीं मनुष्य पुनर्जन्म मानण्याला प्रवृत्त होतो. ग्रीसमधील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता साक्रेटीस यानेंही ह्या कृतहानाच्या आपत्तीच्या कारणामुळेच पुनर्जन्म मानणें अवश्य आहे, असें प्रतिपादन केलेलें आहे. आणि कृतहानाची आपत्ति हाहि अनुमानाचाच एक प्रकार आहे. तेव्हां सारांश असा कीं, आपल्या या इहजन्माच्या आरंभाकडे आणि अंताकडे जें दाट धुकें पसरलेलें होतें, त्या धुक्याच्या काळोखामध्यें मनुष्यानें आपल्या या अनुमानाच्या बळानें प्रकाशाचा थोडासा चंचुप्रवेश करून घेतला. व तेवढ्यावरच पूर्वजन्म आणि पुनर्जन्म यांच्या इमारती रचण्याला त्यानें सुरवात केली.

कार्यकारणभाव आणि कृतहानप्रसंग ही जी दोन तत्त्वे मनुष्यानें या बाबतींत आपल्या मदतीकरितां घेतली आहेत, तीं तत्त्वें बहुतांशीं जरी सत्य असली, तरी तीं अगदीच निरपवाद आहेत, असें मात्र नाहीं. कार्य-कारणभावाचीच आपण गोष्ट घेतली, तर त्यांत आपल्याला काय दिसून येतें? या जन्माचें कारण पूर्वजन्मांत असले पाहिजे, असें या कार्यकारणभाव-संबंधावरून आपण म्हणतो. पण या कार्यकारणभावाची परंपरा मूळ कोठून सुरू झाली, असें आपण शोधीत शोधीत मागें मागें जाऊं लागलों, तर अखेरीस ही परंपरा अनादि आहे, असेंच मानून मनुष्याला स्वस्थ बसावें लागते. त्याचप्रमाणे कृतहानप्रसंग हाही कांही मोठासा शुद्ध आणि निरपवाद हेतु आहे असें नाही. एखाद्या क्षेत्रामध्यें एखाद्या शेतकऱ्यानें शंभर बीजें पेरली, तर त्या शंभरांपैकी सगळी शंभरच्या शंभर उगवतीलच, असा कांही सृष्टींतील निर्बंध नियमाने दिसून येत नाही. तरी पण सामान्यतः बीजाला अंकुर येतो, या न्यायानें केलेले कर्म फुकट जावयाचें नाही, त्याला बरेंवाईट कांहीं तरी फळ आलेच पाहिजे, आणि पुनर्जन्म मानला नाहीं तर अनुपभुक्त कर्माच्या फळांना अवकाश राहणार नाही म्हणून या कृतहान-प्रसंगाच्या निवारणासाठी पुनर्जन मानण्यांत येतो. सारांश, ज्या दोन अनुमानांच्या पायावर पूर्वजन्म आणि पुनर्जन्म यांच्या इमारती उभारण्याचा मनुष्यानें प्रयत्न केलेला आहे, त्या पायामध्ये कच्चेपणा कसा आहे, हे वरील विवेचनावरून लक्षांत येण्यासारखे आहे. व या कारणामुळेच पूर्वजन्म आणि पुनर्जन्म यांच्यावर विश्वास न ठेवणाऱ्या लोकांचेहि कांही लहान लहान पंथ निर्माण झालेले आहेत.

ते लोक आपले म्हणणे असे प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतात की, ज्या कार्यकारणभावावर तुम्ही इतका अतिभार टाकतां, तो कार्यकारण-भाव जरी सामान्यतः सत्य असला तरी त्या कार्यकारणभावावांचूनही यदृच्छेने सुद्धा या सृष्टीमध्ये काही थोडेथोडके व्यवहार चाललेले आहेत की काय? तेव्हा ज्या या संयोगवियोगात्मक सृष्टीमध्यें अनेक उत्पत्ति आणि विनाश यदृच्छेने घडून येत असतात, त्यांतीलच मनुष्यप्राण्याचा जन्म आणि मृत्यु हे नानाविध परमाणूच्या संयोगांचे आणि विभागांचे चमत्कार आहेत, अशा प्रकारच्या पद्धतीची ज्यांची विचारसरणी आहे, त्यांच्या

दृष्टीमध्यें पूर्वजन्म आणि पुनर्जन्म यांना फारशी जागा न मिळणें हें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु अशा लोकांची संख्या फार थोडी आहे. आणि जगांतील आतांपर्यंत होऊन गेलेल्या लोकांचें बहुमत पाहिलें, तर तें नास्तिक-पणापेक्षां आस्तिक्यबुद्धीकडेच निःसंशयपणें जास्त आहे. आणि यापासूनहि असें एक प्रमाण मनुष्याची बुद्धि नवीन निर्माण करीत असतें. तें असें कीं, इतक्या लोकांना जें खरें म्हणून वाटतें, तें खरोखरच खरें असलें पाहिजे. आणि या नवीन बहुमताच्या प्रमाणाचीहि मदत आपल्या बाजूला घेऊन अनुमान हें प्रमाण पूर्वजन्म आणि पुनर्जन्म यांची सिद्धता मोठ्या जोरानें प्रस्थापित करूं लागतें.

तरी पण मनुष्यप्राणी हा स्वभावतःच प्रत्यक्षप्रिय असल्यामुळें बऱ्याच वेळीं तो आपल्याला पूर्वजन्म होता आणि पूनर्जन्म आहे, या गोष्टी विसरून जातो. आणि आपल्याला कांही आगापिछा नाहीं अशा भावनेनें तो अनेक दुष्कृत्यें आणि दुराचरणें करण्याला प्रवृत्त होतो. पुनर्जन्माची आणि पर-लोकाची भीति त्याच्या डोळ्यांपुढें असते, तोंपर्यंत तो कांहीं तरी ताळ्यावर असतो. परंतु ही भीति त्याच्या दृष्टीआड झाली म्हणजे मनुष्यासारखें क्रूर श्वापद दुसरें कोणीहि नाहीं. या पाशवी वृत्तींतून त्याला मानवी वृत्तींत आणण्याकरितां पुष्कळ वेळां मनुष्याचें इहलोकीचें जीवन हें परलोकींच्या जीवनाशी कार्यकारणसंबधानें सदोदित निगडित झालेलें असतें. असें सिद्ध करून देणें ही गोष्ट अवश्य प्राप्त होतें. आणि म्हणून वर सांगितलेलें अनु-मानप्रमाण हें, आपल्या मदतीला आणखी कोणी प्रमाण येईल काय, अशा इच्छेनें शोध करूं लागतें. आणि या शोधामध्यें शाब्दप्रमाण या नांवाचें एक प्रमाण त्या अनुमानाच्या हातीं लागतें.

शाब्दप्रमाण म्हणजे शब्दप्रमाण होय. हा शब्द कोणाचा असला म्हणजे प्रमाण मानावयाचा, असा येथें साहजिकपणेंच एक प्रश्न उद्भवतो. पाहिजे त्या लबाड मनुष्याचा देखील शब्द प्रमाण मानावयाचा असा याचा अर्थ नव्हे. आणि म्हणून यासाठीं 'आप्तवाक्यं प्रमाणम्' असें या प्रमाणाचें एक स्पष्टीकरण सांगण्यांत येतें. आतां याच्यापुढें आप्तवाक्य कोणतें, असा प्रश्न साहजिकच येतो. आणि त्याचें उत्तर देतांना अपौरुषेय वाक्य आणि पौरुषेय वाक्य असे वाक्याचे दोन विभाग स्वाभाविकपणेंच करावे लागतात.

आपल्यामधील वेदब्राह्मणादिकांतील जीं वाक्यें तीं सगळी अपौरुषेय वाक्यें होत. पण त्यानंतर सूत्रकार, भाष्यकार, स्मृतिकार, धर्मशास्त्रकार वगैरे जे अनेक लोक होऊन गेलेले आहेत त्यांचीं वाक्यें जरी अपौरुषेय नसलीं, तरी तीं आप्तवाक्यें आहेत, याबद्दल संशय नाही. हें आपल्या धर्मातील जसें वर्गीकरण दाखविलेलें आहे, तशाच प्रकारच्या आप्तवाक्याच्या आणि आगम-प्रमाणाच्याविषयींच्या कल्पना इतर धर्मांतील लोकांच्या मधूनहि प्रचलित आहेत.

आतां, अनुमानानें आपल्या मदतीला हें जें एक नवीन शाब्दप्रमाण किंवा आगमप्रमाण घेतलें आहे, त्याचा तात्त्विक दृष्टचा अर्थ काय होतो, हें आपण पाहूं. सगळ्या प्रमाणांमध्यें प्रत्यक्षप्रमाण हें निर्विवाद प्रमाण होय.'चक्षुर्वै सत्यम्' या वाक्यामध्येहि हेंच तत्त्व अंतर्निविष्ट झालेलें आहे, जेथें प्रत्यक्ष-प्रमाण मिळालें, तेथें वाद संपला. पण सर्वच ठिकाणी या जगांत प्रत्यक्षप्रमाण मिळू शकतेंच असें नाहीं. आणि म्हणून प्रत्यक्षाच्या अभावीं या अनुमानाला किंमत येऊं लागते. प्रत्यक्षावरूनच अनुमान केलेलें असतें. म्हणून निर्दोष अशा अनुमानाला प्रत्यक्षाच्या जवळची जागा देण्यांत येते. पण अनुमानाला अनु-मान म्हणून कांहीं स्वतंत्र किंमत नाहीं; तर त्यांत प्रत्यक्षाचें बिंब प्रति-बिंबित झालेलें असतें, म्हणून त्याला किंमत. सारांश, मनुष्याचें मन आपल्या स्वतःच्या डोळ्यांना जितकें ओळखितें, तितकें तें दुसऱ्या कोणालाही ओळ-खीत नाही. अशी जर वस्तुस्थिति आहे, तर मग या दृष्टीनें पाहतां शब्द-प्रमाणाला इतका मान कां देण्यांत येतो, असा प्रश्न साहजिकपणेच उद्भवतो. व यासाठीं शब्दप्रमाण आणि प्रत्यक्षप्रमाण यांच्यामध्ये अन्योन्य आणि अंतर्गत असे काय संबंध आहेत, याचें परीक्षण करणे अवश्य प्राप्त होतें.

प्रत्यक्षप्रमाण हें प्रत्येकाचें स्वतःचे प्रमाण होय. जो मनुष्य आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी एखादी गोष्ट पाहतो, त्याला ती गोष्ट प्रत्यक्षप्रमाणानें ज्ञात होते. म्हणजे तें त्याचें स्वतःचें प्रमाण होय. आणि त्या स्वतःच्या प्रत्यक्षप्रमाणावरून तो जेव्हां एकाद्या अप्रत्यक्ष गोष्टीविषयी अनुमान काढतो, तेव्हां प्रत्यक्षजन्य ज्ञानापेक्षां त्याचें तें अनुमानजन्य ज्ञान जरी प्रत्यक्षाच्या दृष्टीनें कमी महत्त्वाचें असलें, तरी पण तें त्याचें स्वतःचें असतें. पण शाब्दप्रमाणाला तितकेंहि महत्त्व प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण

शाब्दप्रमाण म्हणजे काय? तर तें दुसरें कोणाचें तरी वाक्य होय. म्हणजे तें स्वतःचें नव्हे. म्हणजे त्या मानानें स्वतःच्या प्रत्यक्ष ज्ञानापेक्षां तें दुसऱ्यानें सांगितलेलें शाब्दज्ञान अधिक दूरचें ठरतें. आणि या विप्रकर्षामुळें प्रत्यक्ष प्रमाणापेक्षां शाब्दज्ञानाचें प्रामाण्य अर्थातच जास्त दुर्बल ठरतें. पण त्या शिवाय या शाब्दप्रमाणामध्यें आणखीहि एक विचार असतो. तो असा की, हें बोलून चालून दुसऱ्याचें असें जें शाब्दप्रमाण, त्याविषयीचें ज्ञान तरी त्या दुसऱ्याला प्रत्यक्षप्रमाणाने झालेले आहे किंवा अनुमानानें झालेलें आहे, ही गोष्ट अनिश्चितच राहते. म्हणजे ज्याला दुसऱ्याचें शाब्दप्रमाण स्वतःकरितां स्वीकारावयाचें असतें, त्याला दुसऱ्याचें हें शाब्दज्ञान प्रत्यक्ष-जन्य आहे किंवा अनुमानजन्य आहे, हें माहीत नसते. अशा स्थितीत या दुसऱ्याच्या शाब्दज्ञानाचें बलाबल आपल्याला कसें मोजतां येईल? तर त्यासाठी तें दुसऱ्याचे शाब्दज्ञान त्याला एक प्रत्यक्षाहून तरी झालेलें असेल, किंवा अनुमानापासून तरी झालेलें असेल, अशा दोन कल्पांची आपल्याला कल्पना करतां येण्यासारखी आहे. तेव्हां आतां या कल्पनेप्रमाणें पाहिलें असतां शाब्दज्ञान हे दुसऱ्याचें असल्यामुळें त्याचें बलवत्त्व आधीच कमी होते. पण त्यांतल्या त्यांत तें दुसऱ्याचें शाब्दज्ञान जर प्रत्यक्ष-जन्य असेल, तर त्यांत कांही तरी बलवत्व राहूं शकेल. पण तेंहि जर केवळ अनुमानजन्यच असेल, तर तें बलवत्त्व आणखीही पुष्कळ कमी होतें. ही गोष्ट या बलाबलाच्या अंतर्निरीक्षणावरून कोणालाहि नाकबूल करतां येण्यासारखी आहे, असें नाही. आणि बहुधा जेथें जेथे शाब्दप्रमाणाचा आधार आपल्या शास्त्रांतून दिलेला असतो, तेथें तेथें तें शाब्दज्ञान प्रत्यक्षजन्य आहे किंवा अनुमानजन्य आहे, याच्या बद्दलचा उलगडा केव्हांहि केलेला नसतो. या संदिग्धतेच्या अवस्थेमुळें शाब्दप्रमाणाचें प्रामाण्य प्रत्यक्ष प्रमाणाच्या तुलनेनें बरेंच कमी होतें. व तसें तें वास्तविक मानलें गेलें पाहिजे. परंतु जगांतील तत्त्वज्ञानामधील एकंदर विचारसरणीच्या पद्धतीकडे दृष्टि देऊन पाहिले असतां असें दिसून येतें कीं, बहुतेक धर्मांतील लोक स्वतःच्या प्रत्यक्षप्रमाणापेक्षा किंवा अनुमानप्रमाणापेक्षां दुसऱ्यानें सांगितलेल्या आगमप्रमाणावरच जास्त भरंवसा ठेवीत असतात.

अशी ही न्यायविरुद्ध आणि तर्कविरुद्ध प्रवृत्ति मनुष्याच्या मनानें कां पत्करावी, हा येथें एक मोठा प्रश्न आपल्या वाटेत आडवा येतो. दुसऱ्याचें शाब्दज्ञान हें प्रत्यक्षजन्य किंवा अनुमानजन्य या दोहोंपैकीं कोणत्या तरी एका प्रकारचें असावयाचें. आणि तें यांपैकी कोणत्याही प्रकारचें असलें, तरी स्वत:च्या प्रत्यक्ष ज्ञानापेक्षां त्याचें महत्त्व कमीच असलें पाहिजे, हे उघड आहे. असे असून हें आगमप्रमाण इतर सर्व प्रमाणांच्या डोक्यावर आपलें साम्राज्य चालवीत असतें, याची उपपत्ति कशी लावावयाची ? अव्यक्तादि आणि अव्यक्तनिधन अशा ज्या दोन अवस्था वर उल्लेखिल्या आहेत, त्यांच्या-संबंधाने प्रत्यक्ष ज्ञान कोणालाच नाही, ही गोष्ट निर्विवाद आहे. अशा स्थितींत मनुष्य आपल्या अनुमानप्रमाणाच्या बलावर या धुक्यानें झांकून गेलेल्या काळोखाच्या प्रदेशामध्ये 'यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नंतर:' या वचनाप्रमाणें प्रवेश करण्याचा प्रयत्न करीत असताना आगमनप्रमाणाने मध्यें येऊन त्या अनुमानप्रमाणाला असे सांगावयाचें कीं, 'नैषा तर्केण प्रतिरा-पनेया' 'अचित्या: खलु ये भावा न तांस्तर्केण योजयेत्' याचा अर्थ काय ? हीं रहस्यें मनुष्याला प्रत्यक्ष ज्ञानानें उकलतील अशी ठेवावयाची नाहीत, आणि मनुष्य आपल्या बाकी राहिलेल्या फक्त दुसऱ्या अनुमानज्ञानानें तीं उकलण्याचा यत्न करूं लागला तर त्याला सांगावयाचें कीं, 'नैषा तर्केण मतिरापनेया' आणि 'अचित्या: खलु ये भावा न तांस्तर्केण योजयेत्', 'हा मनुष्याच्या बुद्धीचा कोंडमारा नव्हे काय ? पण मनुष्याची उद्‌गमनशाली बुद्धि हा कोंडमारा सहन करू शकत नाही. आणि ज्या अनुमानाच्या उड्डाणा-ला 'नैषा तर्केण मतिरापनेया' इत्यादि वचनांनी आगमप्रमाण हे विरोध करण्याला प्रवृत्त होतें, त्या आगमप्रमाणाला मनुष्याचें अनुमानप्रमाण उलट असा प्रश्न विचारूं लागतें की:–" तू आम्हांला–आम्हा मानवी अनुमानांच्या शक्तीला–प्रतिरोध करितोस; तर, हे आगमप्रमाणा आमचा तुला असा प्रश्न आहे की, तुला तरी हे ज्ञान कोठून कळले ?

तुझ्या ज्ञानाचा उगम कोठून आहे, हे तू कधी स्पष्ट सांगत नाहींस. तुझें ज्ञान म्हणजे तरी कोणाचें तरी प्रत्यक्षजन्य किंवा अनुमानजन्यच ज्ञान असलें पाहिजे कीं नाही ? पण तें सगळे दडवून ठेवून आणि आपल्या कर्त्याचें आणि उत्पादकाचें नांव पुसून टाकून किंवा विसरून जाऊन तूं 'आगमप्रमाण'

'शाब्दप्रमाण' 'आप्तवाक्य' इत्यादि मोठ्या, पण मोघम, नांवांखालीं आम्हां प्रत्यक्ष, अनुमान, वगैरे प्रमाणांना दडपून टाकीत असतोस, ह्या तुझ्या दंडेलीला काय म्हणावें ?"

वर सांगितल्याप्रमाणें जरी वस्तुस्थिति आहे, तरी इतक्या निकरानें भांडल्यावर सुद्धां मनुष्याचें अनुमानप्रमाण हें आगमप्रमाणाच्या पुढें अखेरीस आपली मान वांकवितेंच, ह्यांत संशय नाही. आगमप्रमाणांतील आप्तवाक्य हें एक ईश्वराचें तरी वाक्य असले पाहिजे, किंवा त्याच्या खालोखालच्या दुसऱ्या कोणा तरी एखाद्या मानवी प्राण्याचें वाक्य असलें पाहिजे, याच्याशिवाय तिसऱ्या कोणाचे हें वाक्य होऊं शकत नाहीं, हें उघड आहे. आतां ईश्वरप्रणीत प्राचीन ग्रंथाविषयी किंवा अपौरुषेय ग्रंथाविषयीं पृथ्वीच्या पाठीवरील निरनिराळ्या धर्मांतील लोकांनी आपल्या धर्मपुस्तकांतून वाटेल तें लिहून ठविलेलें असलें, तरी कोणत्याहि धर्मातील ईश्वर दौतलेखणी आणि कागद घेऊन केव्हां तरी एक दिवस आपल्या धर्मांतील लोकांच्याकरितां त्यांचा आद्य धर्मग्रंथ लिहिण्यासाठी बसला होता, आणि कर्ता, कर्म, क्रियापद इत्यादिकांच्या बाबतींतील व्याकरणाच्या कोणत्याहि चुका न करितां, त्यानें ते धर्मग्रथ त्या त्या वेळच्या जगांतील सर्वरूढ असलेल्या भाषांतून लिहून काढिले, या कल्पना कोण लाहि अशक्यच वाटण्यासारख्या आहेत. परमेश्वराने कोणताच ग्रंथ लिहिलेला नाहीं, असें नाही. त्यानें एक धर्मग्रंथ लिहिलेला आहे आणि तो म्हटला म्हणजे ही सृष्टि हा तो त्याचा धर्मग्रंथ होय. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश, पर्वत, जरायुज, अंडज, उद्भिज आणि स्वेदज असे चतुर्विध प्राणी, इत्यादि सर्वांनीं मिळून झालेला जो ग्रथ, तो त्या परमेश्वराचा धर्मग्रथ होय हा धर्मग्रंथ त्यानें आपल्या विशेष प्रीतींतील अशा कोण याहि लेकराकरितां लिहिलेला नसून जे जे कोणी निर्मळ आणि निर्विकार बुद्धीनें या ग्रंथाचें परिशीलन करूं इच्छितील, त्यांच्याकरितां त्यानें तो लिहून ठेविलेला आहे. या धर्मपुस्तकांत परमेश्वरानें लिहून ठेविलेलीं धर्मतत्त्वें प्रत्येकानें आपल्या प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावींत किंवा अनुमानानें अनुमित करावींत. याच्याशिवाय शब्दघटित वाक्यात्मक असा परमेश्वरानें लिहून ठेविलेला दुसरा ग्रंथ कोठें असेल, तर प्राचीन वस्तुसंशोधकांना तो अद्यापि उपलब्ध व्हावयायचा

आहे! या सृष्टिरूपी परमेश्वराच्या ग्रंथाचें अध्ययन करून ज्या कोणी जीं कांहीं अनुमानें बांधलीं, तीं त्यांनीं पुढें शब्दघटित वाक्यांनीं लिहून ठेविलीं आणि त्यांच्यापासूनच बहुधा हीं सर्व आगमप्रमाणें उत्पन्न झालीं असलीं पाहिजेत. सारांश, जीं आज आगम प्रमाणें म्हणून कोणत्याहि धर्मांतून पुढें येतात, त्यांचें आद्यस्वरूप निर्विकार बुद्धीने आणि दुराग्रह सोडून पाहिलें तर तें अशा स्वरूपाचें असले पाहिजे, हें कोणालाहि कबूल करणें प्राप्त आहे.

इंग्रजी कवि शेक्सपिअर यानें आपल्या हॅम्लेट नांवाच्या नाटकांतील तिसऱ्या अंकांत—

The undiscovered country, from whose bourn
No traveller returns,

या शब्दांत म्हटल्याप्रमाणें जन्माच्या पूर्वीची आणि पुढची प्रत्यक्ष माहिती कोणालाच असणें शक्य नसल्यामुळे आणि वर वर्णन केलेल्या स्वरूपाच्या आगमप्रमाणामध्यें परमेश्वरानें त्या संबंधीची कांही प्रत्यक्ष माहिती कोणत्याही धर्मपुस्तकांत लिहून ठेवलेली असणें अशक्य असल्यामुळें आज जन्मपूर्व आणि मरणोत्तर अवस्थांच्यासबंधानें ज्या ज्या कांही गोष्टी आगमप्रमाण म्हणून कोणत्याही धर्मग्रंथांतून पुढें येत असतील त्या सर्व गोष्टी म्हणजे ती कोणाचीं तरी अनुमानप्रमाणेंच असली पाहिजेत, हें यावरून निश्चित होतें.

तरी पण ती अनुमानप्रमाणें मोठमोठ्यांच्या नांवावर प्रचलित झालेलीं आहेत, व त्यामुळें त्यांना महत्त्व आलेलें आहे. शिवाय कांही अनुमानें अशी आहेत की, तीं कोणी काढिली आणि केव्हां काढिलीं याच्याबद्दलची माहिती त्यांच्या पुरातनत्वामुळें आज लोपून गेलेली आहे. आणि वास्तविक जो बिननांवीं पुरावा असेल, त्याला लौकिक व्यवहारामध्यें जरी कमी महत्त्व देण्यांत येतें, तरी या पारलौकिक व्यवहारामध्यें याच्या अगदी उलट अशी स्थिती होऊन बसलेलीं आहे. आणि या पुराव्याच्या उत्पादकाचें नांव गांव कांहीं ठाऊक नाहीं, या कारणासाठीच त्याच्या अत्यंत प्राचीनत्वामुळें त्याला आत्यंतिक प्रामाण्य मानण्यांत येऊं लागलेलें आहे. आणि असल्या या प्रमाणांना आगमप्रमाण हें नांव रूढ होऊन व त्यांचें महत्त्व वाढलें जाऊन त्यांचा ताबा सामान्य

लोकांच्या प्रत्यक्ष, अनुमान वगैरे सामान्य प्रमाणांच्यावर बसूं लागलेला आहे. शिवाय वर्तमानकाळापेक्षां भूतकाळामध्यें एक प्रकारचें सामर्थ्य नेहमीच संचित झालेलें असतें. त्यामुळें वर्तमानकाळाच्या अनुमानापेक्षा प्राचीन काळापासून चालत आलेल्या अनुमानामध्ये त्याच्या प्राचीनत्वामुळें एक प्रकारचें सामर्थ्य उत्पन्न होतें, ही गोष्ट आपल्याला नाकबूल करतां यावयाची नाही जी आगम प्रमाणांतील दुसऱ्याची अनुमानें आज आपल्यावर आपला ताबा गाजवीत आहेत, तीं जेव्हां पूर्वीं आपल्या वर्तमानकाळीं अस्तित्वांत येत होतीं, त्या वेळी कदाचित् त्यांना जें महत्त्व नव्हतें, तें त्यांना हजारों वर्षांच्या कालगतीनें आज प्राप्त झालेले आहे. आणि या हजारों वर्षांच्या निबिड अंधकारामधून, किंवा या हजारों वर्षांच्या कोसळून पडलेल्या आणि कुजून गेलेल्या थडग्यांमधून, किंवा ज्यांच्यावर हजारों वर्षेपर्यंत सापांची आणि मुंग्यांचीं वारुळें वाढलीं आहेत, अशा त्या वारुळांच्या खालील जीर्ण समाधींमधून जेव्हां हीं प्राचीन अनुमानें आपल्यापाशीं बोलूं लागतात, आणि अमुक अमुक गोष्ट ही अमुक अमुक प्रकारचीच असली पाहिजे, असें आपल्याला अधिकारयुक्त वाणीनें सांगूं लागतात, त्या वेळी त्यांना नाही म्हणण्याचें सामर्थ्य या बिचाऱ्या एकट्या सांपडलेल्या वर्तमान-काळाला कोठून असणार ? शिवाय आणखीहि एक गोष्ट अशी आहे की, वर्तमानकाळ हा सरळपणानें आणि भाबडेपणानें असें म्हणत असतो कीं, मला या माझ्यामागच्या धुक्याच्या आणि माझ्यापुढच्या धुक्याच्या काळोखामध्यें कांही एक दिसूं शकत नाहीं. आणि या बाबतींत मी पूर्ण अज्ञानी आहें; अशा वेळी ‘ ज्या बाबतींत तुला दिसत नाहीं, त्या बाबतीत मला दिसत आहे ! जेथे तुझे डोळे पाहत नाहीत, तेथें माझे डोळे पाहूं शकलेले आहेत ! आणि जें ज्ञान तुला नाहीं, ते ज्ञान मला स्पष्टपणें प्राप्त झालेले आहे ! ’ असें कोणी एखादा भूतकाळ त्या बिचाऱ्या वर्तमानकाळाला एकटा गांठून सांगूं लागला, तर तो गांगरून जातो, आणि मला जें समजत नाहीं तें कदाचित् यांना समजत असेल, असें कबूल करण्याला तो प्रवृत्त होतो. कारण, ज्ञानाचें महत्त्व इतकें मोठें आहे कीं, त्या ‘ज्ञानाचा आभास हाहि अज्ञानाला आपली आज्ञा पाळावयाला लावितो.

शिवाय गतकालीन लोकांविषयी आपण ज्या कल्पना बनवून ठेविलेल्या असतात, त्याहि या आगमप्रमाणांतील अनुमानाचें वर्चस्व आपल्या मनावर प्रस्थापित करण्याला कारणीभूत होत असतात, हेंहि आपण विसरतां कामा नये. पूर्वी सुवर्णयुग होऊन गेलें; पूर्वीचे लोक दहा दहा हजार वर्षे जगत असत; पूर्वीचे तपस्वी हजारों वर्षे समाधि लावून ध्यानस्थ राहत होते; पूर्वीचे सत्पुरुष ईश्वराचे मुलगे असत; पूर्वीच्या कांहीं विशिष्ट लोकांना परमेश्वरानें या जगामध्यें कांहीं विशिष्ट गोष्टी करण्याकरितां आपले अवतार म्हणून पाठविले होते; ते लोक पाण्यावरून चालत असत आणि हवेमधून उडत असत; ते स्वतः वाटेल तितके दिवस उपास करीत असत आणि एका भाकरीच्या तुकड्यावर हजारों लोकांच्या क्षुधेचें निवारण करूं शकत असत; ते पाणी शिंपडून लोकांना बरे करीत असत आणि त्यांनीं आंधळ्या लोकांच्या डोळ्यांना आपला हात लाविला म्हणजे त्यांच्या डोळ्यांच्या खांचांमधून त्यांच्या डोळ्यांची बुबुळें बाहेर पडत असत; ते एकांतांत बसले असतां देवाचे देवदूत आपल्या पंखांनी उडत त्यांच्याजवळ येतात आणि त्यांच्या कानांत देवाचे निरोप सांगतात; देवांच्या पऱ्या आणि इंद्रलोकींच्या रंभा त्यांच्या सेवेला सादर असतात; ते चिरंजीव असतात; ते सहसा कधी मरतच नाहींत; आणि यदाकदाचित् मरण पावून ते थडग्यांत पुरले गेले, तरी तेथून ते जिवंत होऊन आकाशांत उडून जातात, आणि त्यांचीं थडगीं उकरून पाहावीत, तर ती रिकामी असलेली दिसून येतात; अशा निसर्गविरोधी चमत्कारांच्या आणि अद्भुतपणाच्या कल्पना ज्यांच्याविषयीं आपण बनवितों किंवा आपल्याकरितां बनवून ठेविलेल्या असतात, त्यांची हीं प्रत्यक्ष वचनें आहेत, त्यानें अमक्याला सांगितलें, त्या अमक्यानें मग तमक्याला उपदेश केला, आणि त्या तमक्याची गुरु-शिष्यपरंपरा अखंडित रीतीने आज १९२७ सालच्या फेब्रुवारी महिन्यापर्यंत अनादि कालापासून अबाधित आणि अखंडित रीतीनें चालत आलेली आहे, अशा अनेक कथापुराणांतील गोष्टींनीं आणि कल्पनांनीं वेष्टिलेलीं हीं आगमप्रमाणें जर या अलीकडच्या काळांतील एखाद्या मनुष्याच्या पुढें येऊन उभीं राहिलीं, तर तो इतक्या पूर्वपरंपरेच्या पारतंत्र्यापुढें आणि इतक्या या भूतकालाच्या भव्य आणि भयंकर भावनांच्या पुढें गर्भगळित होऊन

गेल्यावांचून कसा राहूं शकणार आहे? आणि "हे आगमप्रमाणांनो, तुम्हीं आपल्या अंगावर हीं जीं उसनीं अधिकाराचीं वस्त्रें घातलेलीं आहेत, तीं तुमचीं स्वतःचीं नव्हेत! आणि तुमचें खरें स्वरूप म्हटलें म्हणजे तुम्ही फक्त दुसऱ्या कोणाचीं तरी केवळ अनुमानानेंच आहांत!" असें त्यांना बजावून सांगण्याची कोणाला छाती होणार आहे? अशा स्थितीमध्यें

But that the dread of something after death,
The undiscovered country, from whose bourn
No traveller returns,—puzzles the will.
...... ....... ...... .......
Thus conscience does make cowards of us all,
And thus the native hue of resolution
Is sickled o'er with the pale cast of thought;
And interprises of great pith and moment,
With this regrard, their currents turn away,
And lose the name of action.

शेक्सपिअरनें वरील उताऱ्यांत वर्णन केल्याप्रमाणें गोंधळून गेलेल्या मनुष्याच्या मनाची स्थिति होऊन जाते. आणि मनुष्याची प्रत्यक्ष आणि अनुमान हीं प्रमाणें वास्तविक तुल्यबल असतांनाहि आगमप्रमाणाकडून जिकलीं जातात आणि तें आगमप्रमाण जें सांगेल तें सत्य मानू लागतात.

या व अशाचसारख्या अनेक कारणांनी अधिकबल झालेले आगम प्रमाण जेव्हां आपल्या मनावर आपला ताबा चालवूं लागतें, तेव्हां मग तें आगमप्रमाण जें जे सांगेल, तें तें मनुष्याच्या मनाला ऐकावें लागतें, व संवयीनें तें सत्यहि वाटू लागते. मनुष्याचें प्रत्यक्षप्रमाण आणि अनुमान-प्रमाण हीं हतबल होऊन आपला कमकुवतपणा कबूल करतात; व आम्हांला जन्माच्या पूर्वींच्या आणि मरणाच्या नंतरच्या स्थितीबद्दल कांहीं माहीत नाही, असें प्रांजलपणें प्रतिपादन करितात. आणि या शाब्दप्रमाणाला शरण येऊन तीं त्याच्यापाशीं करुणा भाकतात, समित्पाणि होऊन व दांतीं तृण धरून त्याच्या चरणीं आपलें मस्तक ठेवितात, आणि "हे शाब्दप्रमाणा, तूं आतां आम्हांला तीं जन्मपूर्वकालीन आणि मरणोत्तरकालीन रहस्यें

समजावून सांग ! " अशी त्याची विनति करितात. अशा रीतीनें हे दोन शिष्य शाब्दप्रमाणाच्या आश्रमामध्यें अध्यात्मविद्येच्या अध्यानाकरितां येऊन दाखल झाल्यानंतर त्यांची अनन्यभक्ति पाहून हे शाब्दप्रमाण त्यांना मग शिकवूं लागतें !

अशा रीतीनें या शिक्षणाला सुरुवात होते. आतां यानंतर जे शिक्षण शाब्दप्रमाणापासून मिळावयाचें, तें सगळीकडे सारखेंच आणि एकच असलें पाहिजे, अशी कोणालाहि अपेक्षा असणें अगदीं स्वाभाविक आहे. पण वस्तुस्थिति तशी असते काय? या शाब्दप्रमाणाच्या शाखा निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या रीतीने पसरलेल्या आहेत. पण त्या तशा असल्या तरी त्यांच्या मधल्या पायऱ्या आणि शेवटचें ध्येय यांच्या बाबतींत तरी या शाब्दप्रमाणाच्या सर्व शाखांमधून साम्य असलें पाहिजे कीं नको ? अश्व या नांवाच्या प्राण्याला ज्या चार लोकांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे, ते जर त्या अश्वाचें वर्णन करूं लागले, तर त्या सर्वांचें वर्णन जसें एकसारखेंच जमतें, त्याचप्रमाणें पारलौकिक विषयामधील अगदीं इत्थंभूत आणि बित्तं-बातमी आपल्याला आहे, आणि ती आम्ही तुम्हांला सांगत आहों, अशी ज्या शाब्दप्रमाणांची प्रतिज्ञा, त्या शाब्दप्रमाणांनी सांगितलेल्या निरनिराळ्या वृत्तांतांचा एकमेकांशी मेळ बसावयाला पाहिजे किंवा नको? पण तसा तर मेळ कोठेंच दिसून येत नाही. एका धर्मांतील शाब्दप्रमाणांकडून अगदीं खुद्द देवानें सांगितलेली म्हणून जी माहिती सांगण्यांत येते, तिचा दुसऱ्या धर्मांतील शाब्दप्रमाणाशीं मुळींच मेळ बसत नाही. एक धर्म या पारलौकिक बाबतींत एक सांगतो, तर दुसरा धर्म दुसरेंच कांहीं सांगतो, इतकेंच नव्हे, तर एकाच धर्मांतील दोन शब्दप्रमाणवादी शास्त्रकार घेतले, आणि जन्माचे प्रागभाव आणि विध्वंसाभाव यांच्यासंबंधाचीं त्यांचीं वर्णनें आणि प्रति-पादनें आपण वाचूं लागलों, तर त्यांच्यामध्येंहि साधर्म्य असल्याचें आपल्याला दिसून येत नाहीं. एकाच अदृष्ट गोष्टीबद्दलचें जर या सर्वदर्शी अशा शाब्द-प्रमाणाकडून स्वरूपनिरूपण करण्यांत येत आहे, तर त्या एकाच स्वरूपामध्यें असें भिन्नत्व कसें उत्पन्न व्हावें? अशा प्रकारच्या अनेक प्रश्नांचें संशय-निवृत्तिकारक प्रत्युत्तर आपण देणें जरूर आहे, याबद्दलची अवश्यकता शाब्दप्रमाणाला केव्हांही भासलेली नाहीं.

शिवाय, हे शाब्दप्रमाण जेव्हां ही पारलौकिक वर्णनें प्रतिपादन करीत असतें, त्या वेळेला त्या वर्णनामध्ये इतकी बारकाई भरलेली दिसून येत असते की, कोणी तरी प्रत्यक्ष पाहून येऊन हीं वर्णनें दिलेली असली पाहिजेत, असा वाचणाराच्या मनाचा एकदम ग्रह होऊन जातो. अलीकडच्या एखाद्या अत्यंत सुधारलेल्या भूगोलाच्या पुस्तकामध्येहि एखाद्या प्रत्यक्ष पाहिलेल्या नद्यांचें, डोंगरांचे आणि अरण्यांचे वर्णन जितक्या कसोशीनें दिलेलें असेल त्यापेक्षां जास्त कसोशीनें मरणोत्तरकालीं प्रवास करतांना लागणाऱ्या नद्या, डोंगर आणि अ ण्यें यांची लांबी,रुंदी,खोली, अक्षांश, रेखांश, खनिज द्रव्यें, हिंस्र पशु, तेथे वाहणारे वारे, तेथे होणारे उल्कापात, वगैरेबद्दलचें, जणूं काय प्रत्यक्ष नकाशे तयार करून त्यावरूनच ही वर्णनें लिहिण्यात येत आहेत, असा भास होतो. हीं वर्णनें लिहिली जात असता त्यांत कर्मविपाकशास्त्राची तत्त्वें येऊन आपले हक्क शाबीत करीत असतात. त्याचप्रमाणें सूर्य, चंद्र, शुक्र, शनि, इत्यादि नवग्रहही दूर राहूनसुद्धां आपले परिणाम प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत असतात. त्याचप्रमाणें चित्रगुप्ताचा अस्सल कागदोपत्री पुरावा आणि त्याच्या विरुद्ध जीवमानदशेमध्यें संतोषित करून ठेवविलेल्या लहानमोठ्या देवतांच्या भिडेभाडेच्या आणि वशिल्याच्या शिफारसीच्या चिठ्याचपाट्या यांच्या तडजोडीमधून निष्पन्न होणारे कित्येक परिणामहि त्या ठिकाणी दृग्गोचर होत असतात. अशा प्रकारचीं हीं इहलोकीचीच पारलौकिक जलाशयामध्यें पडलेली प्रतिबिंबें इतर धर्माच्या ग्रंथातून आणि आपल्या पुराणादिकांतून थोडीथोडकी पाहावयाला सांपडतात, असें नाही. पण असली ही सूक्ष्म आणि तंतोतंत वर्णनें इतर स्थूल ग्रंथांतून दृग्गोचर होतात, असे नसून, त्यांची मूळ बीजें आपल्यांतील उपनिषदसारख्या आद्य आणि श्रेष्ठ ग्रथांतूनही पहावयाला सांपडतात.विस्तारभयास्तव पुराणांतील वगैरे इतर गोष्टींचें निर्देश न करितां उपनिषदांतील जन्माच्या उत्तरकालीन आणि प्राक्कालीन उत्क्रांतीच्या आणि पुनरावर्तनाच्या संबंधाचा फक्त एकच उतारा आपण नमुन्याकरितां घेऊं.

"तद्य इत्थं विदुर्ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते तेऽर्चिषमभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान् षडुदङेति मासांस्तान्। १। मासेभ्यः संवत्सरं संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषो

मानवः स एनां ब्रह्म गमयत्येष देवयानः पन्था इति ।।२।। अथ य इमे ग्राम इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिं रात्रेरपरपक्षमपर-पक्षाद्यान्षड्दक्षिणैति मासांस्तान्नैते संवत्सरमभि प्राप्नुवन्ति ।।३।। मासेभ्यः पितृलोक पितृलोकादाकाशमाकाशाच्चंद्रमसमेष सोमो राजा तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्ति ।।४।। तस्मिन्यावत्संपातमुषित्वाऽथैतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते यथैतमाकाशमाकाशाद्वायुं वायुर्भूत्वा धूमो भवति धूमो भूत्वाऽभ्रं भवति ।।५।। अभ्रं भूत्वा मेघो भवति मेघो भूत्वा प्रवर्षति त इह व्रीहियवाओषधिवन-स्पतयस्तिलमाषा इति जायन्तेऽतो वै खलु दुर्निष्प्रपतरं यो यो ह्यन्नमत्ति यो रेतः सिञ्चति तद्भूत एव भवति ।।६।।

हा उतारा छांदोग्य उपनिषदामधून घेण्यांत आला आहे. त्यात मनुष्यप्राणी मरण पावल्यानंतर त्याचें दहन केलें जात असतां त्याच्या पापपुण्याच्या मानाने त्याचा आत्मा अग्नीच्या ज्वाळांतून किंवा धुरांतून निरनिराळ्या मार्गानें आणि निरनिराळ्या पायऱ्यांवरून वर जातो, व तेथून तो मुक्त व्हावयाचा नसला तर फिरून खाली येऊं लागतो; व आकाश, वायु, धूम, अभ्र, मेघ, पर्जन्य, व्रीह्यादि अन्न आणि रेत, यांच्या द्वारानें तो फिरून जन्माला येतो अशी ही प्रणालिका येथे जुळवून देण्यांत आलेली आहे. आगमप्रमाणानें जरी "अचिंत्याः खलु ये भावा न तांस्तर्केणण योजयेत्" अशी तर्कप्रमाणाला सक्त ताकीद देऊन ठेविलेली आहे, तरी देखील ज्याचा जो धर्म असेल, तो त्याला कधी सुटावयाचा नाहीं, या न्यायानें तर्कप्रमाण हें आगमप्रमाणानें रचलेल्या या अवडंबरामध्यें हळूच डोकावून पाहूं लागते. आणि या उत्क्रांतीच्या व पुनरावर्तनाच्या रचलेल्या चक्रांतील प्रत्येक दुवा तर्कशास्त्र हळूच तपासून पाहूं लागलें असतां त्या तपासणीत तर्काला काय आढळून येते ? तर्क हळूच आपल्या मनाशी म्हणतो--" अरे ! या शाब्दप्रमाणानें मला सांगितले कीं, [हे तर्का, हे विषय अगदी अचिंत्य आहेत ! तेव्हां आतां या बाबतीत तू अगदीं गप्प बैस ! आणि आम्ही शाब्दप्रमाणें तुला जे सांगू तें तूं मुकाट्यानें ऐक ! या शब्दप्रमाणाच्या गंभीर गर्जनेच्या दबकावणीला भिऊन मी गप्प बसलों खरा ! पण या शब्दप्रमाणानें तरी आतां हें, जे चितेच्या अग्नीतील ज्वालेपासून किंवा धुरापासून मनुष्याच्या रेतापर्यंत पुनरावर्तनाचें

पर्यंटण आणून पोंचविलें, तें तरी तर्काच्या जोरावरच नव्हे काय? त्यांत तर्काच्या जोरावरच एकापुढील एक पायऱ्यांची सांखळी जुळवून दिली असल्याची कल्पना स्पष्ट दिसत नाहीं काय? आणि फिरून ज्या तर्काला गप्प बसवावयाचें, त्याची तर मदत यांत घेतलीच आहे! पण त्या तर्काची मदत देखील निर्दोष रीतीनें घेण्यांत आलेली नाही! मी स्वत: तर्कच जर या पुनरावर्तनाच्या सांखळीचे दुवे एकांत एक अडकवून देण्याच्या कामावर बसलों असतों, तर त्यांत अव्याप्ति आणि अतिव्याप्ति यांचे दोष अशा रीतीनें केव्हांही राहूं दिले नसते. पण आगमप्रमाणाच्या लक्षांत हे दोष आले नाहींत. ज्यांची प्रेतें दहन केलीं न जातां पुरलीं जातात किंवा पाण्यांत टाकिलीं जातात, त्यांच्या बाबतींत अग्नीच्या ज्वाळेचा किंवा धुराचा संयोग संभवणें अशक्य आहे; त्याचप्रमाणें जे केवळ मांसाहारी असतील, त्यांच्या रेतामध्यें व्रीहियवांच्या किंवा तिलमाषांच्या द्वारानें आत्म्याचा प्रवेश शक्य नाही; या गोष्टीकडे या आगमप्रमाणाचें जितकें लक्ष जावयाला पाहिजे होतें, तितकें गेलेलें नाहीं."

असो. या वरील एकंदर विवेचनावरून हें लक्षांत येईल कीं, आगमप्रमाण हें देखील एक प्रकारचें अनुमानप्रमाणच आहे व या आगमप्रमाणाच्या मदतीनेंही मरणोत्तरकालीन स्थितीविषयी मनुष्याला फारसें निश्चित ज्ञान प्राप्त झालेलें आहे असें नाहीं.

प्रत्यक्ष ज्ञान अवश्यच आहे. आणि अनुमानाप्रमाणें कांहीं थोडेसे ठोकळ सिद्धान्त ठरविले आहेत. आणि आगमप्रमाणाच्या नांवाखालील दुसऱ्या कांहीं अनुमानांनीं त्या ज्ञानांत थोडेसें गांभीर्य उत्पन्न केलें आहे. पण अशा रीतीनें अपरोक्ष, अनुमान आणि आगम, या तीन काजव्यांनीं जरी आपल्या लुकलुकाटांची शिकस्त केली आहे, तरी गर्भशय्येच्या पूर्वींचा आणि स्मशानशय्येच्या नंतरचा असे जे हे दोन अज्ञात प्रदेश त्यांच्यामधील काळोखावर या लुकलुकाटानें फारसा प्रकाश पडला आहे, असें नाहीं. अशी एकंदर या प्रश्नांच्या संबंधाची परिस्थिति आहे. पण जेथें प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्यापासून फारसें ज्ञान मिळणें शक्य नाहीं, तेथें मनुष्य स्वाभाविकपणेंच आगमप्रमाणावर आपली भिस्त ठेवितो. आणि याच्याशिवाय बिचारा दुर्बळ मनुष्य प्राणी दुसरें जास्त काय करूं शकणार आहे? दुसरें कांहीं ज्ञानसाधन नाहींच

अशा स्थितीत आगमप्रमाण जें सांगेल तेंच प्रमाण, असें मानणें हेंच शहाणपणाचें आहे. बाकीच्या लोकांजवळ देखील याच्यापेक्षां पारलौकिक ज्ञानासंबंधानें दुसरें कांहीं जास्त साधन नसतें. तेव्हां त्यांच्यापाशीं जितकी साधनसंपत्ति असेल तितकी तरी साधन संपत्ति आपल्यापाशीं असावीं, अशी प्रत्येक मनुष्यानें खबरदारी घेणे अवश्य आहे. याच साधनसंपत्तीच्या जोरावर पूर्वींचे लोक भवसागर तरून गेले, असें पूर्वींचे जे लोकप्रवाद आहेत, त्यांच्यावर अन्य साधनांच्या अभावी आपणहि श्रद्धा ठेवून चालावें, यांतच आपलें हित आहे शिवाय ज्यांनीं हीं आगमप्रमाणें लिहून ठेविलीं, त्यांचें अंतःकरण ईश्वरी कृपेनें प्रसन्न होऊन त्यांत कदाचित् हीं आध्यात्मिक रहस्यें ईश्वरी प्रेरणेनें प्रतिबिंबित झालीं असतील! कारण सर्वांचीच मनें सारखीं असतात, असे नाही. त्यांत कांही तारतम्य असतेंच. तेव्हां या दुर्ज्ञेय विषयामध्यें आपल्यापेक्षां पूर्वींच्या कोणा सत्पुरुषांच्या मनामध्यें जास्त ज्ञान उत्पन्न झालें असलें आणि त्यांनी तें आपल्याकरितां उपदिष्ट केलेलें असलें, तर त्याचाही फायदा आपण कां घेऊं नये? सगळ्या साधनांचा संग्रह ज्याच्यापाशी असतो, तोच जास्त यशस्वी होतो, असा ऐहिक व्यवहारामध्येंही जर आपण नियम पाहतों, तर पारलौकिक व्यवहारामध्यें सुद्धां आपल्याला शक्य तितका आनंदघनरस प्राप्त होण्याकरितां आपणही या आगमप्रमाणांनीं सांगितलेल्या साधनांचा संग्रह करणे आवश्यक आहे. आगम प्रमाणें ही बहुतेक अदृष्ट फलासाठीच असतात. तीं अदृष्ट फलें खरोखर आहेत, अशी श्रद्धा ठेवण्यात आपलें कांहीं नुकसान नाहीं. श्रद्धा हा एक मानसिक धर्म आहे. पण ती श्रद्धा देखील इतर साधनांनीं वाढवितां येणार नाहीं, असें नाहीं. आणि उपयुक्ततेच्या शास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें असतां सुद्धां श्रद्धेपासून एकंदरीत फायदेच आहेत. आगमप्रमाणाच्या अनुरोधानें आपण श्रद्धा ठेविलीं असतां भावी अदृष्ट फलें तर आपल्याला मिळतीलच मिळतील. पण त्या भावी अदृष्ट फलांचा आपल्या ऐहिक आयुष्यावरही परिणाम होतो आणि त्या अदृष्ट फलांचीं कांहीं कांहीं दृष्ट फलें आपल्याला येथेंही चाखावयाला मिळतात. त्याचप्रमाणें बाह्येंद्रियजन्य ज्ञानें आपल्याला प्रमाणभूत गोष्टी म्हणून कांहीही सांगत असोत, परंतु त्या सगळ्या बाह्येंद्रियांपेक्षां जास्त महत्त्वाचें असें आपलें अंतरिंद्रिय जें मन तें बाह्येंद्रि-

यादिकांच्या आणि त्यांच्या प्रमाणादिकांच्या मध्यस्थीशिवायही कधी कधीं प्रत्यक्ष परमेश्वराची गाठ घेऊं शकत असतें. चित्तवृत्ति शुद्ध झाली असतां असें आत्मैक्यभावाचे प्रसग जेव्हां प्राप्त होतात, त्यावेळीं आपल्या अंतःकरणामध्यें जी स्फूर्ति होते, तिच्या अनुरोधानें वागणें यांतच सर्व ज्ञानांचें बीज सांठविलेलें आहे. तो सर्वत्र आणि सर्वशक्तिमान् परमेश्वर आपल्याला जें दाखवील तें आपलें प्रत्यक्षप्रमाण, तो आपल्याला जी बुद्धि देईल ते आपलें अनुमानप्रमाण, आणि तो आपल्या जें सांगेल तें आपलें आगमप्रमाण! याच्यापेक्षां स्वभावतःच पंगु बनविण्यांत आलेला मनुष्यप्राणी जास्त काय करूं शकणार आहे ?

—चित्रमय जगत्, फेब्रुवारी १९२७.

## ज्ञानेश्वरींतील षड्दर्शनें : : ६

श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीं पहिल्या सुमारें वीस ओंव्यांमध्ये आपल्या पूर्वीच्या वैदिक वाङमयांतील निरनिराळ्या ग्रंथ समुच्चयावर गणपतीच्या निरनिराळ्या अवयवांचा आरोप करून वाङमयविषयक एक सुदर रूपक बनविले आहे; व आपल्या प्रारभ्यप्रमाण ग्रंथाच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठी श्रीमंगलमूर्तीच्या वंदनाच्या स्वरूपाचें शिष्टाचार संमत असें एक मंगल रचून त्या द्वारानें पुढील ग्रंथांतील विषय प्रतिपादनाला अवश्य लागणारें जें आत्मैक्यज्ञान त्याला आधारभूत असें जें आपलें पूर्वकालीन वाङमय त्याचें त्यांनीं सविस्तर रीतीनें विवरण केलें आहे. हें ज्ञानेश्वरीच्या सर्व वाचकांना माहीतच आहे. त्या ओंघामध्यें वेद, स्मृति, पुराणें, वगैरेंचें प्रतिपादन करून झाल्यानंतर षड्दर्शनांच्या प्रतिपादनाच्या प्रसंगानें पुढील ओव्या रचण्यांत आल्या आहेत :—

देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृती ।
म्हणऊनि विसंवादे धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥
तरी तर्कु तोचि फरशु । नीतिमेदी अकुशु ।
वेदांतू तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥
एके हाती दतु । जो स्वभावता खंडितु ।
तो बौद्धमत संकेतु । वार्तिकाचा ॥ १२ ॥
मग सहज सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु ।
धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥ १३ ॥

ह्या श्लोकामध्यें आपल्या संस्कृत वाङ्मयांतील सहा दर्शनांवर गणपतीच्या सहा हातांचा आरोप करण्यांत आला आहे. ह्या रूपकासंबंधानें दोन प्रकारच्या शंका उपस्थित होतात. हल्लीच्या गणपतीच्या बहुतेक मूर्तींना आपण चारच हात असलेले पाहतों. तेव्हां श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं गणपतीला हें सहा हात कोठून आणून लाविलें हा एक प्रश्न, आणि दुसरा प्रश्न असा कीं, ह्या सहा हातांचा आरोप ज्या दर्शनावर केला आहे ती दर्शनें कोणतीं? यापैकीं पहिल्या प्रश्नाचें समाधान असें आहे कीं, कृत, त्रेत, द्वापार, इत्यादि युगभेदांच्या अनुरोधाने गणपतीच्या भुजांचे भेद गणेश पुराणामध्यें वर्णिलेले आहेत. कृतयुगांत गणपतीला दहा होते, पुढें त्रेतायुगांत त्या हातांची संख्या सहा मानण्यांत आली; आणि चार हातांची मूर्ति ही त्याच्या-पुढील युगांतील होय. श्री. चिंतामणराव वैद्य ह्यांनी पंजाबांतील कांग्रा व्हॅलीमध्यें पाहिलेली गणपतीची एक मूर्ति सहा हातांची असल्याबद्दल आपल्या एका लेखांमध्यें पूर्वीं प्रसिद्ध केले आहे. त्यावरून सहा हातांच्या गणपतीच्या मूर्ति हल्लीं जरी उपलब्ध नाहीत, तरी पूर्वी त्या होत्या असें दिसतें, व ही सहा हातांची संख्या त्रेतायुगांतील गणपतीची आहे हेंही गणेश पुराणाच्या आधारावरून सिद्ध होतें. तेव्हां या पूर्वींच्या कल्पनेला आणि प्रचाराला अनुसरून श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ही गणपतीच्या सहा हाताची कल्पना आपल्या उपयोगाला आणिली असली पाहिजे. शिवाय, दहा, सहा आणि चार, अशा तीन प्रकारच्या हातांच्या गणपतीचीं वर्णनें गणेशपुराणांत असतांना त्यापैकीं सहा हातांचाच गणपती त्यांनीं येथें अंगिकृत केला आहे. याचेंही कारण उघडच आहे. त्यांना सहा दर्शनांवर

गणपतीच्या कोणत्या तरी सहा अवयवांचा आरोप करावयाचा होता, व त्यासाठी द्वितिय युगांतील गणपतीचे सहा हात त्यांना आयतेंच सांपडल्या-मुळें त्यांनी तेच आपल्या रूपकाच्या कार्यासाठीं उपयोगांत आणले.

आतां ह्या सहा हातांचा ज्या षड्दर्शनांवर आरोप करण्यांत आला आहे, तीं सहा दर्शनें कोणतीं, या प्रश्नाच्या विचाराकडे आपण वळूं श्रीज्ञानेश्वर महाराजांनी वर उद्धृत केलेल्या ओव्यांमधून जी शब्द-योजना केलेली आहे, ती इतकी संदिग्ध आणि साधारण आहे कीं; तिच्या-वरून हीं षड्दर्शनें अमकच होत, असें निश्चयात्मक रीतीनें ठरवितां येत नाहीं. "तरी तर्कु तोचि फरशु ।" या चरणामधील "तर्क" या शब्दानें गौतमाच्या न्याय्य दर्शनाचा उल्लेख केलेला असावा, असें दिसतें. त्याच्या-मुळें "वेदांतु तो महारसु" या चरणांत वेदान्त दर्शनाचा उल्लेख स्पष्ट आहे. आणि "धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु" या चरणांमध्यें "अथातो ब्रह्मजिज्ञासा" या मीमांसेंतील पहिल्या सूत्राच्या अनुरोधानें "धर्म" या शब्दावरून मीमांसा दर्शनाचाच उल्लेख केलेला असला पाहिजे असें मानण्यांत येते. याप्रमाणें न्याय, वेदान्त, आणि पूर्व मीमांसा या तीन दर्शनांचे उल्लेख बरेच स्पष्ट आहेत. परंतु बाकीच्या तीन दर्शनांचे उल्लेख तितके स्पष्ट नाहीत. 'नीतिभेदुअंकुशु" यानें कोणीं कणादाचें वैशेषिक दर्शन घेतात; किंवा कोणी येथे गौतमाच्या न्यायदर्शनाचा उल्लेख आहे असें समजून मागील चरणांतील "तर्क" या शब्दानें कणादाच्या वैशेषिक दर्शनाचा निर्देश केला आहे, असें मानतात. त्याचप्रमाणें "मग सहजें सत्कार वादू" या चरणामध्यें सांख्यदर्शनाचा उल्लेख आहे, असें मानण्यांत येतें व "बौद्धमत संकेतु । वार्तिकाचा ॥" यामध्यें बौद्धमताचा निर्देष तर स्पष्टच आहे. सारांश, हे वर दिलेले अर्थ बरोबर आहेत, असें धरून चालल्यास हीं दर्शनें मूळ ज्ञानेश्वरीतील क्रमानुसार येणेंप्रमाणें प्राप्त होतात :—

(१) न्याय, (२) वैशेषिक, (३) वेदान्त (४) बौद्धमत, (५) सांख्य व (६) पूर्व मीमांसा.

ज्ञानेश्वरीतील षड्दर्शनांचीं हीं नांवें व त्यांचा हा क्रम पाहिला म्हणजे ज्ञानेश्वर महाराजांनीं ही षड्दर्शनांचीं नांवें कोठून घेतली आणि त्यांचा

असा हा उलटासुलटा क्रम काय म्हणून बदलला, याच्याबद्दल कांहीं कल्पना करतां येत नाहीं. सामान्यतः षड्दर्शनें म्हटली म्हणजे (१) न्याय (२) वैशेषिक, (३) सांख्य, (४) योग, (५) पूर्वमीमांसा आणि (६) उत्तर मीमांसा अथवा वेदान्त हींच सहा मानलीं जातात. दर्शन हा शब्द दृश् धातुपासून उत्पन्न झालेला असून ज्याच्यायोगानें निश्रेयसप्राप्ती होऊं शकते असें जें तत्त्वज्ञान तें दर्शन, असा दर्शन या शब्दाचा अर्थ आहे. आतां आपल्याकडील सर्व तत्त्वज्ञान हें बहुशः वेदाच्या आधारावर विरचित केलेलें असल्यामुळें तें वैदिक परंपराप्राप्त होय, हें उघड आहे. पण आपल्या आर्यावर्तात देखील सगळेच लोक श्रुतीला प्रमाण मानणारे होते, असें नाहीं. तर कांही लोक श्रुतीला प्रमाण न मानतां स्वतंत्ररीतीनेंही तत्त्वज्ञानाचा विचार करण्याला प्रवृत्त झालेले होते.

याप्रमाणें वेदाला प्रमाण मानणारे आणि न मानणारे असे हे जे दोन पक्ष, त्यांच्यांतील मतभेदाचें मुख्य बीज काय आहे, हें आपण पाहूं. दर्शन म्हणजे निश्रेयस प्राप्तीला साधनीभूत होणारे असें सम्यकज्ञान अथवा तत्त्वज्ञान होय, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां हें ज्ञान मनुष्याला कसे प्राप्त होतें? तर आपण असें पाहतों कीं, मनुष्याच्या ज्ञानाचें मुख्य साधन 'प्रत्यक्ष' हें होय. पुढें प्रत्यक्षावरून मनुष्य अप्रत्यक्ष वस्तूचेंही ज्ञान अनुमानानें मिळवू शकतो. म्हणून प्रत्यक्षाप्रमाणेंच अनुमानालाही ज्ञानसाधनत्व प्राप्त झालेलें आहे. याशिवाय उपमान, अनुपलब्धि आणि अर्थापत्ति हीही तीन ज्ञानसाधनीभूत प्रमाणें आणखी मानण्यांत येतात. या शेवटच्या तीन प्रमाणांमध्यें कांहीं थोडाबहुत फरक असला, तरी मुख्यत्वेंकरून ही अनुमान प्रमाणाचीच रूपांतरें होत. या दृष्टीनें पाहिलें असतां प्रत्यक्ष व अनुमान हीच दोन मुख्य प्रमाणें होत, असें आढळून येतें. आणि यांच्याशिवाय श्रुति किंवा आगम हें एक तिसरें मुख्य प्रमाण म्हणून मानण्यांत येतें. यालाच शाब्दप्रमाण असेंहि नांव देण्यांत येतें. तेव्हां आतां प्रत्यक्षर, अनुमान आणि श्रुति, हीं जी तीन मुख्य प्रमाणें झालीं, त्यांपैकी प्रत्यक्ष आणि अनुमान ही दोन प्रमाणें तर (चार्वाकांशिवाय) कोणीहि मान्य करतातच. त्याच्याबद्दल वादच नाहीं. पण मुख्य वाद जो कांहीं आहे, तो श्रुति या प्रमाणाबद्दल आहे. एक पक्ष

श्रुति प्रमाण मानतो व दुसरा मानीत नाहीं. व त्यामुळें आस्तिक आणि नास्तिक असें तत्त्वज्ञानामध्यें दोन भेद झालेले आहेत. ईश्वराचें अस्तित्व मानणारा आस्तिक आणि न मानणारा तो नास्तिक असा आस्ति आणि नास्तिक ह्या शब्दांचा एक अर्थ रूढ झालेला आहे. पण त्या अर्थाचा या तत्त्वज्ञानाच्या प्रातामध्यें या दोन शब्दांत जरी थोडा-बहुत अंतर्भाव झाला असला, तरी येथें मुख्यत्वेकरून वेदाला प्रमाण मानणारा तो आस्तिक आणि न मानणारा तो नास्तिक हाच प्रधान अर्थ विवक्षित आहे. यावरून आतां असा निष्कर्ष निघतो की, जे नास्तिक पक्षांतील तत्त्ववेत्ते आहेत, ते फक्त प्रत्यक्ष किंवा प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्यावरच आपल्या तत्त्वज्ञानाची इमारत उभारतात. पण याच्या उलट जे आस्तिक पक्षांतील तत्त्ववेत्ते आहेत, ते प्रत्यक्ष आणि अनुमान (आणि तज्जन्य इतरप्रमाणें) यांची तर मदत घेतातच; पण प्रथमतः श्रुतीच्या प्रामाण्यांवर आपले सिद्धान्त प्रस्थापित करून प्रत्यक्षानुमानादिक प्रमाणांनींही ते आपल्या या श्रुतिमूलक सिद्धांन्तांचें योग्य रीतीनें समर्थन करितात. अशा रीतीने या प्रमाणभेदाच्या दृष्टीनें अस्तिक आणि नास्तिक असे हे दोन प्राथमिक पक्षभेद उत्पन्न झालेले आहेत. त्यांपैकी पहिल्या अस्तिक संप्रदायाच्या पक्षामध्यें ज्या सहा दर्शनांचा समावेश करण्यांत येतो ती (१) न्याय, (२) वैशेषिक, (३) सांख्य, (४) योग, (५) पूर्व मीमांसा व (६) उत्तर मीमांसा हीं सहा दर्शनें होत; व जेव्हां जेव्हां षड्दर्शनाचा सामान्यतः उल्लेख करण्यांत येतो, तेव्हां तेव्हां हीच सहा दर्शने बहुधा अस्तिक लोकांच्या दृष्टीनें अभिप्रेत असतात.

परंतु श्रीज्ञानेश्वर महाराजांनी ज्या सहा दर्शनांचा उल्लेख केलेला वर सांगितलें आहे, त्यांत याहून कांहीं निराळयाच दर्शनांचीं नांवें आलेलीं आहेत. तेव्हां हीं दर्शनें त्यांनी कोठून घेतलीं, ह्याबद्दल ज्यास्त विचार करणें जरूर आहे. पूर्वीं आस्तिक आणि नास्तिक असें तत्त्वज्ञानाचे दोन संप्रदाय सांगण्यांत आलेले आहेत. त्यांपैकीं आस्तिक पक्षाचीं जशीं न्यायवैशेषिकादिक सहा दर्शनें आहेत, त्याचप्रमाणें नास्तिक पक्षाचींही दुसरी सहा दर्शनें आहेत. त्या नास्तिक पक्षांतील सुप्रसिद्ध जैन ग्रंथकार श्री हरिभद्रसूरि यांनीं 'षड्-दर्शन समच्चय' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यांनीं

बौद्धं नैयायिकं सांख्य जैनं वैशेषिकं तथा ।
जैमेनियं च नामानि दर्शनानाममून्य हो ॥

या श्लोकांत (१) बौद्ध, (२) नैयायिक, (३) सांख्य, (४) जैन, (५) वैशेषिक व (६) जैमिनीय अशी सहा दर्शनांचीं नांवें दिलेलीं आहेत. ही अर्थातच श्रुतिप्रामाण्य न मानण्याऱ्या नास्तिक पक्षांतील सहा दर्शनें होत. पण ह्या षड्दर्शनांच्या बाबतींत याहूनही दुसरे कित्येक आढळून येतात. न्याय, वेशेषिक, सांख्य आणि जैमिनीय ही चार आस्तिक मतवाद्यांची त्यांनीं आपल्यामध्ये कांहीं कारणासाठीं घेतलीं आहेत, इतकेंच नव्हे तर त्यांच्यांतील इतर लेखकांनीं आपल्या दर्शनांची याहूनही निराळीं नांवें दिलेलीं आहेत. कोणी (१) सौत्रांत्तिक, (२) वैभाषिक, (३) योगाचार, (४) माध्यमिक, (५) जैन व (६) लोकयतिक अशीं दर्शनांची नांवें देतात, तर कोणी (१) मीमांसक, (२) सांख्य, (३) नैयायिक, (४) बौद्ध, (५) जैन व (६) चार्वाक अशींही नांवें देतात. अशा ह्या षड्दर्शनांच्या नांवांच्या आणि संख्येच्या संबंधानें पुष्कळ घोटाळा आढळून येतो. पण हा त्यांचा घोटाळा फक्त येथेंच थांबत नसून "ब्रह्मजालसुत्त" म्हणून जो एक बौद्धांचा सूत्रग्रथ आहे, त्यांत गौतमबुद्धाच्या पूर्वी व गौतमबुद्धाला ज्ञात झालेल्या अशा बासष्ट भिन्न भिन्न दर्शनांचा उल्लेख असून त्याशिवाय इतर कित्येक बौद्ध ग्रंथांमध्ये "असियसयं किरियाणं अकिरियवाईण हुंति चुलसीई। अन्नणिय सत्तठ्ठी वेणह आणंच वत्तीस ॥ अशीतिशतं (१८०) क्रियाणामक्रियावादिनो भवन्ति चतुरशीतिः (८४) आत्मवादिनः सप्तयष्ठि (६६) विनियवादिनांच द्वात्रिशत् (३२) ॥" इत्यादि श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ह्या दर्शनांची संख्या ३६३ पर्यंत नेऊन पोंचविण्यांत आलेली आहे. व याशिवाय आणखीही कित्येक भेद आहेतच. ते जास्त घोटाळा वाढविला जाईल, या भीतीनें येथें देण्यांत आलेले नाहीत.

यावरून बौद्धांनीं या दर्शनांच्या संख्येच्या बाबतीत किती अव्यवस्था उत्पन्न करून ठेवलेली आहे, याची कल्पना येण्यासारखी आहे. आतां या नास्तिक पक्षांतील ही अव्यवस्था सोडून आपण आस्तिक पक्षाकडे वळलों, तर त्यांत देखील हीं दर्शनें कोणतीं व त्यांची संख्या किती

याबद्दल फारच थोडी एकवाक्यता दृष्टोत्पत्तीस येते. दर्शनांची संख्या सहा असून न्यायवैशेषिक सेश्वर आणि निरीश्वर सांख्य, व पूर्व आणि उत्तर मीमांसा, अशीं त्यांचीं सहा नांवें बहुधा सांगण्यांत येतात. पण आपल्यामध्यें 'सर्वदर्शनसंग्रह' म्हणून एक विद्यारण्य स्वामींनीं केलेला प्रतिष्ठित ग्रंथ आहे. त्यामध्यें एकंदर सोळा दर्शनांचा उल्लेख करण्यांत आलेला असून त्यांची नावे (१) चार्वाक, (२) बौद्ध, (३) जैन, (४) रामानुज, (५) पूर्णप्रज्ञ, (६) नकुलीश पाशुपत, (७) शैव, (८) प्रत्यभिज्ञा, (९) रसेश्वर, (१०) वैशेषिक, (११) नैयायिक, (१२) जैमिनि, (१३) पाणिनी, (१४) सांख्य, (१५) योग, (१६) शांकर, येणेंप्रमाणें देण्यांत आलेली आहेत. यांत नास्तिकांच्याहि कित्येक दर्शनांचा समावेश करण्यांत आला असून प्रतभिज्ञा, रसेश्वर, पाणिनी, इत्यादिकांच्या सारखीं कांहीं नवीन दर्शनेही यांत घालण्यांत आलीं आहेत. वास्तविक निश्रेयस-प्राप्तीला साधनीभूत असें सम्यग्ज्ञान म्हणजे दर्शन, असा दर्शन शब्दाचा अर्थ जोपर्यंत घ्यावयाचा आहे, तोंपर्यंत तर्कशास्त्र, व्याकरणशास्त्र किंवा रसायन-शास्त्र, यांच्यासारख्या लौकिकशास्त्राची या दर्शनाच्या यादीमध्ये परिगणना करणें हें कांहीं योग्य नव्हे व अशा दृष्टीनें आपल्या ह्या जुन्या शास्त्रांचें नवे वर्गीकरण करणें अत्यंत आवश्यक आहे. शिवाय, 'सर्वदर्शन संग्रह' हे ग्रंथाला नांव देऊन त्या ग्रंथामध्यें निरनिराळ्या सर्व दर्शनांच्याबद्दल जर ऊहापोह करावयाचा आहे, तर सर्वदर्शनें म्हणजे किती दर्शनें व ती कोण-कोणती दर्शनें यांचा या पुस्तकांत प्रारंभी अगर शेवटी अवश्य उलगडा व्हावयाला पाहिजे होता. या पुस्तकांत जी दर्शनें दिलेलीं आहेत, ती दर्शनें म्हणून देण्याला योग्य आहेत, व त्यांची संख्या यांच्यापेक्षां जास्तही नाहीं किंवा कमीही नाहीं, असें जेव्हां सप्रमाण सिद्ध करून दाखविण्यांत येईल, तेव्हांच अशा पुस्तकाला 'सर्वदर्शन संग्रह' हें नांव अन्वर्थक रीतीनें योग्य होईल. परंतु असा प्रयत्न या पुस्तकांत केलेला नाही. आणि त्यामुळें दर्श-नांच्या इतिहासाच्या बाबतीत सर्वदर्शन संग्रह हें पुस्तक व्हावें तितकें निर्णायक होऊं शकत नाहीं. याच्याशिवाय महाभारतामध्यें अनुगीता पर्वांतील ४९ व्या अध्यायांत या निरनिराळ्या मतांच्या दर्शनांचा एक उल्लेख आलेला आहे. त्यासंबंधींचे श्लोक पुढें दिले आहेत. या श्लोकांमध्यें

त्या निरनिराळ्या मतांचीं स्वरूपेंच फक्त वर्णन केलेलीं आहेत; परंतु त्या मतांचीं निदर्शक अशीं रूढ झालेलीं दर्शनांचीं नांवें त्या श्लोकांतून अंतर्निविष्ट केलेलीं नाहींत. पण ती नांवें महाभारताचे टीकाकार, नीलकंठ यांनी आपल्या टीकेमध्यें कांहीं कांही ठिकाणी दिलेलीं आहेत. ती दर्शनांचीं नांवें त्या त्या श्लोकांमधून कंसांमधून दिलीं आहेत.

ऊर्ध्वं देहाद्वदन्त्येके नैतदस्तीतिचापरे (लोकायताः) ।

केचित्संशयितं सर्वं (स्याद्वादिन) निःसंशयमथापरे (तैथिकाः)॥२॥ अनित्यं (तार्किकादायः) नित्यमित्येके (मीमांसकाः) नास्ति (शून्यवादिनः) अस्तित्यपिचापरे (सौगताः) एकरूपं द्विधेत्येके (योगाचाराः) व्यामिश्र-मितीचापरे (उडुलोमाः)॥ ३ ॥ म्यन्यन्ते ब्राह्मणा एव ब्रह्म शास्तत्व दर्शिनः। एकमेके (सगुणोपासाकाः) पृथक्चान्ये (मीमांसकाः) बहुत्वम पिचापरे (परमाणुमादिनः) ॥४॥

देशकालावुभौ केचित् (ज्योतिर्विदः) नैतद स्तीति चापरे (वृद्धाः)।

जटाजिन धरीश्चन्ये मुंडाः केचिद् संवृताः ॥ ५ ॥

अस्प्रानं केचिदिच्छन्ति स्नानमप्यरेजनाः ।

मन्यन्ते ब्राह्मणादेवा ब्रम्हज्ञास्तत्वदर्शिनः ॥६॥

आहारं केचिदिच्छन्ति केचिच्चानशनेरताः ।

कर्म केचित्प्रसंसन्ति प्रशान्ति चापरेजनाः ॥७॥

याचप्रमाणें याच्या पुढीलहि सहासात श्लोकामध्यें आणखी कांहीं सांप्रदायांची सामान्य वर्णने देण्यांत आलेलीं आहेत; पण त्यांना दर्शनांची विशेष नांवें टीकेमध्यें दिलेलीं नसल्यामुळें ते श्लोक येथे उद्धृत केले नाहीत.

असो. या दर्शनांच्या बाबतीत विचार करतां करतां आपण येथपर्यंत येऊन पोंचलो आहोंत. श्रीज्ञानेश्वरमहाराजाच्या षड्दर्शनांच्या उल्लेखावरून आपल्याला येथपर्यंतचा हा विचार आणि विस्तार करणें भाग पडले. आतां या विवचनावरून हें स्पष्ट होत आहे आहे की, बौद्धदर्शनाचा—(बौद्ध मत सकेतु। वार्तिकाचा ॥)—या वरील ज्ञानेश्वरांच्या दर्शनांच्या यादीत जरी उल्लेख आलेला असला, तरी तें नास्तिक सांप्रदायांतील एक दर्शन आहे. व त्या नास्तिक दर्शनाचा श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या सारख्यांनी आपल्या ग्रंथामध्यें उल्लेख करावा, याशिवाय बौद्धमताचा संकेत काय व त्याचें वार्तिक कोणतें,

हेंही निश्चित रीतीनें ठरविण्याला कांहीं साधन नाहीं. बौद्धमताचें खंडन आस्तिक पक्षाकडून करण्यांत आलेलें आहे. या अभिप्रायानें गणपतीच्या खंडित दांताच्या सादृश्यानें बौद्ध मताचा उल्लेख येथें केलेला आहे, असें कोणी म्हटलें, तर त्यांतहि कांहीं विशेष स्वारस्य आहे असें नाहीं.

ज्ञानेश्वरीतील या पहिल्या अध्यायांतल्याप्रमाणें पुढे तेराव्या १३ व्या अध्यायामध्यें आणखी एकदां दर्शनाचा उल्लेख आलेला आहे ती ओंवी येणेंप्रमाणें :—

चाळितां हेचि बोली । दर्शनें शेवटा आलीं
तेवीचि नाहीं बुझावली । अझुनि द्वंद्वें ॥१५॥

परंतु या ओंवीमध्यें 'दर्शनें' या शब्दापलीकडे जास्त कांहीं नसल्यामुळें प्रस्तुतच्या प्रश्नावर जास्त कांहीं प्रकाश पडणें शक्य नाहीं. या ओंवीच्या पुढें तीन ओंव्या टाकून त्यानंतर पुढीलप्रमाणें तीन ओव्या आलेल्या आहेत :—

नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढें बंड ।
तें देखोनी पाखांड । आनची वाजे ॥१९॥
म्हणती तुम्ही निर्मूळ । लटिके हे वाग्जाळ ।
ना म्हणसी तरी पोफळ । घातले आहे ॥२०॥
पाखांडाचे कडे । नागवे लुंचिती मुंडें ।
नियोजिलीं वितंडें । तालासि येती ॥२१॥

यांत आस्तिक पक्ष आणि नास्तिक पक्ष यांच्या मधील भेदाचा स्पष्ट उल्लेख असून जैन वगैरे दर्शनांच्या अनुयायी लोकांची निंदाही व्यक्त आहे. असें असून मंगलाचरणांतील ओव्यामध्येंही बौद्ध दर्शनाचा बाकीच्या आस्तिक दर्शनांच्या बरोबरीनें कसा व कां निर्देष करण्यांत आला आहे, हें कोडे उलगडण्याला कोठें कांहींच साधन उपलब्ध होत नाहीं.

—चित्रमय जगत् डिसेंबर १९२८

## ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे ! : : ७

पूर्वी अशी एक वेळ होती कीं, जेव्हां देवभोळे आणि धर्मभोळे असेच बहुतेक लोक असल्यामुळें त्यांच्या मनोरंजनाकरितां वाटेल त्या बनावट थापा मारल्या तरी चालत असत. वेडगळ लोकांना असत्य किंवा अशक्य असें या जगामध्यें केव्हांच आणि कांहीही नसतें. त्यांना सर्व कांही खपतें. त्यांच्या देवभोळेपणाला चक्षुरिंद्रिय हें देवानें मुळीं दिलेलेंच नसतें. अशी स्थिति असल्यामुळें त्या पूर्वीच्या काळांत कोणी कांही सांगितलें किंवा लिहून ठेवले, तरी तें त्या वेळच्या त्या बावळट लोकांना सर्वच खरें वाटत असे. परंतु हल्लीची स्थिति तशी नाहीं हल्लीच्या काळांत देवभोळेपणा आणि धर्मभोळेपणा यांना बिलकुल जागा नाही. आणि हल्लीच्या या इंग्रजी अमदानीमध्यें तर कांही एका विशिष्ट नाण्याखेरीज दुसरें कोणतेंही खोटें अगर हिणकस नाणें चालणे शक्यच नाहीं. हल्लीच्या दिवसांत प्रत्येक रुपया खणखणीत वाजवून मग घेण्यांत येत असतो. अशा काळांत जुन्या पुराणांतल्या कांहीं कांहीं गोष्टींवरून लोकांचा भरंवसा उडाला, तर त्यांत कांही आश्चर्य आहे, असें नाही.

जुन्या गोष्टींची छाननी करण्याकरितां हल्ली किती तरी नव्या संस्था निघालेल्या आहेत. व त्या संस्थांतून अलीकडचे सगळे जाडे जाडे विद्वान् रात्रंदिवस मेहनत करीत आहेत. कोणी इतिहाससंशोधन करीत आहेत, तर कोणी पुराण वस्तूचें संशोधन चालविलें आहे, कोणी फाटके कागद वाचीत आहेत तर कोणी ताम्रपटावरची अक्षरें उकलीत आहेत, कोणी पृथ्वीच्या पाठीवरील शिलालेख वाचण्यांत गुंतलेले आहेत, तर कोणी पृथ्वीच्या पोटांत गडप झालेलीं जुनी शहरें उकरून काढून पृथ्वीच्या पृष्ठभागावर आणीत आहेत. कोणी पृथ्वीच्या पोटांत काय काय घटकावयव आहेत याचा

शोध करीत आहेत, तर कोणी मंगळावरील रहिवासी लोकांशीं आपला पत्रव्यवहार सुरू करण्याच्या खटपटींत आहेत. कोणी पृथ्वीवर पसरलेल्या समुद्रांतील नवीन बेटांचा तपास करण्यासाठीं फिरत आहेत, तर कोणी उत्तरध्रुवाचा शोध लावण्याच्या लालसेनें विमानांतून वर उडून खालीं बर्फामध्यें बुडून जात आहेत पुराण संशोधनाच्या अशा विविध लाटा चोहोंकडे उठत असतां त्यांचा प्रादुर्भाव आपल्या इकडेही न होणें हें अगदीं अशक्य आहे. व तदनुरोधानेंच अलीकडे आपल्या इकडील एका मोठ्या शहरीं पुराणवस्तुसंशोधकांची एक लहानशी टोळी स्थापन झाली आहे कोणत्याही संस्थेला जर स्थिरता उत्पन्न व्हयाला पाहिजे असेल, तर तिला आधी सरकारांत नेऊन रजिस्टर केली पाहिजे, ह्या राजमान्य तत्त्वाला अनुसरून या टोळीने हा आपला क्लब सरकारदरबारीं सुरवातीला रजिस्टर करून घेतला आहे. त्यामुळें आतां ही टोळी यावच्चंद्रदिवाकरौ चालू राहण्याला कोणत्याही प्रकारची हरकत नाही. शिवाय या संस्थेनें चांगलें काम करून दाखविलें, तर सरकारकडूनही या संस्थेला उत्तरोतर जास्त जास्त मदत मिळण्याला अडचण पडणार नाहीं. या संस्थेच्या सभा दरमहिन्यांतून कांहीं ठराविक दिवशी भरतात व त्यांमध्ये पुराणवस्तु-संशोधनाच्या निरनिराळ्या विषयांवर निरनिराळे निबंध वाचले जातात. हे सगळेच निबध नवीन माहितीनें भरलेले असतात. परंतु 'ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे !' या मथळ्याचा जो एक निबंध नुकताच या संस्थेच्या लहानशा दालनांतील हजारों लाकडी खुर्च्यांच्या समोर वाचण्यांत आला, तो नवीन माहितीनें तर भरलेला आहेच, परंतु त्यांतील अनुमानें करण्याची पद्धतही अगदीं नवीन आहे. त्यामुळें हा विषय वाचकांना मनोरंजक होईल, असें वाटल्यावरून त्या निबंधांतील मुख्य मुख्य गोष्टीचा सारांश पुढें देण्यांत येत आहे :—

हा निबंध सदर संस्थेच्या चालू १९२६ सालच्या एका बैठकीमध्यें वाचला गेलेला असल्यामुळें त्याच्यांतील ताजेपणा अद्यापि बिलकुल शिळा झालेला नाहीं. व या निबंधाचे लेखक हे हल्लीच्या नवीन निघालेल्या प्रतिसहकारपक्षाचें एक खंदे शिपाई असल्यामुळें त्यांतील विचारसरणीही सर्व लोकांना मान्य होण्यासारखी अशीच आहे.

त्या निबंधाच्या मथळ्यांत म्हटल्याप्रमाणें त्या निबंधांतील मुख्य प्रतिपाद्य विषय 'ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे !' हा आहे. व या विषयांतील सिद्धान्त अखेरीस मोठ्या मार्मिकपणानें आणि बिनतोडपणानें सिद्ध करून दाखविण्यांत आलेला आहे. पण ध्रुवाची गोष्ट खोटी आहे हें सिद्ध करून दाखविण्याला पहिल्याने ध्रुवाची खरी गोष्ट काय आहे, याची वाचकाना आठवण करून देणें आवश्यक आहे. सूर्यवंशामध्यें उत्तानपाद या नांवाचा एक मोठा राजा होता. त्याला सुरुचि आणि सुमति अशा दोन बायका होत्या. त्यांपैकीं सुमतीच्याच पासून ध्रुव हा पुत्र उत्पन्न झाला व असें होणें हे साहाजिकच होतें. सुरुचि आणि सुमति यांच्यामध्यें निसर्गाच्या नियमाच्या अनुरोधानें सवतीमत्सरही नांदत होता. व सुमतीच्या पोटी ध्रुव हे पुत्ररत्न उत्पन्न झाल्यामुळें तर तो मत्सर जास्तच वाढत चालला होता. अशा स्थितींत ध्रुव हा सात आठ वर्षांचा झाल्यानंतर एके दिवशी तो राजवाड्यामध्यें खेळत असतां उत्तानपाद राजाला त्या आपल्या मुलाबद्दल अनिवार प्रेम उत्पन्न होऊन त्यानें त्याला आपल्या मांडीवर घेतले. ते पाहून त्याची सापत्न माता जी सुरुचि, तिला अतिशय त्वेष आला व तिनें त्याला लाथ मारून खालीं ढकलून दिलें. तेव्हां ध्रुवाला वाईट वाटलें आणि त्यानें परमेश्वराला प्रसन्न करून घेऊन आपल्याला अढळपद मिळवून घेतलें. अशी या गोष्टीची सामान्य रूपरेषा आहे. ही गोष्ट विष्णुपुराण, श्री मद्भागवत, वगैरे पुराणांतून अत्यंत हृदयद्रावक रीतीनें वर्णिलेली आहे. ती गोष्ट वाचीत असतांना किंवा ऐकत असताना ज्याच्या डोळ्यांतून अश्रु आले नाहीत, आणि ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले नाहींत, असा मनुष्य विरळाच सांपडेल !

पण आजपर्यंत ही ध्रुवाची गोष्ट वाचून लोकांनी जें अश्रु गाळले, ते फुकट गाळले ! कारण, या अडाणी लोकांपैकीं एकालाही अशी कल्पना आली नाहीं कीं, आपण ज्या गोष्टीसाठीं आपले अश्रु फुकट दवडीत आहों, ती गोष्ट अजिबात खोटी आहे ! ज्या नवीन संशोधकांनी ही ध्रुवाची गोष्ट खोटी म्हणून ठरवली आहे, त्यांच्यापाशीं त्यांच्या म्हणण्याला अगदीं भरभक्कम पुरावाही आहे. ते असें म्हणतात कीं, ही ध्रुवाची गोष्ट खरी असू

शकेल काशी? त्यांच्या वादविवादांतील मुख्य मुद्दा आपल्याला आई म्हणवून घेणारी ध्रुवाची सावत्र आई जी सुरुचि तिने ध्रुवाला किती लाथा मारल्या, याच्या विषयीचा आहे. या मुद्याचीं शहानिशा करून घेण्याकरितां त्यांनीं हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणच्या सगळ्या अठराही पुराणांच्या छापील व हस्तलिखित प्रती जमविल्या आहेत; इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानांतून विलायतेस ज्या पोथ्या नेण्यांत आलेल्या आहेत, त्याही त्यांनीं इंडिया ऑफिसच्या मार्फत आणविल्या आहेत. पण या सगळ्या पोथ्यांतील मूळ श्लोक आणि पाठभेद तपासून पाहतां त्यात ध्रुवाच्या सावत्र आईनें त्याला एकापेक्षां जास्त लाथ मारली असल्याचा उल्लेख कोणत्याही पोथी-मध्यें सांपडत नाहीं. तेव्हा ध्रुवाच्या सावत्र आईनें ध्रुवाला फक्त काय ती एकच लाथ मारलेली असली पाहिजे ही गोष्ट त्यांनीं अशा पुराव्यानें अगदीं निर्विवादपणें सिद्ध करून घेतली आहे. व ध्रुवाच्या आईनें ध्रुवाला मारलेल्या लाथांची संख्या एकापेक्षां जास्त बिलकुल नव्हती, हा सिद्धान्त त्यांनीं आधीं ठामपणें निश्चित करून घेतल्यानंतर या सिद्धान्ताच्या पायावर त्यांनी पुढे उभारलेलीं इमारत अशी आहे कीं, जर ध्रुवाला त्याच्या सावत्र आईनें फक्त एकच काय ती लाथ मारलेली होती, तर तेवढ्यावरून त्याच्या मनांत इतका तीव्र उद्वेग कसा उत्पन्न व्हावा? एकच लाथ आणि तिच्यापासूनच इतका भयंकर त्वेष, यांच्यामधील कार्यकारणभाव शक्य दिसत नाही. या दोन गोष्टींत विसंगतपणा आणि असंभवनीयता हीं मात्र स्पष्ट दिसून येतात. फक्त एकाच काय त्या लाथेपासून इतका परिणाम उत्पन्न होईल कसा? आम्ही इतक्या लाथा खाल्ल्या असून आमच्या मनावर त्या लाथांपासून कांहीं एक परिणाम झालेला नसतां तो या ध्रुवाच्या मनावर फक्त एकाच लाथेपासून व्हावा, हें अगदीं असंभाव्य आहे! फक्त एक लाथ खाल्ल्याबद्दल इतकी लाज वाटावी? आम्ही पहा! शेकडों लाथा खाल्ल्या आहेत, तरी फिरून निर्लज्जपणानें नोकरी पत्करून जास्त लाथा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा धरीतच आहों! स्वराज्यप्राप्ति काय वाटेवर पडली आहे! त्याच्याकरितां निर्लज्जपणा, बेशरमपणा, कोडगेपणा इत्यादि सद्गुणांची कमाल उडवून द्यावी लागते, तेव्हां कोठें उन्मत्त झालेली राजसत्ता वठणीवर येते! म्हणे एका लाथेनेंच लाज

वाटली ! पण एका लाथेनें इतकी लाज वाटेल कशी ? मनुष्यांचीं मनें हीं येथून तेथून सगळयांचीं सारखीच बनविलेलीं असतात. आमचीं मने कांहीं निराळ्या तऱ्हेचीं बनवून ध्रुवाचें मन मात्र एका लाथेनेंच इतकें चिडून जाण्यासारखें देवानें ज्वालाग्राही बनविलें असेल, अशी कल्पना करणें हें मानसशास्त्राच्या तत्त्वाच्या अगदी विरुद्ध आहे. असला पक्षपात परमेश्वर कधींही करीत नसतो. तेव्हां ही ध्रुवाची गोष्ट कोणी तरी बनावट करून जुन्या पुराणांतून घुसडून दिली असली पाहिजे, हें आम्ही स्वानुभवावरून निखालस ठरवूं शकतों. कारण ध्रुवाला इतका राग यावा कसा, हेंच आम्हांला समजत नाही ! ध्रुवच काय तो तेवढा मनुष्य होता आणि आम्ही काय जनावरें आहोंत ? त्याला जसे नाक, कान, डोळे होते तसेच ते आम्हांलाही आहेत. व यावरून मनुष्यत्वावर आमचाही तितकाच हक्क शाबीत होतो, हें कोणीही कबूल केलें पाहिजे. मग आम्ही इतक्या लाथा खात असतां आम्हांला कधींही राग शिवला सुद्धां नाहीं. आणि या ध्रुवालाच कोठून एकदम इतका राग आला ? बरें, आमच्यापेक्षां त्या पोरसवदा ध्रुवाला राजकारणाचें जास्त ज्ञान होतें आणि म्हणून त्याला राग आला, असें म्हणावें, तर तसेंही दिसत नाहीं. कारण, त्या सातआठ वर्षांच्या वेडगळ पोराला राजकारणांतील ज्ञान येणार कोठून ? कारण, आम्ही जसे आज वीस वीस, पंचवीस पंचवीस वर्षें राजकारणामध्यें–एक पोट भरण्याचा उपाय म्हणून–मुरून गेलेले आहोत, तशी ध्रुवाची थोडीच गोष्ट आहे ! आम्ही म्हणजे आजकाल राजकारणांले अगदीं मुरब्बी आहोंत ! अगदीं मोरांबे आहोंत ! अगदी उकडांबे आहोत ! फार काय, या राजकारणाच्या कर्दमांतील आम्ही अतिशय उच्च दर्जाचे प्राणी आहोंत ! राजकारणांत आजकाल आमचा हात धरण्याला कोण समर्थ आहे ? आणि राजकारणांतील सर्व प्रकारचे ज्ञान आपल्यालाच तेवढें झालेलें आहे, असे दाखविण्याला जी साधनसंपत्ति लागत असते, ती तरी आमच्या सारखी त्या ध्रुवापाशीं होती कधीं कीं, ज्याच्या योगानें त्याला राजकारणांतील रोज रोज बदलावीं लागणारीं रहस्यें कळूं शकतील ? आणि असें असतांनाहीं हे जुने लोक खुशाल आपल्या धर्मग्रंथांतून असंभवनीय गोष्टी दडपून देतात, आणि अडाणी लोकांना सांगतात कीं, ध्रुवाला एक लाथ बसल्याबरोबर त्यानें आपल्याला अढळपद

प्राप्त करून घेण्याचा उद्योग सुरू केला ! आम्ही आज इतकीं वर्षें लाथा खात आहोंत, तरी आमच्या मनांत अजून एकदां सुद्धां तीव्र उद्वेग उत्पन्न होत नाहीं, हें प्रत्यक्ष ढळढळीत सत्य सर्व लोक आपल्या डोळ्यांनीं दररोज समक्ष पाहात असतां त्याच लोकांनीं त्या ध्रुवाच्या कल्पित कादंबरीवर विश्वास ठेवण्याला तयार व्हावें, हे मोठे आश्चर्य आहे ! फक्त एकाच लाथेमध्यें ताबडतोब स्वराज्य देण्याचा सद्गुण असतां, तर आम्ही इतक्या लाथा खाऊन देखील इतकीं वर्षे रखडत कां बसलों असतों ? या अनुपलब्धीच्या प्रमाणावरूनही ध्रुवाची गोष्ट निःसंशय खोटी असली पाहिजे ! ध्रुवाच्या फक्त एकट्या आईनेंच त्याला लाथ मारली होती-- आणि तीहि फिरून एकच ! पण आम्हाला तर आमचें मायबाप सरकार-- म्हणजे आमची आईही आणि बापही अशीं दोघेंही--आम्हांला फक्त एकच नव्हे, तर अनेक लाथांवर लाथा मारीत असतां आमच्यावर त्यांचा कांहीं एक परिणाम होत नाहीं ! यावरून लाथेमध्ये त्वेष उत्पन्न करण्याचा धर्म आहे, असे जे कोणी समजत असतील, त्यांची हा कार्यकारणभाव मानण्यामध्यें मोठी थोरली घोडचूक होत असली पाहिजे !

आतां कदाचित् याच्यावर कोणी अशी शंका काढील कीं, या राजकारणाच्या आणि स्वराज्य संपादनाच्या बाबतींत लाथा बसल्या असतां त्वेष कोणाला येतो ? तर ज्याच्या मनाला रात्रंदिवस स्वराज्याची खरी तळमळ लागलेली असेल, त्याच्याच मनाला त्वेष येतो तर मग आमच्या मनाला तशी तळमळ लागलेली नाहीं कीं काय ? आम्हाला तळमळ लागलेली आहे, म्हणून तर आम्ही ही सगळी खटपट करीत आहों आणि आमच्या मनांत स्वदेशभक्ति आहे, म्हणून तर आम्ही या सगळ्या लाथा खात आहोंत ! आमच्या इतकी सोशिक आणि सहनशील स्वदेशभक्ति दुसरीकडे सांपडणार आहे कोठें ! आमच्यामध्यें स्वदेशभक्ति आहे, म्हणून तर आम्ही केवळ स्वराज्यसंपादनासाठीं आजपर्यंत इतक्या अनेक लाथा खाल्या, तरी फिरून गुलामगिरीच्या नोकऱ्या पतकरण्याला आम्ही कंबर बांधीत आहों ! इतकें धैर्य आणि इतकी चिकाटी आहे कोठे दुसऱ्या कोणांमध्यें ? आणि स्वदेशभक्ति वांचून असल्या ह्या नोकरीच्या खस्ता खाण्याला आणि त्या नोकरींतील लाथा खाण्याला कोण तयार होणार आहे ? ध्रुवानें एकदां एक

लाथ खाल्ली, यांत काय मोठा पुरुषार्थ झाला! एकदां नव्हे, शंभरदां नव्हे, हजार वेळां कोणी लाथा मारल्या, तरी फिरून आम्ही तुमची नोकरी करितोंच!" असें म्हणण्यांत जें मनोधैर्य आहे, तें एका लाथेबरोबर आपल्या शत्रूपासून पळून जाण्यामध्ये केव्हां तरी आहे काय? या स्वराज्यसंपादनाच्या बाबतींत शत्रूला जेरीस आणणें हें तर आमचें ब्रीद आहे! रजपुताचा बच्चा आणि शिवाजीचा व संभाजीचा वंशज शत्रूला पाठ दाखवून समरांगणातून कधीही पलायन करणार नाही! तो शत्रूशीं सामना देण्यासाठीं एकदां उभा राहिला, म्हणजे माघार ही कशी ती त्याला ठाऊकच नाहीं! प्रतिपक्षी लाथा देऊं लागला. तर हा वीराचा बच्चा त्याला म्हणणार, 'काय लाथा देतोस? देच तर मग! आणि आतां आपण पाहूंच या की, तूं हटतोस की मी हटतों! तू जशा जशा लाथा देशील, तसा तसा मी जास्त वांकत गेलो, तर मग पुढें तू काय करणार!' अशी जेथें टिकाव धरून लढाई दिली पाहिजे, आणि कोणी एक लाथ मारली, तर "ही मी निर्भयपणानें तुझ्याकडे आपली पाठ केली आहे! दे तुला किती लाथा द्यावयाच्या असतील त्या!" असें जेथें न डगमगतां म्हटलें पाहिजे, आणि तू लाथा मारल्यास तर मी जास्तच मिधा होऊन तुझी नोकरी करीन असें म्हणून प्रतिपक्षाला जेथें चकविलें पाहिजे, तेथें एक लाथ लागली किंवा न लागली, तोंच एखाद्या पोरीप्रमाणें मुळूमुळू रडत आपल्या आईकडे पळून जाणारा जो ध्रुव, त्याचीं व्याख्याने रचून त्यांनीं आपलीं पुराणें विटाळलीं जावी, हा खरोखर आपल्या भारतवर्षाच्या —निदान आपल्या शूर महाराष्ट्राच्या—धैर्यावर मोठा काळिमा आहे!

अरे भेकड ध्रुवा! सुरुचीसारखी एक कोमल स्त्री ती काय! त्या बिचारीचे ते चरणपंकज किती तरी मृदुल असतील! त्या अत्यंत लुसलुशीत अशा एका पदपद्माचा तुला कोठें स्पर्श झाला न झाला, तों तू इतका गडबडून गेलास! अरे वेड्या, आम्हां या धैर्यसागराकडे बघ! अरे भित्र्या, आम्हां या धैर्याच्या केवळ मेरुपर्वताकडे पहा! आमच्या पाठी तूं पाहशील, तर तू आश्चर्यानें अगदी थक्कच होऊन जाशील! आज आमच्यामध्यें जे मोठमोठे शूर योद्धे म्हणून तुला दिसत आहेत, त्यांच्या पाठीवरील कपडे काढून आणि त्यांच्या पाठी उघड्या करून तूं जर पाहशील, तर त्या

सर्व पाठी अत्यंत सुंदर अशा अर्धवर्तुळाकृति पदलांच्छनांनी सुशोभित झालेल्या अशा तुला आढळून येतील ! हल्लीच्या सर्कसमधील एखाद्या रिंगमास्तरच्या छातीवर त्यानें मिळविलेल्या अनेक सुवर्णपदकांचे हार जसे लटकत असतात, त्याप्रमाणें आमच्या पाठी या लत्ताप्रहारांच्या अर्धवतुळाकृति लोहपदकांच्या हारांनी आणि माळांनीं अगदी गजबजून गेलेल्या आहेत ! तो बिचारा एखाद्या कूपमंडूकाप्रमाणें क्षीरसागरांत एकीकडे जाऊन आपल्या घमेंडींत निजणारा विष्णु ! त्याला बिचाऱ्याला भृगूकडून कोठें एक लाथ मिळाली, तर त्या एका लाथेचें वत्सलांच्छन बनवून घेऊन तो त्याबद्दल किती तरी फुशारक्या मारीत बसलेला आहे ! पण या एका पिसानें मोर होणाऱ्या थोतांडखोर लोकांनी खऱ्या गुणीजनांचें चीज नाहीसें करून टाकलें आहे ! पण त्या एक लाथ खाऊन फुशारकी मारणाऱ्या विष्णूला म्हणावें, तू त्या एका वत्सलांच्छनाचा कसला डौल मारतोस ! येथें आमच्या पाठीवर तुझ्यापेक्षां जास्त लालभडक रंगाची अशी हजारो लत्ताप्रहारांचीं लांच्छनें रुळत पडलेलीं आहेत ! हे ध्रुवा, हे विष्णो, ही लत्ताप्रहार सहन करण्याची अजब किमया तुमच्या त्या इतिहासपूर्वकालीन युगामध्ये कोणाला माहीतच नव्हती ! पण तें शास्त्र अलीकडच्या काळांत आणि विशेषत. ह्या १९२६ सालांत फारच प्रगतीला जाऊन पोहोचलेलें आहे. जो लाथा मारील, त्याच्यापासून पळून जावयाचें, ही जी पूर्वीची स्वराज्याच्या लढाईची चुकीची कल्पना होती, ती हल्ली आम्हीं पार बदलून टाकली आहे ! आणि कोणी जसजशा जास्त लाथा मारील, तसतशी त्याची जास्त नोकरी करून त्याला खूष करीत करीत जेरीस आणावयाचें, हें अमोघ शस्त्र आम्ही शोधून काढले आहे. ध्रुवा, तुझ्या सावत्र आईने तुला लाथ मारली, तेव्हां तिच्या पायांत बूट असतील, असें मानणें त्या वेळच्या अडाणी स्त्रियांच्या रीतीप्रमाणें शक्य दिसत नाहीं. पण हल्लीच्या आमच्या लाथा बघ. त्या नुसत्या पायांच्या लाथा नाहींत ! त्या बुटांच्या लाथा आहेत ! आणि तू बारकाईनें पाहिलेंस, तर त्या नालबंद बुटांच्या लाथा आहेत, हेंही तुझ्या दृष्टोत्पत्तीस येईल ! असे असूनही आणि अशा बुटांच्या असंख्य लाथा खाल्लेल्या असूनही जर आम्ही फिरून नोकऱ्या करण्याची पवित्र इच्छा धारण करितों, तर हे ध्रुवा, तुला एका लाथेनेंच इतकी

उपरति उत्पन्न झाली, हें थोतांड तूं कोठून काढलेंस ? आमच्या पाठी जरी आतापर्यंतच्या लत्ताप्रहारांनीं सोलून निघालेल्या आहेत, तरी रिस्पॉन्सिव्हिस्ट पक्षाचा कविकुलगुरु जो कालिदास, त्यानें "पादार्पणानुग्रहपूतपृष्ठं। अवेहि मां किंकरम्" या आपल्या सुंदर श्लोकामध्यें जें रिस्पॉन्सिव्ह को-ऑपरेशनचें सुंदर सूत्र ग्रथित केलें आहे, त्याप्रमाणें 'पादार्पणानुग्रहपूतपृष्ठ' असे शोभिवत 'किंकर' होण्याची अद्यापि आमची महत्त्वाकांक्षा वाढत असतांना आणि आमच्याप्रमाणें बाकीच्या लोकांच्याही पाठी 'पादार्पणानुग्रहपूत' व्हाव्या, अशी केवळ लोककल्याणासाठी आणि स्वराज्यप्राप्तीसाठी आम्हीं खटपट चालविली असतां, तू एका लाथेनें अढळपद मिळविलेस, अशासारख्या या कपोलकल्पित गोष्टी आमच्या वाटेमध्यें मोठें विघ्न उत्पन्न करतात, असें तुला वाटत नाहीं काय ? एका लाथेनेंच तुझ्या गोष्टीतल्याप्रमाणे स्वराज्याचें अढळपद प्राप्त होणे शक्य असतें, तर आम्ही आजपर्यंत इतक्या लाथा खाल्या आहेत कीं, प्रत्येक लाथेला एकेक स्वराज्य या हिशेबानें आम्हांला आतांपर्यंत किती तरी स्वराज्यें मिळावयाला पाहिजे होती ! पण तशी ती स्वराज्यप्राप्ति तर लांबच राहिली, पण आमच्यामध्यें उलट जो लाथा मारील, त्याची नोकरी करण्याचीच इच्छा दुणावत आहे. यावरून लाथा खाणें आणि गुलामगिरीची चटक लागणें त्यांच्यामध्येच कांहीं तरी कार्यकारणभावसंबंध असला पाहिजे, हे उघड होत आहे. तेव्हां अशी खरी वस्तुस्थिति असतांना ध्रुवाच्या आईनें त्याला एक लाथ मारल्याबरोबर त्याला त्वेष येऊन त्यानें अढळपद मिळवून घेतले, असली ही कोणी तरी इतिहासानभिज्ञ आणि तर्कशास्त्रानध्ययनीं अशा अडाणी मनुष्यानें निसर्गाच्या नियमाच्या विरुद्ध रचलेली ही ध्रुवाची गोष्ट निःसंदेहपणें अशक्य आणि अतएव असत्य असली पाहिजे !

याशिवाय आणखीही एका कारणासाठी ही ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे. कारण हें कीं, आकाशामध्यें सप्तऋषीच्यासारखे मोठमोठे ऋषि देखील दररोज एकसारखे फिरत असतांना आणि आपल्या जागा बदलीत असतांना त्यांच्या मध्यभागीं ध्रुवाचा तारा हा नेहमी स्थिर असतो, हा चमत्कार सगळ्यांना माहीत आहे. तेव्हां या सगळ्या ऋषींमध्ये हाच एकटा अढळ कसा, अशी कोणाला शंका येऊन त्याने या अढळपणाच्या

इमारतीकरितां तिच्याखालीं कृत्तिका, मृग वगैरे नक्षत्रांच्या गोष्टी-प्रमाणें या कल्पित गोष्टीचा पाया रचला असला पाहिजे; आणि ध्रुवाच्या आईनें त्याला लाथ मारल्यामुळें त्याला राग येऊन त्यानें हें अढळपद मिळवून घेतलें, अशी ही ह्या खोटया गोष्टीची पुस्ती कोणी तरी गांवढळ कारागिरानें या ध्रुवाच्या ताऱ्याच्या अढळपणाच्या पाठीमागें चिकटवून दिली असली पाहिजे. परंतु अढळपणा हा कांहीं सद्गुण नव्हे. आणि यदाकदाचित् तो सद्गुण असला तर तो कोणाचा सद्गुण आहे? तर Consistancy is the virtue of an ass, या एका इंग्रजी वेदवाक्या-मध्यें सांगितल्याप्रमाणें अढळपणा हा गाढवाचा सद्गुण आहे! तेव्हां त्याच्याकरितां हे इतकें ध्रुवाख्यान रचून त्या गाढवाच्या गुणाची एवढी प्रतिष्ठा गात बसणे हें अगदी अस्थानीं आहे. गाढवानें पाहिजे तर अढळ राहावे! पण त्याच्याशिवाय या जगांत दुसरें कोण अढळ आहे? ज्या पृथ्वीवर आपण राहतों, ती खुद्द पृथ्वीही दररोज किती तरी झपाट्यानें फिरत आणि बदलत आहे. वारा हा जर अढळ राहावयाचें मनांत आणील तर जगाचें कसें होईल? तेव्हां चंचलपणाचीच जगाला जास्त जरूरी आहे हे उघड आहे. नदीचा प्रवाह, वेश्येचें पातिव्रत्य, लबाड मनुष्याचा शब्द, हे सगळे चंचलच नाहींत काय? सारांश, चंचलपणामध्येच इतके फायदे असतांना असल्या ध्रुवासारख्या काल्पनिक गोष्टींनी अढळपणाचें स्तोम माजविणे हे केव्हांही श्रेयस्कर नाही. तेव्हां या अढळपणाच्या वेडगळ सद्गुणाच्या प्ररोचनासाठी म्हणूनच केवळ रचलेली ही ध्रुवाची गोष्ट ढळढळीत खोटी असली पाहिजे, हे उघड रीतीनें सिद्ध होतें. शिवाय ती गोष्ट रचण्यामध्ये ध्रुवाला एका लाथेने इतका राग आला, हे जें एक प्रमेय स्वहेतुसिद्धयर्थ अंगीकृत करण्यांत आलेलें आहे, तेंही अगदी असंभव-नीय असल्यामुळें ही ध्रुवाची गोष्ट येथून तेथून बनावट असली पाहिजे, हे सिद्ध होतें.

अशा प्रकारच्या विचारसरणीनें पूर्वी सांगितलेल्या पुराणवस्तु-संशोधकांच्या एका असोसिएशननें ध्रुवाच्या गोष्टीबद्दल आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यांतील फक्त कांहीं कांही मुख्य मुद्दे येथें नमूद करण्यांत आलेले आहेत.

# शाकुंतलाच्या पांचव्या अंकांतील एक श्लोक : : ८

स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु
संदृश्यते किमुत याः प्रतिबोधवत्यः ।
प्रागन्तरिक्षगमनात्स्वमपत्यजात-
मन्यैर्द्विजैः परभृताः खलु पोषयन्ति ।।

हा श्लोक कालिदासकृत शाकुंतल नाटकाच्या पांचव्या अंकामध्यें आलेला असून तो एक चांगल्यापैकी श्लोक आहे. व त्यामुळे तो संस्कृत वाचकांच्या परिचयाचा आणि प्रेमाचा विषय होऊन बसलेला असणें यांत कांहीं आश्चर्य नाही. पांचव्या अंकांत गर्भवती शकुंतला दुष्यंत राजाकडे आली असतां दुर्वासाच्या शापामुळें त्याची पूर्वस्मृति नष्ट झाल्याकारणानें तो शकुंतलेचा स्वीकार करूं शकत नाहीं. तेव्हां शकुंतला राजाला अंगठीची खूण दाखविण्याला प्रवृत्त होते; पण ती अंगठी आधीच शचीतीर्थात पडून हरवलेली असल्यामुळे ती आपल्या बोटांत नाही, असें आयत्या वेळी शकुंतलेला आढळून येते.

तेव्हां निरुपाय होऊन शकुंतला आपल्या दीर्घापांग नांवाच्या हरिण बालकाची गोष्ट राजाला आठवणीसाठीं सांगते. त्यावर बायका असल्या बनावट गोष्टी बनवून सांगण्यांत कुशल असतात, असे राजानें विधान केलें असतां गौतमी त्याचा निषेध करते. तेव्हां स्त्रियांच्या पटुत्वाबद्दल तिची खात्री करून देण्याकरितां राजानें हा श्लोक म्हटलेला आहे.

या श्लोकाचा अर्थ सरळ आहे. तो संस्कृत जाणणारांना सांगितला पाहिजे, असें नाही. पण या श्लोकासंबंधानें कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, या श्लोकापासून आपणा सामान्य लोकांना जो अर्थबोध होतो, तेवढाच अर्थबोध शकुंतलेला झाला, असें नाही. तर मग शकुंतलेला या श्लोकापासून

कोणता जास्त अर्थाचा बोध झाला ? या प्रश्नावर ते असें उत्तर देतात की, आपली आई मेनका ही देवांची वारांगना (परभृता) असून तिला स्वर्गलोकी जावयाचें (अंतरिक्षगमन करावयाचें) असल्यामुळें तिनें आपल्या मुलीचें (शकुंतलेचें) कण्वऋषि (द्विज,) यांजकडून पोषण करवून घेतलें, अशा अर्थाच्या अभिप्रायानें राजानें आपल्या आईचा आणि आपला स्वतःचा उपलंभ केला आहे. असा या श्लोकाच्या तिसऱ्या व चौथ्या चरणांतील कांहीं उपरिनिर्दिष्ट शब्दांवरून तिला अर्थबोध झाला असला पाहिजे. पण या श्लोकापासून असा अर्थ निघणें शक्य आहे किंवा नाही, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. म्हणून आपण त्याबद्दल प्रस्तुत स्थळी विवेचन करूं.

शकुंतलेच्या जन्माची कथा पहिल्या अंकामध्यें अनसूया आणि प्रियंवदा यांच्या तोंडून राजानें जशी ऐकलेली होती, तसाच उल्लेख या श्लोकामध्यें करण्यांत आलेला आहे. तेव्हां तो पहिल्या अंकांतील प्रसंग जर राजाला आठवत आहे, तर त्यानतर आपल्याशीं झालेला विवाहही राजाला अर्थातच आठवत असला पाहिजे; पण असें 'असूनही राजा जेव्हां सर्वच गोष्टी नाकबूल करीत आहे, तेव्हां तो उघड उघड खोटें बोलत असला पाहिजे, असा शकुतलेचा ग्रह या श्लोकावरून झाला, असें पूर्वपक्षाचें म्हणणें आहे. पण हे बरोबर नाही.

असा ग्रह होण्याला वरच्या श्लोकांतील कोणते शब्द कारणीभूत झाले आहेत ? तर ' प्रागन्तरिक्षगमनात् ', 'द्विजैः' आणि 'परभृता', हे ते शब्द होत, असें कदाचित् कोणी म्हणेल. म्हणून त्यांच्याबद्दल आपण आधीं विचार करूं. ही पदें जशीं वरील श्लोकांत आलीं आहेत, त्याच क्रमानें ती येथें दिलीं आहेत. पण त्यांच्याबद्दल विचार करतांना सोईसाठीं त्यांच्यापैकीं 'द्विजैः' हे पद आपण आधीं घेऊं.

'द्विज' हा शब्द श्लिष्ट असून 'पक्षी' आणि ब्राह्मण, असे त्याचे दोन अर्थ, कोणत्या ना कोणत्या रीतीनें दोनदां जन्माला आल्याच्या कल्पनेमुळें उपयोगांत आलेले आहेत. तेव्हां 'द्विज' या शब्दावरील श्लेषामुळें कण्वाचा बोध येथें होतो, असें कोणी मानतात. पण येथें असें मानणें बरोबर होणार नाहीं. कारण, या श्लोकांतील विशिष्ट परिस्थितीमुळें 'द्विज' या शब्दांतील श्लिष्टार्थसूचकत्वाचें

सामर्थ्य नष्ट झालेलें आहे. तें कशामुळें ? तर 'अन्यैर्द्विजैः' असा येथें प्रयोग असल्यामुळें. तें कां ? तर याचें कारण असें आहे कीं, 'द्विज' या शब्दाचे अनेक अर्थ असले, तरी 'परभृताः स्वमपत्यजातमन्यैर्द्विजैः पोषयन्ति' या वाक्यामध्ये 'परभृताः' म्हणजे कोकिळा या स्वतः पक्षिजातीच्या कोटीतील असल्या कारणाने यांच्याशिवाय 'अन्यद्विज' असे जेव्हां म्हणण्यांत येतें, तेव्हां कोकिळा या पक्ष्याशिवाय अन्य पक्षी असाच अर्थ वक्त्याला अभिप्रेत असला पाहिजे, हें उघड आहे. कारण, विभाग हे स्वाभाविकपणेंच बहुधा स्वजातिसव्यपेक्ष असतात. कोकिळेशिवाय 'अन्य द्विज' म्हणजे कोकिळेशिवाय अन्य 'पक्षी आणि ब्राह्मण' असा या शब्दांचा अर्थ प्रचलित प्रकरणाच्या अनुरोधानें पाहतां केव्हांही होणें शक्य नाहीं. म्हणून 'द्विज' या शब्दाची जरी अनेक अर्थावर मूळची शक्ति असली, तरी ती प्रस्तुतच्या प्रकरणानें फक्त 'द्विज' शब्दाच्या 'पक्षी' या अर्थावरच नियंत्रित झालेली आहे. त्याच्यापलीकडे 'ब्राह्मण' या अर्थावर ती जाऊंच शकत नाहीं. आणि असें जर आहे, तर मग कण्वऋषींकडून शकुंतलेचें पालनपोषण करवून घेण्यांत आलें होते, हा अर्थ निष्पन्न होणार कोठून ? बरें, तो अर्थ निष्पन्न होतो असें मानलें, तरी तो अर्थ बोलून दाखविण्याला 'परभृताः स्वमपत्यजातमन्यैर्द्विजैः पालयन्ति' येवढेंच पुरेसें असल्यामुळे 'अन्यैः' या पदाची त्या अर्थाला आवश्यकताच नाहीं. पण 'अन्यैः' हें पद तर घातलेलें आहे. तेव्हां त्यावरूनही हा अर्थ विवक्षित नाही, हें सिद्ध होतें.

आतां 'प्रागन्तरिक्षगमनात्' हे पद आपण घेऊं. मेनकेला स्वर्गांत जावयाचें होतें हें खरें; पण म्हणून 'प्रागन्तरिक्षगमनात्' या शब्दांमधून शकुंतलेला आपल्या आईच्या स्वर्गगमनाची कल्पना काय म्हणून यावी? प्रस्तुत श्लोकामध्यें 'प्रागन्तरिक्षगमनात्' याचा अर्थ काय आहे ? पण याचा विचार करण्याच्या आधी महत्त्वाचा विचार असा की, प्रकृतस्थळीं कोणाच्या अंतरिक्षगमनाचा प्रश्न प्रस्तुत आहे ? आईच्या गमनाचा, कीं अपत्यांच्या गमनांचा ? अर्थात् अपत्यांच्या गमनांचा ! कारण स्वतःचा भक्ष्य मिळविण्याकरितां कोकिळांच्या पिलांना जोंपर्यंत आकाशांत उडतां येत नाहीं, तोंपर्यंतच त्यांना दुसऱ्या कोणाची तरी मदत पाहिजे असते. आणि म्हणूनच तोंपर्यंत कोकिळा आपल्या अपत्यांचें दुसऱ्या पक्ष्यांकडून (कावळ्यां-

कडून) पालनपोषण करवून घेत असतात. अशी वस्तुस्थिति आहे. कोकिळा आकाशांत उडून जाण्यापूर्वी आपल्या पिलांचें संगोपन त्या दुसऱ्या पक्ष्यांकडून करवून घेतात, असा याचा अर्थ कोणी करीत नाहींत, किंवा वस्तुस्थितीला धरून याचा असा अर्थ करणें केव्हां शक्यहि नाहीं. ही उपमानवाक्यांतील स्थिति झाली. आतां उपमेयवाक्यांतील स्थिति कशी आहे, तें आपण पाहूं. उपमेयाच्या प्रकरणांत कोकिळेच्या अपत्यांच्या जागी येणारी जी शकुंतला, तिला त्या कोकिळेच्या पिलांप्रमाणें अंतरिक्षगमन करावयाचें नसून तिच्या आईला, म्हणजे मेनकेला, अंतरिक्षगमन करावयाचें होतें. तिकडे अंतरिक्ष-गमन अपत्यांच्यासंबंधीचें होतें; आणि इकडे आईच्यासंबंधीचें अपेक्षित आहे. शिवाय अपत्यांना अंतरिक्षगमनाचें सामर्थ्य प्राप्त होण्याच्यापूर्वी त्यांना दुसऱ्याच्या पोषणाची अपेक्षा असते; आणि इकडे मेनकेनें अंतरि-क्षांत गमन केल्यानंतर तिच्या अपत्याला दुसऱ्याकडून मिळणाऱ्या पालन-पोषणाची अपेक्षा होती. कारण, मेनका जोंपर्यंत पृथ्वीतलावर होती, तोंपर्यंत आपल्या मुलीचे संगोपन करावयाचें सामर्थ्य तिच्यामध्यें होतेंच. तेव्हां या दोन्हीही कारणांसाठी 'प्रागन्तरिक्षगमनात्' या पदापासून मेनकेचा आणि तिच्या स्वर्गगमनानंतरचा कोणताही संदर्भ प्रदर्शित केला जाणें शक्य नाही. म्हणून 'कोकिळाची अपत्यें आकाशांत उडू लागण्याच्या-पूर्वी' हा एकच अर्थ या पदापासून या ठिकाणीं सभवतो, हें उघड आहे.

याप्रमाणें 'अन्यैः' आणि 'प्रागन्तरिक्षगमनात्' ही पदे फक्त कोकिळांच्याविषयींच्याच एका अर्थाला अनुकूल असल्यामुळे 'परभृताः' या एकट्या शब्दांतील श्लेषावर फारसा भार ठेवण्यांत काहीं अर्थ नाही. शिवाय, 'अपत्यजातम्' यामध्ये अनेक अपत्यांचा जो सामान्य उल्लेख आहे, तोही एका शकुंतलेच्या विशेष संदर्भाशी फारसा सुसंगत होत नाहीं. हेंहि रसिक वाचकांच्या मनाला पटल्यावांचून राहणार नाहीं.

याशिवाय आणखीही एका कारणासाठी वरील अर्थ बरोबर मानतां येणें शक्य नाहीं. तें कारण असें :—प्रस्तुत श्लोकांतील 'स्त्रीणामशिक्षित-पटुत्वममानुषीषु' या पहिल्या चरणांतील वाक्यामध्यें एक सामान्य विधान केलेले असून 'प्रागन्तरिक्षगमनात्' इत्यादि तिसऱ्या व चौथ्या चरणां-मध्यें पहिल्याच चरणांतील सामान्य विधानाच्या समर्थनार्थ एक विशेष

उदाहरण दिलेलें आहे. आणि त्या योगानें येथें कवीनें अर्थांतरन्यास नामक अलंकार उत्पन्न केला आहे.

तो अर्थांतरन्यास अलंकार आणि त्याच्या पुढील कैमुतिकन्यायात्मक विधान या ठिकाणीं यथास्थित रीतीनें उपपन्न होण्यासाठी त्याला काय अपेक्षा आहे? तर अमानुषी, म्हणजे पशुपक्ष्यादिकांच्यासारख्या अप्रबुद्ध, स्त्रियांच्या ठिकाणीही अशिक्षितपटुत्व असतें, हें त्याला आधीं सिद्ध करावयाचें आहे. व हें सिद्ध करण्यासाठी त्यानें अमानुषी (अप्रबुद्ध) स्त्रियांच्या सामान्यवर्गापैकी 'परभृता' म्हणजे कोकिळा ह्या एका विशिष्ट अमानुष स्त्रियांचें उदाहरण पुढच्या दोन चरणामध्यें दिलें आहे. आतां ह्या शेवटच्या दोन चरणातून 'मेनकेने कण्वाकडून आपल्या मुलीचें पोषण करविलें', असा अर्थ निष्पन्न होतो, असें जर कोणी म्हणूं लागेल, तर कालिदासाला करावयाचे होतें एक आणि त्याने केलें भलतेंच, अशा कालिदासावर अप्रयोजकपणाचा आरोप करण्यासारखे होईल. कालिदासाला सिद्ध करावयाचा होता अमानुषी स्त्रियांच्या अशिक्षितपटुत्वाचा सिद्धान्त आणि त्यासाठी त्याने उदाहरण घेतले मेनका नांवाच्या एका अमानुषी भिन्न सज्ञान स्त्रीचें! इतका कालिदास विद्वान् होता! आणि अर्थांतरन्यासांतील रहस्याचें त्याला इतके अगाध ज्ञान होते! असले आरोप कालिदासावर करण्याचा प्रसंग वरील भलत्याच अर्थानें प्राप्त होईल. म्हणून या अनिष्टापत्तीसाठी वरील अर्थ घेणें योग्य नाहीं. शिवाय, अर्थांतरन्यासासाठीं कोकिळेच्या एका उदाहरणानें पहिल्या चरणांतील सामान्यसिद्धांताचें समर्थन करण्याचे कार्य पुरें होऊन शेवटच्या दोन चरणांची शक्ति उपक्षीण होऊन गेल्यानंतर पुढें जास्त आकांक्षाच शिल्लक राहिलेली नसल्याकारणाने मेनकेचें दुसरें उदाहरण आकांक्षारहित अनावश्यक होईल, हाही दोष अपरिहार्य आहे.

शिवाय आपण असेंही पाहिले पाहिजे कीं, या ठिकाणी मेनकेविषयींचा असला हा भलताच अप्रासंगिक संदर्भ संसूचित करणें हें कालिदासाला ईष्ट होतें की अनिष्ट होते? आणि ही सूचना या ठिकाणीं जर अनिष्ट असेल, तर कालिदास हा कांही वेडा कवि नव्हता, की, जो आपल्या पूर्वीच्या रचनेला विघातक अशा भलत्याच सूचना भलत्याच

ठिकाणीं करील ! 'मानुषीषु वा स्यादस्यरूपस्यसंभवः' इत्यादि पहिल्या अंकांतीऽ तेविसाव्या श्लोकांतील 'मानुषीषु' या शब्दाला विरोधी असा 'अमानुषीषु' हा शब्द प्रस्तुत श्लोकांत जरी पडला असला, तरी तो शब्द सहजगत्याच पडला असला पाहिजे, असेच मानणें जरूर आहे. आणि तेवढ्या शब्दावरून मेनकेचा संदर्भ येथें सूचित केलेला आहे, असें मानणें चुकीचें होईल कारण कालिदास अशी भलतीच सूचना भलत्याच ठिकाणीं करील कशी ? ही सूचना करण्यांत आली तर तिचें पर्यवसान असें होईल कीं, दुष्यंताला जर पहिल्या अंकांतील शकुंतलेच्या जन्माची गोष्ट आठवत आहे, तर त्यावरून त्याला शकुंतलेशी लग्न केल्याची गोष्टही खात्रीने आठवत असली पाहिजे ! पण हें स्मरण जर कालिदासाला अशा रीतीनें सूचित करावयाचें असतें, तर मग त्यानें चौथ्या अंकाच्या आरंभीचा दुर्वासाच्या शापाचा एवढा मोठा नसता खटाटोप केला तरी असता कशाला ? आपण एवढ्या प्रयासानें दुर्वासाच्या शापाची रचना जुळवून आणावयाची, आणि ती आपणच फुकट दवडण्याचा घाट घालावयाचा, असलें आत्मघातकीपणाचें आणि अरसिकपणाचें कृत्य कालिदासाच्या हातून होणें केव्हांही शक्य नाहीं. आणि म्हणून जो अर्थ गैरसोईचा असल्यामुळें खुद्द कालिदासाच्या मनामध्येंही कधीं असण्याचा संभव नाहीं, आणि जो अर्थ धर्मभीरु अशा दुष्यंताच्याही मनामध्यें वास्तविक रीतीनें नव्हता, तो अर्थ, या श्लोकामधून काढणें हें शब्दांचे अर्थ, प्रकरणाची सुसंगतता आणि वक्त्यांचे अभिप्राय, यांपैकीं कोणत्याही दृष्टीनें सयुक्तिक होणार नाहीं, हें उघड आहे.

आतां 'गतोऽस्तमर्क' या वाक्यावरून 'सायंसंध्येची वेळ आली आहे' असा देखील जर ध्वन्यर्थ निघूं शकतो, तर 'वक्तृबोद्धव्यकाकूनाम' इत्यादि कारिकेमध्यें मम्मटानें सांगितल्याप्रमाणें येथील बोद्धव्य अशी जी शकुंतला तिला दुर्वासाच्या शापाची माहिती नसल्यामुळें तिच्या मनामध्यें जर मेनकेच्या गोष्टी-विषयींचा ध्वनि उत्पन्न झाला तर, त्याला काय प्रत्यवाय असावा ? असा प्रश्न कोणी विचारला तर त्या प्रश्नाला उत्तर एवढेंच कीं, ध्वन्यर्थ देखील जो स्वीकारावयाचा तो प्रकरणाला अनुकूल असाच असला पाहिजे. नाहीं तर भलत्याच शब्दापासून भलताच अर्थ समजून त्याचा काय उपयोग ? शिवाय ह्या श्लोकावरून आपल्या जन्माची पहिल्या अंकांतील आणि त्यावरून

आपल्या गांधर्व विवाहाची तिसऱ्या अंकांतील गोष्ट दुष्यंताला स्मरत आहे असा शकुंतलेला हा प्रत्यक्ष पुरावा सांपडला असें जर आपण मानलें तर मग पुढें दुसरें कांहीं एक न बोलतां या पुराव्यावरून दुष्यंताकडून तिनें आपल्या लग्नाची गोष्ट सिद्ध करून घेतली असती. कारण पर्यायानें आरोपीचा हा कबुलीजबाबच होता. दुष्यंत खोटें बोलण्यांत इतक्या अचानक रीतीनें सांपडला असतां, त्याचा फायदा घेण्याचें टाकून शकुंतला उगीच मारीच ऋषीच्या आश्रमामध्यें जाऊन तपश्चर्या करीत कां बसली? सारांश, या प्रकरणावरून शकुंतलेला व्यंग्यार्थानें मेनकेच्या गोष्टीबद्दलचा अर्थ अभिव्यंजित झालेला होता असेंही मानतां येणें शक्य नाहीं. म्हणून परभृता आपल्या अपत्यांचें तीं आकाशांत उडण्याला समर्थ होईपर्यंत दुसऱ्या पक्ष्यांकडून पालनपोषण करवून घेतात हाच एक अर्थ वरील श्लोकाच्या शेवटच्या दोन चरणांपासून निष्पन्न होतो असें मानणें हेंच योग्य होणार आहे.

—चित्रमयजगत्, ऑगस्ट १९२९

---

# कालिदासानें न लिहिलेलें नाटक : : ९

कालिदास हा आपल्या नुसत्या संस्कृत कवींमध्येंच श्रेष्ठ कवि आहे असें नसून हल्लीच्या सुधारणेच्या काळांत सुधारलेल्या लोकांना ज्या भाषांचें ज्ञान अवगत झालेलें आहे आणि ज्या भाषांतील वाङमयाची संस्कृत वाङमयाशीं तुलना करावयाची साधने उपलब्ध झाली आहेत, त्या सर्व भाषांतील वाङमयाच्या दृष्टीने पाहतांही कालिदासाचें कविकुलगुरुत्व सर्वांकडून निर्विवादपणे मान्य करण्यांत आलेलें आहे. त्या कालिदासाचीं रघुवंशादिक काव्यें व विक्रमोर्वशीय, मालविकाग्निमित्र वगैरे नाटकें जरी चांगलीं आहेत, तरी कालिदासाचें काव्यकौशल्य आज जे सर्वाधिक्यानें प्रस्थापित झालेले आहे, तें या वर दिलेल्या काव्यांच्या किंवा नाटकांच्या योगानें नसून, त्याला कालिदासाचें शाकुंतल हेंच मुख्यत्वेंकरून कारणीभूत झालेलें आहे. या नाटकांत शृंगार आणि करुण हे दोन मुख्य रस आहेत. व या दोन रसांचा फार चांगल्या रीतीनें परिपोष केला गेल्यामुळें या नाटकाला रमणीयत्व आलेलें आहे हे खरें. पण कण्व ऋषीच्या आश्रमामध्यें जे प्रवेश ठेवण्यांत आलेले आहेत, त्या प्रवेशांतील साधेपणा आणि अकृत्रिमपणा यांच्या योगाने या दोन्ही रसांना विशेषच उद्दीपन मिळालेलें आहे, या नाटकाला आधारभूत असलेलें कथानक कालिदासानें महाभारतांतून घेतलेलें आहे हे सर्वांना माहीतच आहे. परतु आपल्या नाटकांतील रसांच्या परिपोषणासाठीं कालिदासानें मूळच्या गोष्टीमध्यें जरूर त्या ठिकाणीं कित्येक फेरफार केलेले आहेत. कण्वाच्या आश्रमांत दुष्यंत आणि शकुंतला यांचें प्रेम जुळून उभयतांचा गांधर्वविवाह झाला, येथपर्यंतची गोष्ट महाभारताच्या आख्यानांत आणि कालिदासाच्या नाटकांत बहुतेक जवळ जवळ एकच आहे, असें

म्हटलें तरी चालेल. परंतु कालिदासानें जो विशेष फरक केला आहे, तो मुख्यत्वेंकरून याच्या पुढील गोष्टीतच होय; व कालिदासानें असें करण्याचें कारणही उघडच आहे. महाभारत हा एक मोठा थोरला इतिहास आहे, आणि शाकुंतल हे एक लहानसे नाटक आहे, हा फरक येथे लक्षांत ठेवणे जरूर आहे. पूर्वीच्या अनेक राजांच्या वंशावळीच्या हकीकती सांगतांना दुष्यंत राजाच्या पोटीं भरत हा एक पुत्र होऊन तो पुढें सम्राट् झाला व त्याचा वंश पुढे चालू झाला, हीच मुख्य गोष्ट महाभारतांतील इतिहास-काराला सांगावयाची होती; आणि म्हणून शकुंतला आपला पुत्र भरत याला घेऊन दुष्यंताच्या दरबारांत आली आणि तेथें आकाशवाणीच्या द्वारानें सर्व लोकांची खात्री झाल्यानंतर राजानें शकुंतलेचा आणि भरताचा स्वीकार केला, एवढा ठोकळ कथाभाग सांगितल्यानें सदर इतिहासकाराचा कार्यभाग समाप्तीला गेला; व तो इतिहासकार पुढें दुसऱ्या राजांच्या गोष्टी सांगण्याच्या वाटेला लागला. शकुंतलेच्या विरहामुळें दुष्यंताला किती दुःख झालें आणि भरतासारख्या पुत्राच्या प्राप्तीमुळें त्याला किती आनंद झाला, याची वर्णने करींत बसणें हा त्या इतिहासकाराचा विषयही नव्हता व तसे करणें त्याला शक्यही नव्हतें. कारण, जेथें शेंकडों राजांच्या वंशावळी सांगण्याचा उद्दिष्ट हेतु त्यानें आपल्यापुढें ठेविलेला होता, तेथे प्रत्येक राजाचे शोक आणि आनंद यांची वर्णने तो कोठवर करीत बसला असता ? परतु कालिदासाचें ध्येय याच्यापेक्षां अगदीं भिन्न होतें. कालिदासाला इतिहास लिहावयाचा नसून एक सुदर नाटक लिहावयाचें होतें. एखाद्या सोन्याच्या खाणीतून पुष्कळ सोने बाहेर काढणें निराळे, आणि त्या सोन्यांतील थोडेसेच सोनें घेऊन त्याच्या बनविलेल्या अंगठीवर नकशीचे काम करणें निराळे. एखाद्या विस्तीर्ण बागेमध्यें लतापुष्पादिकांनी सुशोभित अशी हजारों फुल-झाडें लावून देणें हे काम निराळें, आणि त्या बागेंतील कांही पुष्पें घेऊन त्यांच्यापासून एखाद्या नयनमनोहर अशा गुच्छाची रचना करणे हे काम निराळें. ह्यापैकीं कालिदासाचें अर्थातच दुसऱ्या प्रकारचें कार्य होतें. आणि त्या कार्याला अनुकूल अशी फिरवाफिरव त्याने करून घेणें हे जरूरच होतें. ही फिरवाफिरव करण्याला कालिदासानें आपल्या शाकुंतल नाटकाच्या चौथ्या अंकापासून सुर-वात केली आहे. त्या अंकाच्या प्रारंभीच्याच एका प्रवेशामध्यें एकटीच शकुतला

चिंताक्रांत बसली असतांना तिला शाप देण्याकरितां कालिदासानें दुर्वासाला कण्वाच्या आश्रमामध्यें मुद्दाम आणिले आहे व येथून एका रस्त्यांतून जसे दोन रस्ते फुटतात, किंवा एका बुधांतून जशा दोन खांद्या निरनिराळ्या होतात, त्याप्रमाणे महाभारताची गोष्ट आणि शाकुंतल नाटकाची गोष्ट यांच्यामध्यें फरक पडू लागला आहे. दुर्वास ऋषि हा एक मोठा रागीट ऋषि आहे, अशी त्याची पुराणांतरी प्रख्याति असल्याचें सगळ्यांना माहीत आहे तरी पण तो रागीट स्वभावाचा असला तरी, मागच्या पुढच्या कांहीं संदर्भाशिवाय किंवा कांहीं सयुक्तिक कारणांवांचून एकाएकीं कण्वाच्या आश्रमामध्यें तो अतिथि म्हणून यावा आणि एखाद्या नवमल्लिकेवर कढत प्राणी ओतल्याप्रमाणे त्यानें शकुंतलेला उगीचच्या उगीच किंवा अगदी एखाद्या क्षुल्लक कारणासाठी एक शाप देऊन जावें, हे मोठें चमत्कारिक आहे. पण याच्याहिपेक्षां जास्त चमत्कारिकपणा त्याच्या त्या

> विचिन्तयन्ती यमनन्यमानसा
> तपोधनं वेत्सि न मामुपस्थितम् ।
> स्मरिष्यति त्वां न स बोधितोऽपि सन्
> कथां प्रमत्तः प्रथमं कृतामिव ।।

या श्लोकांतील शापाक्षरांमध्यें भरलेला आहे. अनन्यभावानें ज्याचें चिंतन करण्यामध्ये गंतल्यामुळें तू या तपोधनाकडे लक्ष देत नाहीस, तो तुलाही असाच विसरून जाईल. असा या शापवचनांतील तात्पर्यार्थ आहे. पण दुर्वासाला हें कळले कसें ? या श्लोकाच्या पूर्वी कालिदासाने शकुंतलेच्या संबंधानें प्रियंवदेच्या तोंडी जें वर्णन घातलेलें आहे, तें फक्त एवढेंच आहे कीं, शकुंतला जरी आश्रमामध्ये असली, तरी तिचें मन कांही ठिकाणावर नाहीं ( हृदयेनासनिहिता ) ! तेव्हां हृदयानें असनिहित असण्याची जी अवस्था तेवढ्यावरून ही शकुंतला आपल्या कोणा तरी प्रियकराचेंच चिंतन करीत बसलेली असली पाहिजे, हें दुर्वासाला कसें समजलें ? हृदयानें असंनिहित होणें, हा परिणाम प्रेम किंवा विरह यांच्याशिवाय दुसऱ्याही अनेक कारणांनीं उत्पन्न होणें अशक्य नाहीं. मग ही आपल्या प्रियकराच्या चिंतेमुळेंच अतिथिपरिभव करण्याला प्रयुक्त झाली आहे, हे दुर्वासाने कशावरून ताडलें ? ' वामहस्तोपहितवदनालिखितेव प्रियसखी भर्तृगतया चिन्तयात्मानमपि नैषा

विभावयति ' असें शकुंतलेच्या वर्णनाचें आणखी एक वाक्य वरील श्लोकाच्या नंतर कवीनें प्रियवंदेच्या तोंडीं घातलेलें आहे, व शकुंतलेची त्या वेळची चिंता ही भर्तृगत चिंता होती, असें सांगितलें आहे. पण ही तिची चिंता भर्तृगत आहे, हें प्रियवंदेला जरी माहीत असलें तरी दुर्वासाला ही भर्तृगतच चिंता आहे असें अनुमान करण्याला काय चिन्ह होतें ? . असें विशेष कांहीं चिन्ह नसतांना दुर्वासानें एखादें विशेष अनुमान काढून त्याच्यावर आपल्या शापाची रचना करावी, हें असयुक्तिक आणि असंगत दिसतें दुर्वासाला अन्तर्ज्ञानानें ही गोष्ट कळली, असें म्हणूनही चालावयाचें नाहीं. चांगले कवि अन्तर्ज्ञादिक अद्भुत आणि अमानुष साधनांवर अवलंबून राहून मानवी प्राण्यांच्याकरिता लिहावयाच्या नाटकांतील प्रसंगांची योजना सहसा करीत नसतात. कारण, अद्भुत साधनेच जर उपयोगामध्यें आणावयाची असलीं, तर मग त्या साधनांनी वाटेल तें करतां येईल. पण त्यामध्यें खरें चमत्कारजनकत्व नाहीं. Divine Machinery सहसा उपयोगामध्यें आणूं नये, असा पाश्चात्य साहित्यशास्त्रामध्येंही एक नियम आहे. बुद्धिबळाचा खेळ कोणी खेळावयाचें ठरविल्यास तो खेळ खेळण्याचे जे सामान्य नियम ठरलेले असतील,त्या नियमांनीच तो खेळ खेळला जाणें हे इष्ट आहे. हत्ती, घोडे, उंट, हीं मोहरीं ज्या नियमांनीं चालावयाचीं, त्याच नियमांनी ती चाललीं पाहिजेत. नाहीं तर आपल्याला प्यादी करावयाची आहे, म्हणून वाटेल तेथील प्यादें उचलून जेथें प्यादी व्हावयाची आहे तेथें शह देण्याकरितां तें उचलून आणून ठेविलें, तर तसल्या बुद्धिबळाच्या खेळांत बुद्धीचे बळ तें काय राहिलें ? आणि एखादें जुळत नसलेलें कथानक जुळविण्याकरितां दैवी शक्तीचा उपयोग करणें म्हणजे कोठलें तरी प्यादें उचलून प्यादीच्या ठिकाणी आणून ठेवण्याइतकेच अप्रशस्तपणाचें आहे. म्हणून असल्या दैवी सामर्थ्याचा कोणीही चांगले ग्रंथकार महत्त्वाच्या ठिकाणी सहसा उपयोग करीत नाहींत. शाकुंतलाच्या पुढच्या अंकांतून मेनका, सानुमती, मातलि, इत्यादि पात्रें आकाशांतून संचार वगैरे करीत असलेली जरी दाखविलेली असली, तरी तो दैवी सामर्थ्याचा दुरुपयोग नव्हे. अप्सरा वगैरेनीं आकाशात संचार करून आपले व्यवहार करणें हा त्यांचा स्वभावच आहे. शकुंतलेचा दुष्यंताशीं गांधर्वविवाह झाला आहे, व

ती आपन्नसत्त्व आहे, ही गोष्ट छंदोमयी वाणीनें कण्वाला कळली, किंवा शकुंतलेकरितां कण्वाच्या आश्रमांतील लतांनीं आणि वृक्षांनीं वस्त्रें आणि आभरणें समर्पण केलीं, हे देखील जरी दैवी सामर्थ्याचेच प्रकार असले, तरी ते गौण आणि अन्यथासिद्ध होण्यासारखे असल्यामुळें उपेक्षणीय आहेत. ते दुर्वासाच्या शापासारखे महत्त्वाचे नाहीत. ते उपयोगांत आणले असते किंवा नसते, तरी त्यांच्यावांचून नाटकांतील कथानकाची उत्क्रांति अडून राहिली असती असें नाहीं. पण दुर्वासाच्या शापाची गोष्ट मात्र तशी नाहीं. त्या शापावर पुढील सगळें नाटक अवलंबून आहे. तो शाप नसता तर शाकुंतल नाटकाचे पांच, सहा, सात, हे अंकच उत्पन्न झाले नसते व शाकुंतल नाटकाची पांचव्या अंकांतच परिसमाप्ति होऊन महाभारतांतील व्यासाची गोष्ट आणि शाकुंतलमधील कालिदासाची गोष्ट या दोन्ही गोष्टी जवळ जवळ एकसारख्याच झाल्या असत्या. या कारणांसाठीं या नाटकाच्या कथानकामध्यें दुर्वासाच्या शापाला फार महत्त्व आहे. त्याच्यावर पुढलें सगळें नाटक अवलबून आहे. आणि म्हणून हा शापाचा प्रसंग जास्त निर्दोष असता, तर जास्त चांगलें झालें असतें. कालिदासानें हा शापाचा प्रसंग चौथ्या अंकांत घालून आपल्या पांचव्या अंकाची तरतूद करून घेतली. व "अभिज्ञानाभरणदर्शनेन शापो निवर्तिष्यते" म्हणजे, खुणेची अंगठी दृष्टीस पडल्याने शापाची निवृत्ति होईल, असें सांगून त्यानें पुढील दोन अंकांचीही तरतूद करून घेतली आहे. पण आधी पहिला शापच जर उत्पन्न होत नाही आणि सयुक्तिक ठरत नाही, तर त्या शापाच्या निवर्तनाची गोष्ट बोलण्यांत काय स्वारस्य आहे? वंध्येच्या मुलाला डोक्याला घालण्याकरितां पागोटें बांधून ठेवण्यासारखेंच हें नव्हे काय? पण हा एक दोष स्वीकारला, म्हणजे पुढें मात्र सर्वत्र निर्दोषता आणि अत्यंत रमणीयता यांचीं उपवनें जिकडे तिकडे पसरलेलीं आहेत, आणि त्या उपवनांतील आमोदाचा आस्वाद घेतांना या दोषाकडे कोणाचें लक्षही जात नाहीं. उलट ज्या दोषानें पुढें इतकें सौंदर्य उत्पन्न करण्याला अवकाश उत्पन्न करून दिला, त्या दोषाचेंही अभिनंदनच करावें, असेंही कोणा रसिकाला रसास्वादाच्या भरांत वाटलें, तर त्यांत कांहीं आश्चर्य आहे,

असें नाही. भ्रमर हा जेव्हां एखाद्या कमळांतील मध चाखीत असतो, त्या वेळेला हे कमळ एका चिखलांतून उगवलेलें आहे, इकडे त्याचें लक्ष जात नसून त्या मधांतील माधुर्यामध्येच तो दंग होऊन गेलेला असतो. आणि अशा दृष्टीने पाहतां "एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः" हा कालिदासाचाच न्याय कालिदासाच्या काव्यांतील एका दोषाला लावण्याला कोण रसिक उदार अंतःकरणानें प्रवृत्त होणार नाहीं ?

असो. येथपर्यंत या दोषाचें विवेचन करून झाल्यानंतर, आतां आपण पुढील कथानकाकडे वळूं. या शापाच्यानंतर शकुंतला दुष्यंत राजाकडे जावयाला निघते. तिच्या सख्यांना जरी हा शापाचा वृत्तांत माहीत होता, तरी त्यांनीं मुद्दाम तिला ती हकीकत कळविली नाहीं. फक्त राजानें दिलेली खुणेची अंगठी त्यांनीं जाते वेळीं तिच्याजवळ दिली. परंतु शचीतीर्थावर शकुंतलेच्या बोटांतून ती अंगठी दुर्दैवानें तिच्या नकळत पाण्यांत पडली; व ती खुणेची अंगठी वेळेवर दाखवितां न आल्या कारणानें दुर्वासाच्या शापाप्रमाणें राजाला शकुंतलेची ओळख पटेना. आणि त्यामुळें तो तिचा अंगीकार करण्याला उद्युक्त होईना. तेव्हां शकुंतलेला दुसरा मार्ग उरला नाही. त्या वेळीं "भगवति वसुधे, देहि मे विवरम्" असे उद्गार शकुंतलेच्या तोंडून निघाले; व ती रडत रडत राजाच्या अग्निशाळेंतून बाहेर पडली. ती तेथून राजपुरोहित वगैरे मंडळीसह बाहेर पडते न पडते आहे, तों इतक्यांत राजाचा पुरोहित परत येऊन राजाला अशी हकीकत सांगू लागला कीं,

> सा निन्दन्ती स्वानि भाग्यानि बाला
> बाहूत्क्षेपं क्रन्दितु च प्रवृत्ता।
> स्त्रीसंस्थानं चाप्सरस्तीर्थमारा–
> दुत्क्षिप्यैनां ज्योतिरेकं जगाम ॥

राजा तिचा स्वीकार करीना ! कण्वशिष्य तिला टाकून गेले ! पृथ्वीही दुभंग होऊन तिला आपल्या पोटांत घेईना ! अशा निराश्रित स्थितीमध्ये शकुंतला आपल्या दैवाला दोष देऊन मोठमोठ्यानें आक्रंदन करूं लागली ! इतक्यांत तेथें एक ज्योति प्राप्त होऊन त्या ज्योतीनें तिला आकाशांत उचलून नेलें ! ही पुरोहितानें सांगितलेली हकीकत राजानें ऐकली. पण त्यानें तिकडे विशेष लक्ष न देतां तो आपल्या शयनभूमीकडे गेला ! पुरोहित

आपल्या घरी निघून गेला! कण्वाचे शिष्य तर त्याच्या आधीच आपल्या आश्रमाकडे परत वळले होते! आणि अशा रीतीनें सगळ्या पात्रांची विल्हे-वाट लावून दिल्यानंतर कालिदासानेंही आपला पांचवा अंक समाप्त केला! याप्रमाणें या पांचव्या अंकाकरितां जमलेलीं सगळीं पात्रें चार चोहींकडे निघून जातात; पण त्या बिचाऱ्या शकुंतलेचें काय झालें, याबद्दल कोणीच कांहीं काळजी करीत नाहीं! नाटकांतल्या पात्रांची जशी ही गोष्ट झाली, तशीच नाटकाच्या प्रेक्षकांचीही बहुतेक स्थिति होत असलेली दिसून येतें. हल्लीच्या दिवसांत सुद्धां एकाद्या ठिकाणी शाकुंतल नाटकाचा प्रयोग असला, तर तेथील नाटकगृहामध्यें पुष्कळ प्रेक्षकांची गर्दी जमते. पण या प्रेक्षकांपैकीं निरनिराळे लोक अनेक निरनिराळ्या हेतूनीं नाटकगृहामध्यें आलेले असतात. आणि त्यांपैकी रसग्रहण करणारे मार्मिक असे अगदी फारच थोडे असतात. तेव्हां पांचवा अंक संपत आला, म्हणजे रंगभूमीवरील एकेक पात्रें जशी आपला पाय काढीत असतात, त्याचप्रमाणे नाटकगृहांतील एकेक प्रेक्षकही बाहेर जाऊं लागतात. त्यांच्या बाहेर जाण्याच्या हेतूंची आणि निमित्तांची किळसवाणी मीमांसा कोणी किती करावी? असल्या अरसिकांना शकुंतलेचें कांहीही झाले, म्हणून काय वाटावयाचे आहे! पण जिचें चरित्र आपण पहिल्या अंकापासून पाहत आलो, जिच्या मुग्ध बाल्यावस्थेंतील शालीनतेबद्दल आपण कौतुक केलें, जिच्या अनुरूप भर्तृसमागमाबद्दल आपल्याला आनंद वाटला, जी आपल्या पतिगृही जाऊ लागली असतां तिच्या आश्रमांतील लतावृक्षांच्याबरोबर आणि पशुपक्ष्यांच्या बरोबर आपणही अश्रु गाळले, आणि ज्या पतिव्रतेचा प्रत्यादेश करून राजाने तिला नाहक छळल्यामुळे जिच्यासाठी आपलें अंतःकरण तिळतिळ तुटले आणि आपल्या डोळ्यांतून ढळढळां अश्रु वाहिले त्या शकुंतलेबद्दल एकाएकीं हें काय झालें, ती कोठे गेली, तिला कोणी नेलें, तिची पुढें काय अवस्था झाली असेल, हे जिव्हाळ्याचे प्रश्न प्रत्येक मार्मिक मनुष्याच्या रसार्द्र अंतःकरणामध्ये उत्पन्न झालेच पाहिजेत! चैनी, उडाण-टप्पू आणि अरसिक प्रेक्षकांची गोष्ट सोडून द्या; पण पहिल्या अंकापासून पांचव्या अंकापर्यंतच्या वाढत्या रसाबरोबर ज्या सहृदय प्रेक्षकांचें नाटकां-तील कथानकाशी वाढते तादात्म्य होत चाललें आहे, त्यांच्या मनांत या

ठिकाणीं वरील प्रश्नांचें काहूर उठल्यावांचून राहणार नाहीं! ज्याला याच्या पुढील कथानकाची हकीकत पुष्कळ वेळां परिचयाची झालेली आहे, त्याची गोष्ट कदाचित् निराळी असेल? पण जो कोणी हा प्रयोग पहिल्यानेंच वाचीत असेल किंवा पाहत असेल, त्याच्या मनांत हे प्रश्न उद्भवल्यावांचून कसे राहतील! आपल्या बहिणीप्रमाणें या शाकुंतल नाटकांतील नायिका जी शकुंतला तिच्यावर ज्यांचें निःसीम बधुप्रेम क्षणपरिचयानेंही कालिदासाच्या कौशल्यानें जडून जातें, ते प्रेक्षक आपल्या या हतभाग्य बहिणीची एकाएकीं ही काय अवस्था झाली, याचा उलगडा झाल्यावांचून बिचारे कोठें जातील आणि त्यांच्या मनाला काय सुचणार आहे! कालिदासानें अत्यंत निष्ठुरपणानें आपला अंक येथें संपविला असेल! पण त्याच्या रसिक प्रेक्षकांचा अंक येथें संपत नसून उलट त्यांच्या करुणरसाच्या अंकाला येथून सुरुवात होते, असेंच म्हणावें लागतें! पुरुष प्रेक्षकांपेक्षां स्त्री-प्रेक्षकांचें प्रयोगांतील शकुंतलेशीं तादात्म्य फारच तीव्रतेनें होतें. अशा स्त्रियांच्या कोमल मनाची या प्रसगीं काय स्थिति होत असेल याचें तर वर्णनही करणें शक्य नाहीं. हा पांचव्या अंकांतील हृदयद्रावक प्रवेश पाहून झाल्यानंतर किती तरी स्त्रियांच्या डोळ्यांचें पाणी किती तरी वेळपर्यंत थांबत नसेल! स्त्रियांचा सहजकारुणिक स्वभाव, शकुंतलेचें निर्दोषत्व, आणि राजानें निष्ठुरपणानें केलेला तिचा निष्कारण त्याग, या सगळ्या कारणांच्या समुच्चयानें स्त्रियांच्या सहानुभूतीचा ओघ शकुंतलेच्या त्या दीन अवस्थेकडे अतिशय जोरानें वळणें हें अगदीं स्वाभाविकच आहे. अशा मनःस्थितीत पहिल्या प्रयोगावलोकनाच्या वेळी किती तरी सात्त्विक अंतःकरणाच्या स्त्रिया आपल्या जागेवर रडत बसत असतील, दुष्यंत राजाला आपल्या मनांतून शिव्याशाप देत असतील, कालिदासाने आपल्या नाटकामध्यें असला अधर्माचा आणि अन्यायाचा एक अप्रशस्त प्रवेश घातल्याबद्दल तो वाईट नाटककार म्हणून त्याला दोष देत असतील, आणि ती राजानें टाकलेली शकुंतला त्यांना कोठे आढळेल तर मातृवात्सल्यानें आपल्या पोटाशी धरून तिला त्या आपल्या प्रेमाच्या पांघरुणाखालीं घेण्याला उत्कंठित होत असतील! पण ती शकुंतला आहे कोठें! ती कोठें आहे हेंच कोणाला कळत नाही! ती कोठें गेली, तिला कोणी कशाकरितां नेलें, राजाची आणि तिची पुन्हा भेट

होईल काय, राजा फिरून तिचा स्वीकार करील काय, ती बिचारी गरोदर आहे, तिची त्या गरोदरपणांत कोण काळजी घेईल, त्या अनाथ शकुंतलेला जें मूल होईल त्याचें संगोपन कोण करील, असे अनेक प्रश्न या ठिकाणीं वाचकांच्या आणि प्रेक्षकांच्या मनामध्यें उत्पन्न होतात. पण या प्रश्नांपैकीं कशाचेंही उत्तर कालिदासानें येथें कांही सुद्धां दिलेलें नाही. त्यानें फक्त "स्त्रीसंस्थानं चाप्सरस्तीर्थमारादुत्क्षिप्यैनां ज्योतिरेकं जगाम" एवढेंच काय ते सांगितलेलें आहे. तेव्हां आतां ही ज्योति कोण, ती एकाएकीं येथें कां व कशी आली, आणि तिनें शकुंतलेला आकाशांत उचलून कां नेलें, वगैरे प्रश्नांच्या विवरणाकडे आपण वळूं.

आणि येथूनच कालिदासाने न लिहिलेल्या नाटकाला सुरुवात होत आहे. ही जी ज्योति एकाएकी पांचव्या अंकाच्या शेवटीं प्रादुर्भूत झाली, ती दुसरी कोणी नसून ती शकुंतलेची आई मेनका हीच असली पाहिजे, हें उघड आहे. मेनकेसारख्या देवांगना व इतर देवता या नेहमीं तेजोमय स्वरूपामध्यें असतात, अशीं पुराणांतरींही वर्णनें आढळतात. तेव्हां त्या अनुरोधानें मेनकेचें येथे ज्योतीच्या रूपानें वर्णन केलेलें असलें, तर त्यांत कांहीं गैर आहे असें नाहीं. प्रत्येक मानवी प्राण्याच्याही पापपुण्याच्या मानानें कमी अधिक प्रमाणामध्यें त्याच्या सभोंवतीं त्याचे एक तेजोमंडळ असतेंच. यालाच थिऑसोफिस्ट लोक Aura असें म्हणतात. हें तेज सामान्य लोकांच्या दृष्टीला जरी दिसत नसले, तरी तें योगिक दृष्टीला दृग्गोचर होत असतें. आणि हें तेजोमंडळ देवतादिकांच्या ठिकाणी तर अर्थातच जास्त प्रकाशमान असते. हें जें तेजोमंडळ प्रामुख्येंकरून राजपुरोहिताला दिसलें, त्या तेजोमंडळामध्यें त्याला स्त्रीचीही एक आकृति दिसली. आणि त्यामुळेंच त्यानें "स्त्रीसंस्थानं ज्योतिः" असें त्या तेजाचें वर्णन केलेलें आहे. आणि या वर्णनांत कवीचे दोन हेतु आहेत. ज्या ज्योतीनें शकुंतलेला उचलून आकाशांतून अप्सरस्तीर्थाकडे नेलें, ती अप्सरस्तीर्थाशीं संबद्ध असलेली अशी कोणी तरी स्त्री असली पाहिजे आणि त्यावरून ती अर्थात् मेनकाच असावी असें सूचित करण्याचा एक हेतु होय. व अशा आपत्कालींही शकुंतलेला उचलून नेतांना सुद्धां तिला कोणा परपुरुषाचा स्पर्श न होतां कोणी तरी एका स्त्रीनेंच तिला उचलून नेलें, हें सांगण्याचा कवीचा दुसरा हेतु

होय. तेव्हां आतां शकुंतलेला अप्सरस्तीर्थाकडे उचलून घेऊन जाणारी ही तेजोमय स्त्री जर मेनकाच आहे, हें उघड होत आहे, तर ही मेनका तेथें एकदम येणें शक्य आहे काय? अर्थात् नाहीं! तेव्हां या तिच्या तेथें येण्याच्या आधीं किती तरी गोष्टी घडून आलेल्या असल्या पाहिजेत. आणि त्या गोष्टी काय काय असतील याची आपण कल्पना करूं लागलों, तर तेंही एक अत्यंत करुणरसात्मक असें नाटकच आहे, असें आपल्याला आढळून येईल. आणि तेंच हे कालिदासानें न लिहिलेलें नाटक होय! कालिदासानें एक बाजू घेऊन तीच रंगविली आहे व तीच लोकांच्यापुढे मांडली आहे, व उत्कृष्ट नाटककाराच्या दृष्टीनें त्यानें हें जें केलें आहे, तें योग्यच आहे. सर्वच गोष्टी नाटकामध्यें प्रेक्षकांच्या समोर प्रत्यक्ष मांडावयाच्या नसतात. ज्यांत रसाविर्भाव उत्कटतेनें प्रकट करतां येण्यासारखा असेल, तो तेवढा भाग प्रेक्षकांपुढें प्रत्यक्ष मांडून बाकीचा अवशिष्ट भाग कसा घडून आला असला पाहिजे, याच्याबद्दल प्रेक्षकांच्या कल्पनाशक्तीला कल्पना करण्याला पूर्ण अवकाश द्यावयाचा, अशी सगळ्या कवींची पद्धतच आहे; व नाटकाच्या आणि रंगभूमीच्या योजनेच्या दृष्टीनें अशी रचना करणे जरूरीचेंही असतें. त्यामुळें एखाद्या कथानकांतील कांहीं विशिष्ट भागच रंगभूमीवर दाखविला जातो; पण जो रंगभूमीवर दाखविला जात नाहीं, असा किती तरी भाग अवशिष्ट राहिलेला असतो. नाटकांतील पडद्याच्या पुढें आपल्याला जें नाटक दिसत असतें, त्याच्यापेक्षां त्या नाटकाच्या पडद्याच्या आंत आपल्याला न दिसणारें असें किती तरी नाटक चाललेलें असतें. आणि तें आपण कल्पनेनेंच जाणलें पाहिजे. मृच्छकटिक नाटकाच्या पांचव्या अंकामध्यें पर्जन्याची वृष्टि, मेघांचा गडगडाट आणि विजांचें चमकणें, यांच्यामधून वसंतसेना अभिसारिकेच्या वेषानें चारुदत्ताच्या घरीं जाते, हें आपण पाहतों व त्यामुळें आपलें मन आनंदित होतें. पण या शृंगाराच्या आणि विलासाच्या गोष्टी एकीकडे चाललेल्या असतांना त्याच पावसाच्या वृष्टीमध्यें, त्याच मेघांच्या गडगडाटामध्यें आणि त्याच विजांच्या चमकण्यामध्यें शर्विलक हा दुसरीकडे पालक राजाच्या तुरुंगाचे दरवाजे फोडून त्या दुर्दिनाच्या संधीचा फायदा घेऊन त्या तुरुंगामध्यें असलेल्या आर्यकाला सोडवून आणतो, ही गोष्ट शूद्रकानें जरी आपल्याला प्रत्यक्ष कोठें

सांगितली नाहीं, तरी या गोष्टीबद्दल त्यानें पुढें केलेल्या उल्लेखावरून या गोष्टीची आपण आपल्या कल्पनाशक्तीने बरोबर मांडणी करून घेतली पाहिजे; म्हणजे सगळ्या नाटकांतील स्वारस्याचा पूर्ण अस्वाद घेण्याची योग्यता आपल्यामध्यें उत्पन्न होते. कवीच्या प्रत्यक्ष कृतीला प्रेक्षकाने आपल्या कल्पनाशक्तीची अशा रीतीनें जोड दिल्याशिवाय पूर्ण रसोत्पत्ति प्रस्थापित होणें शक्य नाहीं. आणि त्याचप्रमाणें शाकुंतलच्या पांचव्या अंकामध्यें कालिदासानें जो कथाभाग प्रत्यक्ष दाखविला आहे, त्याच्याशिवाय बाकी राहिलेला भाग आपण आपल्या कल्पनाशक्तीनें भरून काढणें जरूर आहे.

शाकुंतलमध्यें दुष्यंतानें ज्याप्रमाणें शकुंतलेचा त्याग केला आहे, त्याचप्रमाणें रामायणांतील गोष्टीवर भवभूतीनें जें उत्तररामचरित नांवाचें नाटक लिहिलें आहे, त्यामध्येंही पहिल्या अंकांतच रामानें सीतेचा त्याग केल्याचा कथाभाग आलेला आहे. त्यानंतर दुसऱ्या अंकापासून सीतेच्या विरहाबद्दलचा शोक आपल्या मनामध्ये सांठवून ठेवून राम आपल्या राज्य-व्यवहाराच्या कार्याला लागला आहे. आणि शाकुंतलमध्यें ज्याप्रमाणें शकुं-तलेचें पुढें काय झालें, हें वाचकांना कळत नाही, त्याचप्रमाणें उत्तरराम-चरितामध्येंही रामानें सीतेचा त्याग केल्यानंतर गरोदर असलेल्या सीतेचें पुढें काय झालें, हेंही वाचकांना कांही कळत नाही. व उत्तररामचरितांतीलही हा कथावशेष आपल्या कल्पनेनेंच निर्माण करून घेण्याचा वाचकांवर प्रसंग आला असता. पण भवभूतीनें उत्तररामचरिताच्या सातव्या अंकाच्या पोटांत एका गर्भाकाच्या स्वरूपानें दुसरें एक लहानसें नाटक घातलें आहे. त्यामुळें तेथें वाचकांच्या सर्व अपेक्षा आणि सर्व जिज्ञासा तृप्त झालेल्या आहेत. रामानें सीतेला टाकल्यानंतर तिला प्रसववेदना होऊं लागल्या असतां निराश आणि निराश्रित होऊन तिने गंगेमध्यें उडी घेतली व त्या वेगामध्येंच ती प्रसूतही झाली; परंतु इतक्यांत प्रत्यक्ष देवी गंगा आणि देवी वसुंधरा अशा दोघीही तिच्या मदतीला धांवल्या व त्यांनीं सीतेला आणि तिच्या प्रसव पावलेल्या दोघां मुलांनाही आपल्या अंकांवर सांवरून धरिलें. नंतर त्यांनीं तिची सर्व शुश्रूषा केली; आणि तिचे ते दोघे मुलगे मोठे झाल्यावर गंगा आणि वसुंधरा यांनीं त्या मुलांना वाल्मीकिऋषीच्या स्वाधीन

केलें. नंतर वाल्मीकीनें त्यांचे सर्व सस्कार केले व त्यांच्याकडून राजकुलोचित अशा सर्व विद्यांचें अध्ययन करविले. आणि नंतर अखेरीस सीतेसहवर्तमान त्या दोघां मुलांना वाल्मीकीने रामाच्या हवालीं केलें. अशा प्रकारचा कथाभाग भवभूतीने या गर्भांकाच्या द्वारानें आपल्या वाचकांना कळविला आहे. परंतु शाकुंतल नाटकामध्यें कालिदासानें तितक्या स्पष्टतेनें शकुंतलेच्या मध्यंतरींच्या स्थित्यंतराचा उल्लेख केलेला नसल्यामुळें, कालिदासानें तें न लिहिलेलें नाटक वाचकांनीं समग्र अर्थपरिनिष्पत्तीसाठी आपल्या कल्पनेनें भरून काढणें जरूर आहे.

पांचव्या अंकामध्यें वर्णन केल्याप्रमाणें शकुंतलेची अत्यंत असहाय अशी स्थिति झाल्यानंतर, तिच्या नवऱ्याने तिला टाकल्यानंतर, तिचे बंधुजन तिला सोडून गेल्यानंतर आणि पृथ्वीही तिला आपल्या पोटांत घेण्याकरितां दुभंग होईनाशी झाल्यानंतर, त्या बिचाऱ्या गाईप्रमाणे अनाथ झालेल्या शकुंतलेच्या मदतीला कोण धांवून येणार ? अशा प्रसंगीं आपल्या मुलीच्या मदतीला तिच्या आईशिवाय दुसरें कोण धांवून येणार आहे ? उत्तररामचरितामध्यें अशाच स्थितीमध्ये सांपडलेली सीता जेव्हा गंगेमध्यें उडी घेऊं लागली, तेव्हां तिची आई देवी वसुधरा हीच गंगेच्या सहवर्तमान तिला सांवरून धरण्याकरितां पुढें सरसावली. आणि त्याचप्रमाणें अपत्यस्नेहानें विव्हलित झालेली मेनका हीच शकुंतलेच्या धांवण्याला त्या वेळीं धांवून आली, हें अगदीं स्वाभाविक आहे. पण ती या क्षणींच फक्त एकाएकीं पूर्वीच्या काही ओघावांचून एकदम आपल्या मुलीच्या मदतीला धांवून आली असेल, हें कधी तरी शक्य आणि स्वाभाविक असूं शकेल काय ? असे होणें केव्हांही शक्य नाही. आणि म्हणून हे उघड होत आहे की, शकुंतलेची आई, मेनका, ही अंतरिक्षांतून अदृश्य रीतीनें, पण अतिशय काळजीपूर्वक रीतीनें, आपल्या मुलीच्या हिताहिताच्या गोष्टींवर फार पूर्वीपासून नजर ठेवीत असली पाहिजे. पूर्वीच्या पुराणांतील पुष्कळ गोष्टीमध्यें अशी एक कल्पना प्रचलित असलेली दिसून येते कीं, पूर्वी स्वर्गांतील अप्सरा या मृत्युलोकामध्यें येऊन येथील आपल्या प्रियकरांशीं विवाहसंबंध करीत असत. पण त्यांना येथें कायम राहण्याची परवानगी नसे. त्यांना संतति झाली, म्हणजे त्यांनीं स्वर्गलोकामध्यें परत आलें

पाहिजे, असा निर्बंध होता. आपल्याला पुत्र झालेला असल्याचें पुरूरव्याला कळल्याबरोबर उर्वशी जशी स्वर्गलोकांत जाण्यास निघाली, त्याचप्रमाणें मेनकेचीही गोष्ट आहे. विश्वामित्रापासून मेनकेच्या पोटीं शकुंतलेचा जन्म झाल्याबरोबर शकुंतलेला मृत्युलोकीं सोडून देऊन मेनकेला स्वर्गलोकामध्यें परत जाणें भाग पडलें. पण या बाबतींत उर्वशीपेक्षां मेनकेची स्थिति जास्त वाईट होती. उर्वशीलाही जरी आपल्या मुलाला टाकून जाणें भाग पडलें असतें, तरी त्या मुलाचें संगोपन करण्याला त्या मुलाचा बाप, राजा पुरूरवा, हा समर्थ होता; व त्या मुलाचें संगोपन च्यवनऋषीच्या आश्रमामध्येंही चांगल्या रीतीनें करण्यांत येत होतें, परंतु मेनकेची परिस्थिति याहून अगदी भिन्न होती. शकुंतलेचा पिता, विश्वामित्र ऋषि, हा पुरूरव्यासारखा मूळचा कांहीं कामुक नव्हता. तो स्वभावतः तपस्वी असून विषयपराङ्मुख झालेला होता. परंतु त्याला तपोभ्रष्ट करण्याकरितां इंद्रानें मेनकेला मुद्दाम त्याच्याकडे पाठविलें होतें. आणि मेनकेनें आपल्या मोहजालानें फसवून विश्वामित्राला कामवश केलें होते. व या आपल्या कामवशतेबद्दल विश्वामित्राला पुढें वाईटही वाटलें. तेव्हां अशा फसवणुकीच्या समागमापासून झालेल्या संततीवर विश्वामित्राचें प्रेम कोठून असणार? विश्वामित्राला आपल्या अधःपाताची आणि तपोभंगाची कायमची खूण अशी जी आपली संतति शकुंतला ती दृष्टीसमोरसुद्धां पाहावयाला नको होती! तेव्हां तो तिचें संगोपन कोठून करणार? आणि मेनकेला तर अप्सरांच्या निर्बंधाप्रमाणें संतति उत्पन्न झाल्यावर मृत्युलोकामध्यें मुळींच राहतां येत नव्हतें. तेव्हां आपली अचिरप्रसूत कन्यका जी शकुंतला, तिला अरण्यांत तशीच टाकून मेनकेला स्वर्गलोकांत जाणें जरूर झालें. पण ती जेव्हां आपल्या या मुलीला टाकून स्वर्गलोकांत गेली असेल, त्या वेळेला तिच्या मनाला काय काय वाटलें असेल! त्या मुलीला कसेही करून संभाळण्याविषयीं मेनकेनें विश्वामित्राची किती तरी वेळां मनधरणी केली असेल! "ही पाहा किती सुंदर आहे! किती कोमल आहे! हिचे डोळे किती तेजस्वी आहेत! हिचें हास्य किती मधुर आहे! आणि हिचा तोंडावळा तुमच्या तोंडावळ्यासारखा किती तरी दिसत आहे!" असें मेनकेनें आपल्या स्त्री-स्वभावसुलभ मोहकलेनें आणि

वत्सलतेनें विश्वामित्राला किती तरी वेळां विनविलें असेल! पण विश्वामित्राच्या पाषाण हृदयाला द्रव फुटत नाहीं, असें पाहून तिनें अखेरीस त्या मुलीला आपल्या हृदयापासून दूर करून मोठया कष्टानें त्या अरण्यांतील भूप्रदेशावर ठेविलें असेल! पण तिला खालीं ठेवतांनाही ती किती तरी वेळां घुटमळली असेल! तिनें तिला एकदां खाली ठेविली असेल आणि फिरून आपल्या हृदयाशी उचलून घेतली असेल, आणि हिला येथें ठेवू किंवा नको ठेवू असे अनेक विचारतरंग तिच्या मनामध्यें आले असतील! अखेरीस निरुपायास्तव तेथें तिला टाकून जाण्याचा मेनकेचा निश्चय कायम होऊन तिला खालीं ठेवल्यावरही तिनें तिला अखेरचें स्तनपान दिलें असेल! आपल्या अश्रूनीं तिला भिजवून काढले असेल! आणि जातेवेळीं किती तरी वेळां परत येऊन तिनें तिचें फिरून फिरून चुबन घेतलें असेल! आणि दूर गेल्यावरही तिनें तिच्याकडे किती तरी वेळां आपली मान मागें वळवून पाहिलें असेल! इतक्या उचंबळून आलेल्या प्रेमानें जिनें आपल्या मुलीचा निरोप घेतला असेल, ती त्या मुलीपासून स्वर्गात दूर गेली, तरी तिचे अतःकरण पृथ्वीतलावरील त्या आपल्या मुलीच्या जवळच सदोदित असलें पाहिजे, हें उघड आहे! मेनका स्वर्गात गेल्यावरही त्या पृथ्वीतलावरील आपल्या मुलीला ऊन, थंडी, वारा, पाऊस यांच्यापासून बाधा होऊं नये म्हणून स्वर्गांतून वेडयासारखी ती आपला पदर आच्छादनासाठी त्या मुलीच्या अंगावर उंचावरूनही वरचेवर धरीत असेल! पृथ्वी आणि स्वर्ग यांच्यामध्ये जरी इतकें अतर आहे, तरी पृथ्वीवरील ती मुलगी क्षुधेनें रडू लागली असतां तें तिचें रडणें स्वर्गामध्येंही मेनकेला ऐकू आल्यासारखे वाटत असे. आणि प्रेमातिरेकामुळें मेनकेला पान्हा फुटून तिच्या डोळयातील अश्रुबिंदु आणि स्तनातील दुग्धबिंदु त्या मुलीच्या अंगावर आकाशांतून किती तरी वेळा बरोबरच खालीं ठप टप गळत असत. परंतु अशानें त्या मुलीचें संगोपन कसें होणार! पण 'अनाथो देवरक्षितः' ही म्हण पुष्कळ ठिकाणीं प्रत्यंतराला येते. विश्वामित्राला त्या मुलीची दया आली नाही, पण त्या रानांतल्या पक्ष्यांची मनें त्या मुलीचें रडणें ऐकून दयार्द्र झालीं, आणि आपल्या चोंचीमध्यें कांही तरी अन्नरस घेऊन लहान लहान आणि सुदर असे किती तरी पक्षी चिवचिव करीत तिच्या भोंवतीं जमा झाले! मेनकेला

वरून वाटलें कीं, हे पक्षी आपल्या मुलीच्या कोंवळया अंगावर आपल्या चोंची मारून तिला इजा करतील. म्हणून ती वेड्यासारखी वरून टाळया वाजवून निष्फळ रीतीनें त्यांना घालवून लावण्याचा प्रयत्न करूं लागली. पण तीं पांखरें आपल्या चोचीनें हळूहळू आणि अत्यंत वात्सल्यानें आपल्या मुलीच्या तोंडांत कांहीं तरी अन्नरस घालीत आहेत, असें जेव्हां तिला दिसून आलें, तेव्हां तिला मोठें आश्चर्य वाटलें, परमेश्वराच्या अगाध लीले-बद्दल तिला मोठी धन्यता वाटली, आणि तिचें अन्तःकरण कृतज्ञतेनें भरून येऊन मकरंदरसानें थबथबलेलीं अशीं नंदनवनांतील मंदारवृक्षाचीं कितीं तरी फुलें तोडून तिनें त्या पक्ष्यांकरितां पृथ्वीतलावर नेमकीं त्या ठिकाणीं पडतील अशा बेतानें खालीं टाकलीं! अशा रीतीनें त्या अरण्यांतील शकुंतांकडून त्या मुलीचें संगोपन आणि संरक्षण केलें जात असतां, एके दिवशी कण्व महामुनींच्या दृष्टीस ती पडून त्यांनीं तिला आपल्या आश्रमा-मध्यें नेलें व तिच्या संगोपनाचा सर्व भार आपल्यावर घेतला, हे पाहून स्वर्गामध्यें मेनकेचा जीव खालीं पडला आणि तेव्हांपासून आपल्या मुलीच्या संबंधानें ती थोडीशी तरी निश्चित झाली. तरी पण स्वर्गांतूनही तिचें लक्ष आपल्या मुलीवरून कधीं ढळलें नाही. आश्रमांत रात्री शकुंतलेला झोंप लागावी म्हणून पाळण्याला कोणी तरी झोंका देत असत; आणि तिला झोंप लागली म्हणजे पाळणा थांबवून बाकीच्याही आश्रमवासी स्त्रियांना स्वस्थ झोंपा लागत असत. पण त्यांतून मध्येंच कोणी जागृत झाल्यास शकुं-तला रडत नसतांनाही पाळणा हलत आहे आणि पाळण्याच्या दोऱ्या वाजत आहेत असा त्यांना भास झाल्यासारखा वाटे! पण पाळण्याला कोण झोका देत आहे, हें मात्र त्यांना कधीं कांही दिसलें नाही!

शकुंतला लहानाची मोठी होऊन रागूं लागली, तेव्हां तिला रांगण्याला भुई थोडी झाली. कण्वाच्या साऱ्या आश्रमांत आणि आश्रमावजळच्या उपवनांत ती वाटेल तिकडे एकटी दुकटी रांगत जात असे. अशी ती रांगत असताना कोणाचें तरी तिच्यावर लक्ष असेच. पण नेहमींच जवळ मनुष्य कोठून असणार? एकदां ती रांगत रागत होमशाळेकडे चालली आहे, असें कोणी आसपास असलेल्या माणसांनीं पाहिलें. पण ती नेहमींच्यासारखी अग्निकुंडापासून दूर राहील असें त्यांना वाटलें होतें. पण कांहीं वेळानें

तिच्या भयंकर रडण्याचा आवाज त्यांना ऐकू आला. तेव्हां ती यज्ञकुंडाकडे जाऊन आंत पडली असावी किंवा निदान तिचे हातपाय तरी आंत जाऊन भाजले असावेत, असें त्यांना वाटलें. इतका तो तिच्या रडण्याचा आवाज करुणास्पद होता ! तो आवाज ऐकल्याबरोबर आश्रमांतील सर्व माणसें तिला बाहेर काढण्यासाठीं होमशाळेकडे धांवत आलीं पण तीं येऊन पाहतात, तों त्यांना काय दिसलें ! ती माणसें येण्याच्या आधीच तिला कोणी तरी होम-कुंडांतून बाहेर काढून त्या कुंडापासून दूर अंतरावर उचलून ठेविले होते व तिच्या अंगाला ठिकठिकाणी राख लागलेली होती, यावरून ती कुंडांत पडली होती हें निःसंशय होतें. यज्ञकुंडांत नुकत्याच आहुत्या देऊन झालेल्या असल्यामुळें अग्नि तर अगदीं प्रज्वलित झालेला होता; पण तिच्या अंगाला मात्र अग्नीचा स्पर्श झाल्याची खूण कोठेही दिसत नव्हती ! हे झालें कसें ? तिला बाहेर काढली कोणी ? तेथे तर कोणीसुद्धां माणूस दिसत नव्हतें ! तेव्हां हा काय चमत्कार असावा, याबद्दल सर्वांना आश्चर्य वाटले; पण त्याचा उलगडा मात्र कोणलाही करितां आला नाहीं.

शकुंतला मोठी झाली, तेव्हां आश्रमांतील बाकीच्या आपल्या समवयस्क मुलींबरोबर ती निरनिराळे खेळ खेळत असे, आणि त्यांच्या बरोबरीनें निर-निराळ्या प्रकारचीं प्रेमळ गाणींही म्हणत असे. आश्रमाजवळच्या उपवनांतील एखाद्या झाडाच्या फांदीला दोऱ्या बांधून त्या अशा रीतीनें तयार झालेल्या झोंपाळ्यावर बसून मोठमोठ्या झेंपा घेण्याची आश्रमांतील सगळ्याच मुलींना हौस वाटत असे. एकदां शकुंतला त्या झोंपाळ्यावर बसलेली होती व तिच्या मैत्रिणी तिला खूप मोठमोठ्यानें झोका देत होत्या. इतक्यांत एक झोका फारच मोठा गेला आणि त्यासरशीं शकुंतला झोंपाळ्यावरून निसटून खालीं पडली. तेव्हां तिच्या सगळ्या मैत्रिणी अगदीं घाबरून गेल्या. आतां हिला लागलें असेल, आणि त्यामुळें ही आतां रडणार, आणि मग आश्रमांतील वडील माणसें आपल्याला खचित रागें भरणार, म्हणून त्या सगळ्या मुलींची पांचावर धारण बसली ! आणि पुढें पाहतात, तों तसें कांहींच झालें नाहीं ! जमिनीवर पडलेली शकुंतला हंसत हंसतच उठून आपल्या मैत्रिणीजवळ आली, आणि त्यांना सांगू लागली कीं, मी इतक्या उंचावरून खाली पडलें, पण मला मुळींच लागलें नाहीं ! आतां

आपल्याला पुष्कळ लागणार, असें मला देखील वाटलें होतें; पण मला मुळींच कोठें लागलें नाही! मी झोंपाळ्यावरून जमिनीवर पडणार, तों इतक्यांत मला कोणी तरी मध्येंच अलगज झेलून धरलें, आणि हळूच जमिनीवर ठेविलें, असें मला वाटलें! त्यामुळें मला मुळींच दुखापत झाली नाहीं! मला तुमच्यापैकीच कोणी तरी झेलून धरलें असलें पाहिजे! तेव्हां मला कोणी झेलून धरलें, तें सांगा पाहूं! असें तिनें आपल्या सगळ्या मैत्रिणीना विचारलें. पण त्या म्हणाल्या, आम्ही कसल्या तुला झेलून धरतों! तू आमच्या हातून पडलीस म्हणून आम्हीच किती घाबरून गेलों होतों! त्या आम्ही तुला कसल्या सावरणार! पण मग तुला अलगज झेलून धरलें, असें तू म्हणतेस, तें कोणी? असे प्रश्न त्या सगळ्या मुली विचारूं लागल्या; पण त्या प्रश्नाचे समाधान मात्र कोणाला कळलें नाही!

शकुंतलेला गाणी म्हणण्याचा नाद फार असे व तिला अशी गाणी तोंडपाठही पुष्कळ येत होतीं. तीं गाणीं ती एकटीच आपल्याशीं गुणगुणत असे. तिचा आवाज फारच मधुर होता. व तिच्या स्वराच्या आरोहावरोहामध्यें सहसा कधीच चूक होत नसे. पण ती उपवनांतून कधी एकटीच एखादें गाणें आपल्या मनाशी म्हणत चाललेली असतांना तिच्या आलापांत जर कोठें चूक झाली, तर तो आलाप बरोबर घेऊन कोणी तरी आपल्याला दाखवीत आहे, असा तिला भास होई! व तो शास्त्रशुद्ध आलाप ऐकून तिच्या मनाला अतिशय आनंद वाटे आणि त्याप्रमाणें ती आपला आलाप सुधारून घेत असे! आसपासच्या कुंजांत कोणी तरी आपली मैत्रीण असावी, आणि आपला चुकलेला आलाप ऐकून तो शुद्ध कसा म्हणावा हे तीच आपल्याला शिकवीत असावी, असें तिला पुष्कळ वेळां वाटे! पण आसपासच्या सर्व कुंजांतून ती जाऊन पाही, तर तेथें मात्र तिला कधीही कोणी आढळलें नाही! पण अशा अज्ञात रीतीनें कोठून तरी ऐकूं येणाऱ्या या दिव्य आलापांच्या अनुकरणानें शकुंतलेचें गायननैपुण्य मात्र एखाद्या अप्सरेच्या-प्रमाणें माधुर्याच्या अगदीं परमावधीला जाऊन पोंचलेलें होतें!

शकुंतला आपल्या मैत्रिणींबरोबर आश्रमाच्या जवळच असलेल्या मालिनी नदीच्या तीरावर पुष्कळ वेळां खेळावयाला जात असे. पण एके दिवशीं संध्याकाळीं ती एकटीच मालिनी नदीवर गेली. ती संध्याकाळची वेळ होती. सूर्य अस्ताला जाण्याच्या बेतांत होता. त्या हिमालयाच्या आसमंतात् भागांत जिकडे तिकडे शांतता पसरलेली होती. आणि मलिनीचें पाणी अगदी संथ होतें. अशा त्या शांत आणि रमणीय नदीच्या कांठच्या पाण्यामधील एका शिलेवर बसून शकुंतला त्या संध्याकाळच्या वेळची आसपासची निसर्गाची शोभा पाहण्यांत गुग झाली होती. तें निरभ्र आणि किंचित् आरक्त आकाश, हिमालयाचे ते आजूबाजूचे डोंगर, त्यांच्यावर उगवलेलीं ती देवदाराचीं उंच उंच झाडे, हा सगळा सभोवतालचा देखावा पाहून तिचें मन अगदी आनंदित होऊन गेलेलें होतें. पण त्याच्याकडे पाहतां पाहतां एकदम तिचें लक्ष वरून खालीं मालिनी नदीच्या पाण्याच्या पृष्ठभागावर गेले ! तों वर जो सुंदर देखावा तिला दिसत होता, तोच तिला फिरून त्या पाण्यांत दिसू लागला ! तेंच निरभ्र आणि किंचित् आरक्त आकाश, तेच हिमालयाचे डोंगर, तींच त्यांच्यावरील देवदाराचीं झाडें, असें सगळें वरचें चित्र तिला त्या संथ पाण्यांत अगदीं हुबेहूब दिसू लागलें ! व हा चमत्कार तिनें पहिल्यानेंच पाहिल्यामुळें तिच्या बाल्यावस्थेंतील मनाला फारच आश्चर्य वाटलें ! वरच्या सौंदर्याचें इतकें हे हुबेहूब चित्र कोणत्या चित्रकारानें काढलें ? आणि या दोहोंतील खरे चित्र कोणतें ? वरचें कीं खालचें ? किंवा खालच्याच खऱ्या चित्राचें प्रतिबिंब ह्या वरच्या आकाशांत प्रतिबिंबित झालें आहे ? याच्याबद्दल तिच्या मुग्धतेमुळें तिला कांहींच कळेना ! अशा आश्चर्यचकित अवस्थेमध्यें ती एकदां त्या आकाशाच्या आणि एकदां त्या पाण्याच्या पृष्ठभागाकडे पाहूं लागली, तों पाण्यांत आपलीही एक प्रतिमा पडलेली असल्यासारखें तिला कांहीं दिसलें. म्हणून ती त्याच्याकडे जास्त लक्षपूर्वक रीतीनें पाहूं लागली, तेव्हां कोणी तरी आपलेंही एक अगदीं हुबेहूब चित्र त्या पाण्यामध्यें काढलेलें असल्याचें तिला दिसलें व त्याच्याकडे ती मोठ्या कौतुकानें कांहीं वेळ पाहत राहिली ! पण तिचें लक्ष तिकडे लागून राहिलेले असतांना पाण्यांतील आपल्या चेहऱ्याच्या पाठीमागे आणखी दुसऱ्या कोणा तरी एका

सुंदर स्त्रीचा चेहरा पाण्यांत मधून मधून दिसत आहे आणि फिरून नाहींसा होत आहे, असें तिला वाटलें ! म्हणून ती त्या पाण्यांत दिसणाऱ्या दुसऱ्या चेहऱ्याकडे जास्त न्याहाळून पाहूं लागली. तेव्हां तिला असें आढळून आलें की, तो चेहरा आणि आपला चेहरा यांच्यामध्यें पुष्कळच सारखेपणा आहे; फक्त त्या चेहऱ्यामध्यें आपल्या इतक्या बाल्यावस्थेची छटा मात्र नाही ! हें तिला आढळून आल्यानतर हा दुसरा चेहरा कोणाचा असावा, म्हणून ती आपल्या पाठीमागें आणि आजूबाजूला पाहूं लागली. पण तेथें तिला दुसरें कोणीही मनुष्य आढळले नाही ! तेव्हां ती थोडीशी भिऊन सध्याकाळची वेळ होत चाललेली पाहून आश्रमाकडे परत गेली.

शकुंतला आणि तिच्या मैत्रिणी यांचा लहानपणी खेळण्याचा मोठा आवडीचा विषय म्हटला म्हणजे आश्रमाजवळच्या हिमालयाच्या लहान लहान टेकड्यांमधून आपल्या हाकेबरोबर उत्पन्न होणारा प्रतिध्वनि ऐकणें हा होता. आपल्या नांवाने आपण हांक मारावी आणि तीच हांक आपल्याला परत डोंगरांतून कोणी तरी मारीत आहे, असें ऐकून त्या मुली आनंदानें आणि आश्चर्यानें अगदी तल्लीन होऊन जात असत. पण हे प्रतिध्वनि त्यांना नेहमीच ऐकूं येत असत, असें नाही. एखादे वेळीं ठराविक जागा किंवा ठराविक अंतर चुकलें, म्हणजे हे प्रतिध्वनि ऐकू येत नसत. अशा वेळी बाकीच्या मुलींनी आपल्या नांवाच्या किती हांका मारल्या, तरी डोंगरांतील प्रतिध्वनि त्यांना प्रत्युत्तर देत नसे. पण त्याच ठिकाणी कधीं कधी असा मात्र चमत्कार होई की, 'शकुंतले !' असें म्हणून शकुंतलेनें आपल्या नावाने हांक मारली असतां तिला मात्र 'शकुंतले !' असें प्रत्युत्तर मिळालेलें ऐकू येत असे ! पण तो आवाज मात्र नेहमीच्या प्रतिध्वनीच्या आवाजाहून अगदी भिन्न, पण अतिशय गोड असा असे ! तेव्हा या प्रतिध्वनीच्या मिषाने कोणी तरी आपल्या कोमल, मधुर आणि प्रेमळ वाणीनें आपल्याला प्रेमानें हांका मारण्याची आपली लालसा पुरवून घेत असलें पाहिजे, असे शकुंतलेला वाटे ! व बाकीच्याही तिच्या मैत्रिणीचा या बाबतीत असाच ग्रह झालेला होता. पण या हिमालयाच्या डोंगरांतून शकुंतलेला इतक्या प्रेमाने कोण हांका मारीत असलें पाहिजे, हे मात्र त्यांच्यापैकीं कोणाला कधी प्रत्यक्ष दिसलें नाही किंवा समजलेंही नाही !

कण्वाच्या आश्रमांत शकुंतला लहानाची मोठी होत असतांना मेनका अशा रीतीने आपल्या मुलीवर नेहमी लक्ष ठेवीत असे व तिच्या सरक्षणाची नेहमीं काळजी घेत असे. व स्वर्गलोकांतील तिच्याकडे नेमून दिलेली तिचीं सर्व कृत्यें संपल्यानंतर तिला जेव्हां जेव्हां फुरसत सांपडे, तेव्हां तेव्हां ती अंतरिक्षांतून अदृश्यरूपानें बहुतेक आपल्या मुलीच्या आसपासच कोठें तरी असे. ती आपल्या दिव्यलोकांतील मैत्रिणीना आणून 'ही माझी मुलगी शकुंतला!' म्हणून किती तरी वेळां मोठ्या प्रेमाने कोणाच्याही नजरेस न पडतां दाखवीत असे. व त्याही तिला 'चांगला नवरा मिळो' म्हणून आशीर्वाद देत असत. शकुंतला लहान होती, तोपर्यंत तिला चांगला नवरा मिळण्याबद्दलचे बाकीच्या अप्सरांनी दिलेले हे औपचारिक आशीर्वाद ऐकून मेनकेला आनंद वाटत असे. पण शकुंतला जसजशी उपवर होत चालली, त्या त्या मानाने आतां हिला योग्य पति कसा मिळेल, याच्याबद्दल मेनकेला खरोखरच रात्रंदिवस चैन पडेनासें झालें. अशा विवंचनेमध्यें मेनकेचे अनेक दिवस चाललेले असतांना एके दिवशी हस्तिनापुरचा दुष्यंतराजा मृगयेच्या प्रसगानें कण्वाच्या आश्रमामध्ये आला असून तेथे शकुंतला, तिच्या मैत्रिणी आणि राजा दुष्यंत, ही कण्वाश्रमांतील एका सप्तपर्णवेदिकेवर बसून कांही सभाषण करीत आहेत, असे जेव्हां मेनकेने अंतराळातून पाहिलें, तेव्हां तो राजा आणि ती आपली कन्या शकुंतला यांना पाहून तिच्या मनामध्यें काय काय तरी आशेचे तरग उत्पन्न होऊं लागले! अहाहा! हा राजा किती सुदर आहे! आणि शकुंतलेचा आणि याचा हा जोडा तरी किती सुरेख दिसत आहे! पण या राजाला आपली मुलगी आवडेल काय? तिचें स्वरूप याच्या मनांत भरेल काय? दोघांचे प्रेम एकमेकांवर जडेल काय? माझी मुलगी या राजाची पट्टराणी होईल काय? इतके भाग्य माझ्या मुलीच्या कपाळी ब्रह्मदेवाने लिहिलेले असेल काय? किंवा ही तिची आई जशी हतभाग्य आहे, तसेच तिच्या मुलीच्या कपाळीही कांही दुःख भोगण्याचें तर विधात्यानें लिहिलेलें नाहीना? असे अनेक विचार मेनकेच्या मनामध्ये घोळू लागले. त्याच्या संभाषणांत आपल्या स्वतःच्याबद्दलचा पूर्वीचा उल्लेख आलेला ऐकून आणि त्या पूर्वप्रसंगाचें स्मरण होऊन मेनकेच्या डोळ्यांतून अश्रु आले!

परंतु राजा शकुंतलेची जन्मकथा विचारीत आहे, यावरून त्याच्या मनांत शकुंतलेबद्दल थोडेंबहुत तरी प्रेम उत्पन्न होत चाललें असलें पाहिजे, हा विचार मनांत येऊन मेनकेच्या मनाला बरेंचसें समाधानही वाटलें. व आतां लवकरच पुढील बोलण्याचालण्यावरून या प्रेमविषयक प्रश्नाचा कांहीं तरी उलगडा होईल, अशी मेनकेला फार आशा वाटू लागली होती. पण इतक्यांत कोणी एक दुष्ट हत्ती तेथील झाडें मोडू लागला आणि त्यानें त्या तपोवनांतील सगळ्या लोकांना भयभीत करून सोडल्यामुळें दुष्यतराजा शकुंतला व तिच्या मैत्रिणी यांच्या चाललेल्या संभाषणामध्यें व्यत्यय उत्पन्न झाला. हें पाहून मेनकेला अतिशय वाईट वाटलें. पण तिला त्या वेळी पुढें काय होतें, हें पाहण्यासाठीं तेथें थांबण्याला जास्त वेळ नसल्यामुळें तिला देवलोकांतील आपलें कार्य करण्याकरितां जाणें भाग पडलें.

पुढें कांहीं दिवसपर्यंत मध्यंतरी शकुंतलेची वास्तपुस्त घेण्याला मेनकेला स्वर्गांतील कार्यामुळें फुरसत झाली नाहीं. पण पुढें तिला एके दिवशीं असें आढळून आलें की, राजा दुष्यंत आणि आपली कन्या शकुंतला याचें प्रेम जमलेलें असून त्यांचा गांधर्वविवाह होण्याचेंही ठरलेले आहे. हा वृत्तान्त तिला समजला तेव्हां तिला कृतकृत्यता वाटली. व तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. पुढें कण्वाच्या तपोवनांतील इष्टि संपल्यानंतर राजा हस्तिनापुराला गेला असून आपली मुलगी शकुंतला ही गरोदर आहे, ही गोष्टही प्रणिधानानें मेनकेला समजली. व आतां आपली शकुंतला राजाच्या घरी जाऊन राजाची पट्टराणी केव्हां होते, आणि तिला पुत्ररत्न केव्हां होतें, एवढे पाहण्याचीच काय ती तिची इच्छा राहिलेली होती. आपल्या मुलीचे हे सुखसोहाळे एकदां आपण आपल्या डोळ्यांनीं पाहावे, याच्यापेक्षां मुलीच्या आयांची जास्त इच्छा काय असावयाची आहे? कण्व महामुनि शकुंतलेच्या प्रतिकूल दैवाचें उपशमन करण्याकरितां सोमतीर्थावर जे गेले होते, ते त्या प्रवासाहून परत आल्यावर शकुंतलेचा दुष्यंत राजाशीं गांधर्वविवाह होऊन त्याच्यापासून ती गरोदरही राहिलेली आहे, ही गोष्ट त्यांना कळल्यानंतर त्यांनीं त्याच दिवशीं शकुंतलेची आपल्या पतीकडे रवानगी करण्याचें ठरविलें; व शार्ङ्गरव, गौतमी वगैरे मंडळीना बरोबर देऊन शकुंतलेची हस्तिनापुरच्या वाटेला त्यांनीं बोळवणही करून

दिली. शकुंतला अमुकच दिवशी सासऱ्या पाठविली जाणार आहे, हे मेनकेला आधीं समजलें नव्हतें. त्यामुळे त्या दिवशीं ती नेहमींप्रमाणें येऊन तपोवनांत शकुंतलेला पाहूं लागली. पण त्या साऱ्या आश्रमांत शकुंतला तर कोठें दिसली नाहीच, पण उलट तें सारें तपोवन, मात्र अगदी खिन्न आणि उदासीन झाल्यासारखे तिच्या दृष्टीला दिसलें ! पण आज हें असें काय झालें आहे, हें मात्र तिला कांहीं कळेना. त्या तपोवनांत जिकडे पाहावें तिकडे सर्वत्र शून्यता पसरलेली मेनकेला दिसत होती. आश्रमांतील लता आणि वृक्ष सकाळच्या प्रहरच्या आपल्यावरील हिमबिंदूच्या रूपानें टप टप अश्रु गाळीत होते व त्यांच्यामधून जो थोडासा मद वायू वाहत होता, त्याच्यायोगानें ते कांहीं तरी दुःखातिरेकामुळें दीर्घ सुस्कारेच टाकीत आहेत कीं काय असे वाटत होतें ! सकाळच्या वेळी सरोवरांतील कमळें आणि झाडावरील फुलें कशी टवटवीत दिसावयाची; पण तीं अतिशय तापानें अगदीं कोमेजून गेल्यासारखी दिसत होती ! व तीं आपल्या डेखांपासून खालीं लवलेली असल्यामुळें जणू दुःखानेंच त्यांनी आपल्या माना खाली घातल्या आहेत कीं काय, असा भास होत होता त्या आश्रमांतील झाडांवरून पक्ष्यांची ही एकसारखीं कोण किलबिल चाललेली असावयाची; पण त्यांच्या तोंडांतून देखील एकही शब्द बाहेर निघालेला ऐकू येत नव्हता. मेनकेला वाटलें, या पक्ष्यांना देखील असें काय झालें आहे ! इतक्यांत आश्रमांतील शकुंतलेच्या प्रीतीतील हरिण शावकांकडे तिचें लक्ष गेलें. पण तेथेही तिला आश्चर्यकारक असा देखावा दिसला ! तीं सगळीं हरणें डोळ्यांत पाणी आणून आणि आपल्या माना वर उचलून श्वास टाकीत एका विशिष्ट दिशेकडेच पाहत असलेलीं तिला दिसली ! तेव्हां हीं सगळीं हरणें या एकाच दिशेकडे इतकी टक लावून कां पाहत आहेत, असा प्रश्न तिच्या मनांत आला; व तीही त्याच दिशेकडे पाहूं लागली. तों इतक्यांत दुरून कण्व महामुनि, अनसूया, प्रियवदा, वगैरे आश्रमांतील बरीच मंडळी डोळ्याला पदर लावून रस्त्यावरून अडखळत आश्रमाकडे परत येत आहेत, असें तिला दिसलें ! व त्या परत येणाऱ्या मंडळीत आपली शकुंतला नाही, असें पाहून तिची आतांच पतिगृहीं रवानगी करून ही मंडळी आश्रमांत परत येत असली पाहिजे, असा तिनें तर्क केला. व तो तिचा तर्कही बरोबरही ठरला. कारण कण्व

प्रभृति ते सर्व तपस्वीजन ज्या मार्गानें परत येत होते, त्याच मार्गावरून अंतराळामधून मेनका कांहीं पुढें गेली नाहीं, तोच आपली मुलगी शकुंतला गर्भमंथर गतीनें हळूहळू चाललेली तिला दिसली. तेव्हां आतां आपली मुलगी राजाच्या घरीं गेली, म्हणजे राजा तिचा स्वीकार करणार आणि ती राजाची पट्टराणी अवश्य होणार, त्या वेळीं तो अपूर्व सोहळा आपल्याला आपल्या डोळ्यांनीं पाहतां यावा, म्हणून तिनें तिच्याबरोबर हस्तिनापुरला जाण्याचा आपला निश्चय ठरविला. व शकुंतला जमिनीवरून चालली असतां मेनका तिच्यावर आपल्या मायेचें छत्र धरून आकाशांतून संचार करीत चालू लागली.

अखेरीस ऋषिकुमार आपला प्रवास संपवून हस्तिनापुरांत आले व पुरोहिताच्या मार्फतीनें राजाच्या इच्छेप्रमाणें राजाच्या आग्निशाळेंत राजाच्या समोर त्यांचा प्रवेशही झाला. त्यांच्याबरोबर गौतमी आंत गेली. व तिच्या-जवळ एक बाजूला अवगुंठण घेतेलेली शकुंतलाही उभी राहिली. हीं सर्व माणसें एकमेकांना दिसत होतीं. फक्त मेनका मात्र तेथें असूनही कोणाला दिसत नव्हती. पण तिला मात्र तेथें असलेली बाकींचीं सर्व माणसें व तेथें चाललेला सर्व प्रकार दिसत होता. त्या दिवशीं मेनका स्वर्गांतून शकुंतलेकडे प्रथम यावयास निघाली, तेव्हां निघतां क्षणींच तिला कांहीं अपशकुन झाले. व हे अशुभसूचक अपशकुन आज मला कां होत आहेत, असा विचार तिच्या मनांत येऊन ती थोडी चिंताक्रांतही झाली. पण आश्रमांत तिला शकुंतला दिसली नाहीं हेंच तें अशूभ होय व तें सुचविण्या-करितांच आपल्याला आज ते आरंभीचे अपशकुन झालेले असावेत अशी तिनें आपल्या मनाची समजूत घालून घेतली. व आतां शकुंतला राजाच्या राजवाड्यांत आल्यानंतर, आतां याच्यापुढें कांहीं अशुभ उरलेलें नसून तेथून पुढें सगळें शुभच होणार अशी मेनकेच्या मनाला खात्री वाटूं लागली होती. व त्यामुळें त्या भावी आनंदाच्या उत्सुकतेनें ती त्या आग्निशाळेंतील संभाषणें ऐकण्याला तत्पर झालेली होती! पण त्यांचें बोलणें थोडा वेळ ऐकल्यानंतर तिला असें अढळून येऊं लागलें कीं, हा भाषणाचा ओघ भलतीकडेच चालला आहे, आणि हें कांहीं ठीक चिन्ह नाहीं! तिचा उजवा डोळा फिरून लवूं लागला; व तिला आतां असें वाटूं लागलें कीं, जें कांहीं

अशुभ पूर्वीच्या दुर्निमित्तांकडून आपल्याला प्रथमतः सुचविण्यांत आलेलें होतें, तें अशुभ पूर्वी संपून गेलेलें नसून त्याची आतां येथून सुरवातच व्हावयाची आहे ! "काय मी हिच्याशीं पूर्वीं लग्न केलेलें आहे ?" असा राजानें केलेला प्रश्न मेनकेच्या कानावर आला. तेव्हां तर तिच्या तोंडाचें पाणीच पळून गेलें, आणि या सगळ्यांचें पर्यवसान पुढें काय होणार याचें चित्र तिच्या डोळ्यापुढें हळूहळू उभें राहूं लागलें. आपल्या मुलीशीं लग्न केलेलें असल्याचें राजाला आठवत नाहीं, तेव्हां त्याला त्या गोष्टीची आठवण करून देण्याकरितां खुद्द राजानें दिलेली खुणेची अंगठी राजाला दाखविण्यासाठीं शकुंतला आपल्या बोटाकडे पाहूं लागली असतां बोटांत अंगठी नसून ती कोठें तरी पडून गेली आणि त्यामुळें शकुंतला निरूत्तर झाली, हें पाहून अंतराळामध्यें मेनका अगदीं गोंधळून गेली व तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. पुढें अंगठी सांपडत नाहीं तर नाही, दुसऱ्या कांहीं खुणेच्या गोष्टी सांगून राजाची स्मृति जागृत करावी, म्हणून शकुंतला राजाला एकांतांतील कित्येक गोष्टी सांगूं लागली. पण त्यांच्या योगानेंही राजाला कांहींच खुण पटेना; हे सगळें मेनका वरून पाहत होती. व आपल्या नशिबाला हात लावून मुकाट्यानें सर्व सहन करीत होती ! येथपर्यंत तिला फक्त दुःखच वाटत होतें. पण याच्यापुढें "ही स्त्री कांहीं तरी खोटें बोलत आहे, स्त्रियांना खोटें बोलायला कोणी शिकवावें लागत नाहीं" असा जेव्हां राजानें शकुंतलेवर आरोप केला, तेव्हां मात्र मेनकेच्या मनामध्यें क्रोधाची ज्योत पेट घेऊं लागली व दुःख आणि त्वेष यांच्यायोगानें तिच्या मनाचा भडका उडून गेला. याची ही धर्मपत्नी असूनही आतां हा हिचा त्याग करणार आणि फिरून ही लबाड बोलणारीण म्हणून तिला दूषण देणार, हें भावी संकट तिच्या डोळ्यांपुढें दिसूं लागून आपण पुढें काय करावें, हें मेनकेला कांहीं सुचेना ! आपल्या मुलीला या संकटांत मदत करण्याकरितां आणि त्यांतून तिला सोडविण्या-करितां आतां आपण कोणाला शरण जावें, कोणाला हांक मारावी, कोण आपल्या धांवण्याला धांवून येईल, कोण आपल्या उपयोगी पडेल, असा ती विचार करूं लागली. मुलीवरील संकटाच्या वेळीं मुलीच्या आईला मुलीच्या बापाशिवाय साहजिकपणें प्रथम दुसऱ्या कोणाचें स्मरण होणार ? मेनकेला

त्या वेळीं विश्वामित्राची एकदम आठवण झाली. आणि ती त्याला हांका मारूं लागली. ती म्हणाली :–" अहो, विश्वामित्र महामुने तुम्ही या वेळीं कोठें आहां ? तुम्ही जेथे कोठें असाल, तेथून लवकर इकडे या ! तुमच्या पवित्र मुलीवर हे काय संकट ओढवत आहे, हें तुम्हीं पाहत नाही काय ? तुम्ही त्रिकालज्ञानी असून तुम्हांला हें कसें दिसत नाहो ? आपल्या मुलीशी यानें लग्न केलें असून आतां तिचा हा स्वीकार करीत नाही, हें तुम्हांला कसें सहन करवते ? आपल्या पवित्र आणि कैतवानभिज्ञ अशा मुलीला हा दुष्ट राजा अनृतभाषिणी म्हणून म्हणतो याच्याबद्दल तुम्हांला कांहीच राग येत नाही काय ? तुम्ही अतिशय शीघ्रकोपी म्हणून तुमच्याबद्दल जिकडे तिकडे प्रख्याति असून आपल्या मुलीचा इतका अपमान होत असतांनाही तुम्हाला अजून कांहीच कोप येत नाही, हे कसें ? आज या स्त्रीवर आणि उद्या त्या स्त्रीवर लंपट होणाऱ्या अशा या राजाला तुम्ही तपःसामर्थ्यानें शाप देऊन—छे छे ! — नको नको ! —मी चुकलें ! —मी हे काय काय बोलले! —आपली शकुंतला ! — आणि तिच्या नवऱ्याला शाप—तुम्हीं आपल्या तप सामर्थ्यानें त्याच्या बुद्धीमध्यें फरक पाडून तो आपल्या शकुंतलेचा स्वीकार करील, अशी तुम्हीं कांही तरी योजना करा ! करतांना ?–– मी ही तुमची विनवणी करीत आहें, इकडे तुमचें लक्ष आहे ना ?—समाधींत असलां, तर ती समाधि सध्यां उतरून ठेवा ! —किंवा एखादी नवीन प्रतिसृष्टि निर्माण करण्यांत तुम्ही गुतला असलां, तर तें काम तूर्त बंद ठेवा ! –– आपल्या मुलीपेक्षां कांही कामे जास्त आहेत ?—पण मग अजून तुम्ही येत कां नाही ? किवा मी तुम्हाला पूर्वी तुमच्या तपश्चर्येपासून भ्रष्ट केलें त्यामुळें तुम्ही येत नाही ?––पण तो राग अजून तुमच्या मनांत असला, तर तो राग तुम्ही माझ्यावर काढा ! ––पण या आपल्या अनाथ शकुंतलेनें तुमचें काय केले आहे ?––तिचें आपण दोघांनीं कल्याण नको का करून द्यावयाला ? तिच्या आईने तिच्यासाठी असें तळमळावें, आणि तिच्या जनकाला तिची कांहीच करुणा येऊं नये. काय ?—पण तुम्ही अजूनही येत नाही ! —अथवा आईचें दुःख बाप काय जाणणार ! — झालें ! राजाचें बोलणे झालें ! तो आतां तिचा त्याग करणार ! ––मग तुम्ही केव्हां येणार ! आणि पाठीमागून येऊन काय उपयोग ?––अथवा मी अधम, मी विश्वासघातकी, मी त्यांना धडधडीत

फसविलें, त्या माझ्या करुणेला हाक देऊन तो पवित्र धर्मात्मा कशाला येईल ! त्या महात्म्याच्या दृष्टीनें माझी काय किंमत ! मी बोलून चालून देवांची वारांगना ! आज याला फसवावें आणि उद्यां त्याच्याशी रममाण व्हावें, हा माझा क्रम ! अशा माझ्यावर त्या विश्वामित्रानें काय म्हणून विश्वास ठेवावा ? या अत्यंत दुःखमय अशा मृत्युलोकातल्या एखाद्या गरीब-गुरीब अशाही पतिव्रतेला तिच्या पुण्याचरणामुळे जे महत्त्व आहे, तें सुखमय स्वर्ग लोकामध्ये असूनही माझ्यासारख्या इंद्राच्या सभेतील एका नर्तकीच्या कपाळी नाही ! अशा माझ्या या वारांगनेच्या पापमय जीविताला धिक्कार असो ! आम्ही ज्या केवळ विषयसुखालाच लंपट झालेल्या, त्या आमच्यावर कोणता पति खरे प्रेम करणार आहे ? पतीचें आणि संततीचे कायम टिकणारें सुख आमच्या कपाळी नाही ! त्या आनंदमय सुखाकरितां आमचा हा पापी जन्मच नाही ! त्या मागच्या वर्तनाबद्दल मला आता पश्चात्ताप होत आहे.—पण आतां त्याचा काय उपयोग !—पण यांत माझा तरी काय दोष होता ? इंद्रानें मला सांगितले म्हणूनच नाही का मी तें नीच कृत्य करण्याला प्रवृत्त झाले ?—पण इंद्र तरी आतां माझ्या कोठे उपयोगी पडतो आहे ! इंद्रही नाहीं आणि विश्वामित्रही नाही, अशी या वेळी माझी स्थिति झाली आहे ! विश्वामित्राच्या उग्र तपश्चर्येनें इंद्राचे इंद्रपद जाण्याची वेळ आली, त्या वेळी मी इंद्राच्या उपयोगी पडून त्याचें इंद्रपद वाचविलें ! पण आतां माझ्यावर संकट आलेले असता माझ्या मुलीची अब्रू कोण वांचविणार ? इंद्राच्या इंद्रपदापेक्षाही पतिव्रतेच्या अब्रूची किंमत किती तरी पटीनें जास्त आहे ! पण ती वांचविण्याला या ठिकाणी मला कोणाचेही साहाय्य नाहीं ! मी आतां काय करूं ? हे देवाधिपते इंद्रा, मी तुझ्या उपयोगी पडले तें स्मरून कृतज्ञताबुद्धीने मी तुला हांक मारण्याच्या पूर्वीच तू आपण होऊनच येऊन माझ्यावरील हें संकट निवारण करू नयेस काय ? पण इतकी कृतज्ञता-बुद्धि जगांत आहे कोठे ? शेकडों हांका मारल्या तरी जेथे कोणी येत नाहीत, तेथे हाक मारण्याच्या आधी येण्याइतके सौजन्य कोणाच्या अंगांत असणार ? पण इतरांची गोष्ट राहिली, तरी इंद्रा, तू माझ्यावर करुणा करूं नयेस काय ? पण ती केव्हां करणार ?—आतां अवकाश राहिला नाही ! हें पहा ! राजाने शकुंतलेचा अंगीकार करण्याचे साफ नाकारले ! तिच्या बरोबरचे

तपस्विजन तिला टाकून परत चालले ! अखेरची तडजोड म्हणून राजा शकुंतलेला आपल्या पुरोहिताच्या घरीं ठेवण्याचें ठरवीत आहे ! पण शकुंतलेला हा अपमान कसा सहन होणार ! ती गाईसारखी हंबरडे फोडूं लागली आहे ! आणि हे धरणीमाते, तूं दुभंग होऊन मला आपल्या पोटांत घे, असे निर्वाणीचें उद्गार तिच्या तोंडून निघत आहेत !—आतां काय वाट पहावयाची ! आणि आतां कोण माझ्या मदतीला येणार आहे ? इतकी कडेलोटाची वेळ आल्यानंतर आतां मीच माझ्या मुलीच्या संरक्षणाकरितां खालीं उडी घातली पाहिजे. आईचें प्रेम हेच या वेळीं मला सामर्थ्य देत आहे !— इतक्या अपमानानंतर ही आपल्या जीवाचें देखील काय करील याचा नेम नाहीं !—बाळे शकुंतले, थांब, धरणीमातेनें दुभंग होऊन तुला आपल्या पोटांत घ्यावें अशी तू त्या धरणीमातेची प्रार्थना करीत आहेस ! पण थांब, ही पहा आकाशमाता तुला आपल्या पोटांत घेण्याकरितां येत आहे !—असे म्हणून मेनका आपल्या तेजोमय स्वरूपामध्यें एकदम खालीं उतरली, आणि शकुंतलेला घेऊन ती एकाएकीं अंतरिक्षामध्यें अदृश्य झाली!

कालिदासानें पांचव्या अंकाच्या शेवटीं पुरोहिताच्या तोंडांत घातलेल्या

> सा निन्दन्ती स्वानि भाग्यानि बाला
> बाहुत्क्षेपं क्रन्दितुं च प्रवृत्ता ।
> स्त्रीसंस्थानं चाप्सरस्तीर्थमारा–
> दुत्क्षिप्यैनां ज्योतिरेकं जगाम ।।

या श्लोकाच्या पाठीमागें ही वर दिलेली अशी किंवा अशाच स्वरूपाची दुसरी कांहीं तरी गोष्ट गुप्त आहे. तिची जेव्हां आपण आपल्या मनामध्ये उभारणी करावी, तेव्हां, कोणी तरी एक तेजोमय स्वरूपाची स्त्री आकाशांतून खालीं येऊन तिनें शकुंतलेला आकाशांत उचलून नेलें ही गोष्ट शक्य होते. उगीच कोणी तरी आकाशांतून येऊन शकुंतलेला उचलून नेले असा हा कांहीं एखाद्या भुताकटीचा प्रकार नाहीं. या विधानांत अनेक कार्यकारणांच्या आणि अनेक मनोधर्माच्या संबंधांची गुंतागुत गुंतलेली आहे. आणि ती सगळी आपण ह्या नाहीं त्या—कोणत्या तरी स्वरूपानें—सोडविल्यावांचून आपलें समाधान होणें शक्य नाहीं. जिनें शकुंतलेला आकाशांत उचलून नेलें ती मेनकाच कां होती व तिनें तसें करण्याच्या पूर्वीच्या तिच्या मनोधर्माचा

आणि तिच्या विचारसरणीचा ओघ कोणत्या दिशेनें चालला होता, हें बरोबर रीतीनें समजलेलें असणें अवश्य आहे. शकुंतलेच्यासारखीं आपल्या मुलीची स्थिति झाली असतां कोणत्याही आईला काय वाटेल, आणि तीं काय करण्याला प्रवृत्त होईल, याची आपल्याला योग्य कल्पना आलेली असली पाहिजे. मेनकेच्या स्वर्गलोकांतील नियंत्रणाप्रमाणें तिला अदृश्यच राहणें भाग होतें. व अशा स्थितीत तिनें आपल्या मुलीला अशा अदृश्य रीतीनें मदत करणें, हेंच शक्य होते. थिऑसफिस्ट मंडळीच्या उत्कृष्ट वाङ्मयामध्यें Invisible Helpers या नांवाचे मि. लेडबीटर यांनीं लिहिलेलें एक अतिशय सुंदर पुस्तक आहे. या पुस्तकामध्यें देव, देवता, देवदूत, परोपकारी मृतात्मे, किंवा कोणी अतिशय जवळच्या नातेवाईकांचे मृतात्मे, 'अॅस्ट्रल प्लेन' मधून इहलोकीच्या संकटांत सांपडलेल्या अनाथ लोकांना अदृश्य रूपानें येऊन निरनिराळया रीतीनें कशी मदत करीत असतात, याच्याबद्दलची फार साश्चर्य आणि सोपपत्तिक वर्णने दिलेली आहेत. मेलेल्या आयांच्या आत्म्यांनीं आपल्या लहान मुलांना संकटांतून अदृश्य रीतीनें येऊन सोडविल्याचीं कित्येक उदाहरणें त्यांत दिलेली आहेत. इहलोकाच्या सर्व मनोविकारांमध्यें आईचें आपल्या अपत्यांवरील प्रेम हें अतिशय निर्मळ, निष्कपट आणि निष्कलंक असें असतें. आणि म्हणून इहलोकीचें प्रेमाचे दृश्य-धागे मृत्युमुळें तुटलेले असले, तरी त्या अमर्याद मातृवात्सल्याचे संबंध मृत्यू-नंतरही कायम असतात. या साधारण मर्त्य लोकांच्या आणि मेलेल्या लोकांच्या मातृवात्सल्याच्या गोष्टी होत! मग मेनकेसारखी दिव्य लोकांतील आणि जिवंत स्थितीमधील माता असतांना ती आपल्या शकुंतले-सारख्या कन्यकेसाठीं काय काय करणार नाही! ती तेजोमय स्वरूपानें आपल्या मुलीला नेण्याला पृथ्वीतलावर आली, हे कालिदासाचें वर्णन आज हजारों वर्षांचें जुनें झालेलें आहे. पण चालू शतकामध्यें मि. लेडबीटर यांनीं जें प्रस्तुतचें अगदीं ताजें पुस्तक लिहिलें आहे, त्यांत त्यांनींही या देवतांचें किंवा मृता-त्म्यांचें अॅस्ट्रल प्लेनमधून जें आगमन आणि दर्शन होतें, तें तेजोमय स्वरूपा-मध्यें कसें असतें, याच्याबद्दल फार स्पष्ट वर्णनें दिलेलीं आहेत. तीं वर्णनें आणि कालिदासाचें वर्णन यांच्यामध्यें पुष्कळ साम्य आहे. He saw a form like an angel— here his exact words are given

—a something " all gloriously white and silvery, bending over the bed and smoothing down the counterpane." (P. 11) The children each declared that " a beautiful person, all white and shining," stood beside them in the water, held them up and guided them to the shore. (P. 12) अदृश्य स्वरूपामध्यें मदत करणाऱ्या तेजोमय देवदूतांची ही वर्णनें आणि कालिदासाने केलेल्या मेनकेच्या तेजोमय स्वरूपाचें वर्णन यांच्यामध्यें किती तरी साम्य आहे !

अशा प्रकारच्या दिव्य आणि तेजोमय स्वरूपामध्यें मेनका शकुंतलेला आकाशपंथानें घेऊन अप्सरस्तीर्थावर आली. पण या मध्यंतरीच्या अवधीमध्यें शकुंतलेची काय अवस्था झालेली होती ! 'हे धरणीमाते, तू दुभग होऊन मला आपल्या पोटांत घे;' अशी शकुंतला पृथ्वीची प्रार्थना करीत होती. व त्याप्रमाणें पृथ्वी दुभंग झाली असती, तर त्या पृथ्वीच्या पोटामध्यें उडी घेण्याला शकुंतला आपल्या दुःखाच्या परमावधीमध्ये तयार झाली असती; पण आपल्या प्रार्थनेबरोबर पृथ्वीच्या ऐवजी आकाश फाटेल आणि त्याच्या पोटात उडी घेण्याची आपल्यावर पाळी येईल ही तिची कल्पना नव्हती ! त्याबद्दल तिच्या मनाची तयारीही नव्हती. त्यामुळें एका दिव्य तेजःपटलामध्यें गुंडाळून आपल्याला कोणी तरी एकदम उंच आकाशात उचलून घेऊन चालले आहे, असे पाहून शकुंतलाही अगदीं घाबरून गेली. राजाने आपल्याला टाकून दिले तर दिले, आणि आतां आणखी हे नवीन संकट काय आले, हे शकुंतलेला न समजून ती अगदीं वेडी होऊन गेली. व तिला किंचित् मूर्च्छाही आली. अप्सरस्तीर्थावर गेल्यानंतर तेथील एका वृक्षाच्या छायेखाली बसून मेनकेने तिच्या डोळ्याला गंगाजळ लाविले व आपल्या पदराने तिला थोडासा वारा घातला. त्यामुळें थोड्या वेळाने शकुंतला शुद्धीवर आली. पण आपण कोठे आलों आहों आणि जिने आपल्याला आपल्या मांडीवर निजविले आहे, ती ही कोण आहे हें तिला पहिल्याने कांही कळेना. पण ती मेनकेच्या तोंडाकडे टक लावून पाहूं लागली, तेव्हां कण्वमुनीच्या आश्रमांत असतांना एके दिवशी संध्याकाळीं मालिनी नदीच्या शांत उदकामध्ये जिच्या सुंदर मुखाचें प्रतिबिंब

पडलेलें आपल्याला दिसलें होतें, तेंच हे मुख आहे, अशी तिची खात्री झाली ! आणि तिच्या तोंडचे कांही शब्द ऐकल्यानंतर शकुतलेला फिरून आणखी असेही वाटू लागलें कीं, कण्वाश्रमांतील मालिनी नदीच्या पलीकडच्या तीरावरील हिमालयाच्या लहान लहान टेंकड्यांमधून लहानपणी आपण आपल्या शब्दांचे प्रतिध्वनि ऐकून आपल्या मनाचें रंजन करून घेत असतां त्या प्रतिध्वनींच्या ऐवजीं एखादे वेळी मध्येच जो एक कोणाचा तरी सुदर आवाज आपल्याला ऐकू येत असे, तोच हा आवाज असला पाहिजे ! पण तो चेहरा आणि तो आवाज जरी ओळखला, तरी ही स्त्री कोण आहे, आणि ही आपल्याला इतक्या ममतेने का वागवीत आहे, हे तिला कळेना. म्हणून याचा उलगडा करण्याकरिता शकुंतला मनांतून अगदीं उत्सुक झाली होती. ती तिची कावरी बावरी मुद्रा पाहून मेनका तिला म्हणाली, "बाई, तू अशी कावरी बावरी कां झाली आहेस ? तुला आतां बरें वाटत आहे ना ?" यावर शकुंतलेनें उत्तर केलें की, "मी आतां चांगली देहभानावर आलेली आहें. पण तुमचा चेहरा आणि तुमचा आवाज माझ्या ओळखीचा सारखा वाटत असून तुम्ही कोण हे मात्र अजून माझ्या कांही ध्यानांत येत नाही म्हणून मी अगदी गोंधळल्यासारखी झालें आहे ! तुम्हीच का मला अन्तरिक्षांतून येथें उचलून आणिलें ? त्या संकटात तुम्ही माझ्या मदतीला कां धावून आला ? आणि तुम्ही माझ्यावर अगदी माझ्या आईप्रमाणें इतकी माया ममता कां करीत आहा ? माझ्यावर इतकी ममता करण्यासारखे माझ्यांत काय आहे ? मी हतभाग्य आणि माझ्या आईबापांनी टाकून दिलेली अशी एक पोरकी मुलगी आहे ! माझी आई या वेळी असती, तर तिने— " इतके ती बोलत आहे, तों आईच्या आठवणीने तिचा कंठ दाटून आला आणि तिच्या तोंडातून पुढे शब्द निघेनासा झाला ! इतक्यांत तिला आपल्या पोटाशी घट्ट आवळून धरून मेनका तिला म्हणाली, "बाळे शकुंतले, आहे बरें ! तुला आई आहे बरें ! पण ती असून नसून काय उपयोग ! तीही तुझ्यासारखीच हतभाग्य आणि अनाथ आहे ! " "काय ! माझी आई आहे ! माझी आई मेनका ! ती येथे कोठून असणार ? ती कोठें आहे ?" असें शकुंतला घाईघाईनें आणि मोठ्या उत्सुकतेनें विचारूं लागली, तेव्हां "हीच तुझी ती हतभाग्य आई मेनका ! " असें म्हणून मेनकेने तिच्या

मानेवर आपली मान टाकली आणि तिला फिरून आपल्या पोटाशीं घट्ट धरून आपल्या डोळ्यांतील अश्रुधारांनीं तिनें तिचें सर्वांग भिजवून टाकिलें.

अशा रीतीनें एकमेकीची ओळख पटून झालेली हकीकत त्या दोघी जणी एकामेकीना सांगत आहेत, इतक्यांत मातलीनें सिद्ध केलेल्या रथांत बसून प्रत्यक्ष इंद्र आकाशमार्गांतून तेथें खालीं उतरला. इंद्राला पाहून मेनकेनें त्याला वंदन केलें; व ही आपली मुलगी शकुंतला, आणि दुष्यंत राजानें हिचा त्याग केल्यामुळें हिच्यावर आलेल्या संकटाचें निवारण करण्यासाठीच मीं आपले स्मरण केलें होतें, असें तिनें इंद्राला सांगितलें. त्यानंतर त्या दोघीचें शांतवन करून इंद्र मेनकेला म्हणाला:— "मेनके, तूं आपलें अन्तःकरण स्थिर कर ! तूं आपल्या मदतीसाठीं मला हांका मारीत आहेस, असें मला कळल्याबरोबर मी मातलीला आपला रथ सिद्ध करावयाला सांगितला, आणि ताबडतोब तुझ्याकडे यावयाला निघालों. पण मी इतक्या तांतडीनें आलों, तरी देखील मी उशिरानेंच आलों, असें आतां मला दिसत आहे. पण मी आधी आलों असतों, तरी मी काय केले असतें ? मेनके, तुला माहीतच आहे, की मनुष्यांचें काय आणि देवांचें काय, या कर्माच्या-पुढें कोणाचेही कांही चालत नाही ! मी एवढा इंद्र, पण माझ्या कर्माचीं फळें मलाही भोगावी लागत आहेतच ना ? मग त्या कर्माला कोण काय करणार ? शकुंतलेवर असें कांहीं तरी संकट येणार, हे तुझ्या आणि माझ्याही आधी कण्व महर्षींना कळलेले होतें. व त्या दैवदुर्गतीच्या उपशमना-साठी यांनीही सोमतीर्थाला जाऊन पुष्कळ प्रयत्न केले होते. पण त्यांच्याही प्रयत्नाला जेथें यश आलें नाही, तेथें तू आणि मी तरी काय करणार ! असो, जें व्हावयाचें तें कधी चुकावयाचें नाही. तेव्हां आतां तूं व्यर्थ शोक करूं नकोस.—आणि बाळे शकुंतले, तूंही अगदीं निश्चित ऐस. तुझा आणि तुझ्या पतीचा फिरून समागम कसा घडवून आणावयाचा, याची मी सगळी योजना करतों—मेनके, ही तुझी शकुंतला गरोदर आहे, हिच्या पोटीं एक मोठा चक्रवर्ती राजा जन्मास येणार आहे. म्हणून तूं हिची फार काळजी घे. आणि त्याकरितां आतां तूं असें कर. तुला माहीतच आहे की, येथून जवळच हिमालयामध्ये हेमकूट नांवाचें एक पर्वतशिखर आहे. तेथें माझी माता, इतकेंच नव्हे, तर सर्व देवांची माता, देवमाता अदिति आणि तिचा

पती भगवान् मारीच ऋषि यांचा परमपावन असा आश्रम आहे. त्या आश्रमामध्यें माझी माता अदिति हिच्याजवळ तू या शकुतलेला आतां नेऊन ठेव. म्हणजे तेथें तिची सर्व प्रकारची शुश्रूषा यथास्थित रीतीनें होईल. व ती प्रसूत झाली म्हणजे तिच्या पुत्राचेंही यथासांग संगोपन तेथें करण्यांत येईल--शकुंतले, त्या मारीच ऋषींच्या आश्रमामध्यें आपल्या तपश्चर्येनें तूं आपल्या पूर्वकर्माचें क्षालन पुरें करते आहेस न करते आहेस, तोंच थोड्याच अवधीत मी याच मातलीकडून, याच माझ्या रथामध्यें बसवून तुझ्या दुष्यंत-राजाला त्या मारीच महर्षींच्या आश्रमामध्यें आणवून त्याचा आणि तुझा तुझ्या मुलासह समागम करून देईन, याबद्दल तूं अगदीं निःशंक ऐस !"

असें त्यांचें बोलणें चाललें आहे, तों अप्सरस्तीर्थावर इंद्राचा रथ आलेला पाहून त्या तीर्थामध्यें असलेल्या सानुमती वगैरे बाकीच्या अप्सराही तेथें जमा झाल्या. तेव्हां त्या आपल्या मैत्रिणींना मेनकेनें सर्व हकीकत सांगितली. व इंद्राच्या आज्ञेवरून नंतर त्या सगळ्या जणी शकुंतलेला घेऊन मारीच ऋषीच्या आश्रमाकडे गेल्या. आणि नंतर कांही वेळानें इंद्राचा रथही अंतरिक्षांतून जातां जातां दिसेनसा झाला !

---

## रायगड किल्ल्याचीं दोन स्थित्यंतरें : : १०

तारीख ६ जून १६७४ हा दिवस रायगडच्या किल्ल्यावर किती आनदाचा होता ! महाराष्ट्रामध्ये स्वराज्य संस्थापना करून शिवाजी महाराजांनी या दिवशी रायगडावर आपणाला राज्याभिषेक करवून घेतला आणि रायगडच्या किल्ल्याच्या मुख्य दरवाज्यावर स्वातंत्र्याचें निशाण उभारले. पण त्यानतर ११४ वर्षांनी एके दिवशी सकाळी दुसऱ्या एका प्रकारचा दिवस उगवला. तो दिवस म्हणजे महाराष्ट्रांतील किल्ल्याच्या इतिहासातील एक अतिशय दुःखदायक दिवस होय. पुण्यातून दुसरे बाजीराव पेशवे सन १८१७ च्या नोव्हेंबर महिन्यामध्यें पुणे शहर सोडून बाहेर निघून गेले. त्यानतर त्याच्यापाठीमागे त्याचे राज्य आपसात हस्तगत करून घेण्याचें प्रयत्न सुरू झाले. त्या वेळची राज्याची बळकटी ही किल्ल्याच्या बळकटीवर अवलंबून असे. पण ते बाजीरावाच्या राज्यातील किल्ले एका पाठीमागून एक हळूहळू इंग्लिशाच्या हस्तगत होऊं लागले आणि सन १८१८ च्या एप्रिल महिन्यामध्ये खुद्द रायगड किल्ल्यावरही तोच दुर्धर प्रसग येऊन गुदरला. इंग्लिशाच्या तोफांच्या माऱ्यापुढे बाकीचे किल्ले पडले नर पडोत; परतु रायगडचा किल्ला हा अशा रीतीनें हस्तगत होणें, हें केव्हाही शक्य नाहीं, अशी सर्वांची समजूत होती. आणि त्यामुळेच पुण्यांत लढाईची गडबड सुरू होण्याच्या सुमारास श्रीमंत बाजीरावसाहेब याच्या पत्नी वाराणशीबाई सुरक्षित राहाव्या म्हणून त्याना मुद्दाम रायगड किल्ल्याच्या हवाली करण्यांत आलेले होते. परतु सद्दीचा जोर सपला, म्हणजे अभेद्य किल्ल्यांच्या भितीतील अभेद्यपणाही नाहीसा होतो, असा अनुभव आल्याचें इतिहासा-

मध्यें अनेक ठिकाणी आढळून येतें; आणि ती स्थिति रायगडच्या किल्ल्याची सन १८१८ च्या एप्रिल–मे महिन्यांत दुर्दैवानें झाली.

महाराष्ट्रांतील बाकीचे किल्ले एकामागून एक शरण येत चाललेले पाहून रायगडावरही आपल्या तोफांचा प्रयोग करून पाहावा, असे इंग्लिश अधिकाऱ्यांनीं ठरविलें; व लेफ्टनंट कर्नल प्रॉथर यांची त्या कामावर नेमणूक करण्यांत आली. कर्नल प्रॉथर याच्या हाताखाली कांही पलटणी आणि तोफखाना असे दोन प्रकारचें सैन्य देण्यांत आलेलें होतें. या सैन्याचे प्रवासाच्या सोयीसाठीं दोन विभाग करण्यांत आले. तोफा वगैरे जाण्याला गाडीचा रस्ता पाहिजे म्हणून बोरघाटाच्या रस्त्याने खोपोलीवरून तोफखान्याच्या तुकडीची रवानगी करून देण्यांत आली, आणि शिपाई लोकाच्या पलटणी या लोणावळ्याकडील डोंगरांतील पाय-वाटांनी जंबूसरच्या घाटाने खाली उतरल्या व घाटाच्या पायथ्याशीं सिद्धेश्वर पाली म्हणून जे गणपतीचें एक सुप्रसिद्ध स्थान आहे, त्या ठिकाणी तारीख १२ एप्रिल रोजी दोन निरनिराळ्या वाटांनी आलेल्या या पायदळाची आणि तोफखान्याची एकत्र गाठ पडली. त्यानंतर पाली येथें दोन दिवस मुक्काम करून कर्नल प्रथर याच्या हाताखालील रायगडच्या मोहिमेवर निघालेले हे सैन्य पालीहून निघाल्यानतर वाटेत असलेले तळें आणि घोसाळे हे दोन किल्ले घेण्याकरितां तिकडे वळले. या सैन्याला वाटेंत ठिकठिकाणी पेशव्यांच्या लोकाकडून अडथळा करण्यांत येत होता व तळ्याच्या किल्ल्याजवळच इंदापूर म्हणून जे एक लहानसें गांव आहे, तेथें या इंग्रजी सैन्याला बरीच आडकाठी करण्यांत आली. कारण पुण्यांत जरी या वेळी कित्येक बाळाजीपंत निघालेले होते तरी महाराष्ट्रांतील बाकीच्या ठिकाणी सगळीकडे सगळेच बाळाजीपंत अद्यापि झालेले नव्हते. तरी पण दुर्दैवाच्या पुढे पेशव्यांच्या स्वामिनिष्ठ नोकरांचाही पाड लागेनासा झाला आणि इंदापूर येथें जे पेशव्याचे शिपाई इंग्लिशांचा रस्ता रोखून धरण्याचा प्रयत्न करीत होते, त्यांना माघार घ्यावी लागली, आणि त्यामुळें इंदापुरापासून रायगडच्या बाजूचा पुढील रस्ता इंग्लिशांना मोकळा झाला.

त्याचप्रमाणें तळें आणि घोसाळे या किल्ल्यांचाही मार्ग मोकळा होऊन ते दोन्ही किल्ले ता. १८ एप्रिल रोजीं इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतले. व त्यानतर कर्नल प्रॉथर याच्या हाताखालीं या इंग्रजी सैन्याच्या तुकड्या ता. २३ एप्रिल रोजी इंदापुराहून महाडास येऊन पोहोंचल्या. आणि त्याच दिवशीं रात्रीं रायगडच्या आसपासची टेहळणी करण्याकरितां दोनशें युरोपियन शिपाई आणि दोनशें नेटिव्ह शिपाई हाताखालीं देऊन मेजर हॉल या नांवाच्या एका ऑफिसराला रायगडाकडे पाठविण्यांत आले व बाकीचे सैन्य मागाहून महाडाहून निघून ता. २५ एप्रिल रोजीं रायगडच्या पायथ्याशीं येऊन पोहोंचलें. मेजर हॉल हा जो आपल्या बरोबर चारशें लोक घेऊन आधी रायगडाच्या आसपासची टेहळणी करण्याकरितां एक दिवस पुढें आलेला होता, त्याला रायगडच्या पायथ्याशीं असलेल्या पेट्याजवळ पेशव्यांच्या तीनशें लोकांनीं अडविलें. तेव्हां त्यांच्या दरम्यान बरीच मोठी चकमक उडाली व पेशव्यांच्या लोकांनीं रायगडावरील हा हल्ला परतविण्याच्या कामी शिकस्तीचे प्रयत्न केले, परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. अखेरीस रायगडाच्या पायथ्याजवळील पेटा इंग्लिशांनीं काबीज केला. पुढें ता. २५ एप्रिल रोजीं रायगडच्या पायथ्याशीं इंग्लिशांचें सगळें सैन्य जमा झाल्यानंतर त्या किल्ल्यावर कोणकोणत्या बाजूंनीं कसकसे हल्ले करावयाचें याबद्दलचे बेत ठरविण्यांत आले. सगळेंच सैन्य एकाच बाजूनें नेऊन एकाच ठिकाणावरून हल्ला करावयाचा अशी इंग्लिशांची पद्धत नाहीं. त्यासाठीं सैन्याचे निरनिराळे विभाग करण्यांत आले. आणि निरनिराळ्या बाजूंनीं तोफा डागून किल्ल्यावर सरबत्ती सुरू करण्याचें ठरलें. कोणताही किल्ला जेरीस आणावयाचा म्हणजे त्याच्यावर एकाच वेळीं सर्व बाजूंनी हल्ले व्हावयास पाहिजेत हे जरूरच आहे. व त्याचप्रमाणें कर्नल प्रॉथर यानें आपल्या सैन्याची निरनिराळ्या ठिकाणीं विभागणी केली होती. पण लष्करी कारणाशिवाय आणखीही एका कारणासाठीं अशी व्यवस्था करणें जरूर होते? कारण इतकें सगळें सैन्य त्या उन्हाळ्याच्या दिवसांत रायगडाच्या पायथ्याशीं एकाच ठिकाणीं ठेवण्यांत आलें असतें तर रायगडचा किल्ला हस्तगत करण्याचें बाजूलाच राहून तें सगळें सैन्य पाण्यावांचून तहानेनें मात्र तडफडून मेलें असतें.

निरनिराळ्या ठिकाणीं सैन्याची वाटणी करण्यांत आल्यानंतर रायगडच्या डोंगरावर तोफा चढविण्याचें काम सुरू करण्यांत आलें, पण हें कांहीं हलकें काम नव्हतें. इतर किल्ल्यांची गोष्ट वेगळी; परतु रायगड हा किल्ला उंचीला सर्वांत जास्त, आणि चढण्याला अतिशय अवघड. तेव्हां अशा डोंगरांतून तोफा वर चढविण्याला इंग्लिशांना त्रास पडणें हे अगदीं साहाजिकच होतें. तरी पण जेथून किल्ल्यावर मारा करतां येईल अशी आजूबाजूच्या डोंगरांचीं कांहीं टोकें पाहून तेथें मोर्चे बांधण्यांत आले. व त्यावर कांहीं तोफा उभारण्यांत आल्या. परंतु रायगडच्या किल्ल्याची रचनाच अशी कांहीं विलक्षण आहे कीं, त्यामुळे, जेथें तोफांचे गोळे जाऊन पडावयास पाहिजेत तेथें ते लागू होत नव्हते. शिवाय किल्ल्याला एका पाठीमागें एक, आणि एकापेक्षां अधीक उंचीवर दुसरा असे पांच–सात दरवाजे होते. इतके दरवाजे जेव्हां फुटतील, तेव्हां शत्रूचा आंतील किल्ल्यामध्यें प्रवेश व्हावयाचा. अशी स्थिति असल्यामुळें इतर किल्ल्यांचा जसा पटापट पाडाव करतां आला, तसा हा किल्ला आपल्याला स्वाधीन करून घेतां येणें शक्य नाहीं असें तेथील इंग्लिश अधिकाऱ्यांना वाटूं लागलें होते, व मुंबई सरकारलाही या गोष्टीची जाणीव होती. म्हणून गुजराथेंतून नुकत्याच परत आलेल्या ६७व्या पायदळ फलटणीतील सहा कंपन्या कर्नल प्रॉथर यांच्या मदतीला मुंबई सरकारकडून पाठविण्यांत आल्या. आणि मालवणच्या बाजूनें किल्ले सर करून घेण्याकरितां जी ८९वी पलटण गेली होती तिच्यापैकींही आणखी एक तुकडी रायगडच्या सैन्याच्या मदतीला येऊन पोहोंचली. व आणखी कांहीं मोठमोठ्या तोफाही मुबईहून मदतीस यावयाच्या होत्या. इतक्या गोष्टी होईपर्यंत मे महिन्याची चौथी तारीख येऊन पोहोंचली. एप्रिलच्या २५ तारखेपासून मे महिन्याच्या चौथ्या तारखेपर्यंतचे मध्यंतरींचे इंग्लिशांचे आठदहा दिवस निवळ तयारी करण्यामध्येंच गेले. व या मुदतीनंतर त्यांची साधारणपणें तयारी झाली. पण इतके दिवस देखील त्यांना तयारी करण्याला आपल्या लोकांकडून स्वस्थपणाने मिळूं द्यावयास नको होते. शत्रूची तयारी होऊन ते किल्ल्याच्या दरवाज्याजवळ येतील किंवा किल्ल्यांत येतील, तेव्हां आपण त्यांच्यावर हल्ला करूं आणि त्यांचा आपण समाचार घेऊं अशा समजुतीनें किल्ल्यांतील लोकांनीं आठ दहा दिवसांच्या मुदतीमध्यें स्वस्थ

बसणें बरोबर नव्हते शत्रूचें सैन्य रायगडच्या पायथ्याशीं येऊन तळ देऊन राहिले आहे हे समजल्याबरोबर रायगडावरच्या तोफांनी. त्यांना आपल्या दारूगोळयानें भाजून काढावयाला पाहिजे होते. व शत्रूचे लोक आजूबाजूच्या निरनिराळ्या डोंगरांच्या टोंकांवर चढून तेथे आपल्या तोफा डागण्याकरितां मोर्चे बांधण्याचें काम करीत असतां, त्यांना तेथें येऊं द्यावयाचे नाही, त्यांनी तेथें बाधलेले मोर्चे उडवून टाकावयाचे, त्यांनीं तेथे डागलेल्या तोफा जायबंदी करावयाच्या, त्यांचे गोलंदाज मारून टाकावयाचे आणि त्यांचा दारूगोळा पेटवून द्यावयाचा हीं कामें किल्ल्यावरील तोफांनी या वेळी करावयास हवी होती. किल्ल्यांत जो इतका दारूगोळा सांठवून ठेवलेला होता, तो कशासाठी? किल्ल्यांत ज्या इतक्या मोठमोठ्या तोफा ठेवण्यांत आल्या होत्या, त्यांचा दुसरा काय उपयोग? आणि किल्ल्याच्या तटाच्या भिंतीना चौफेर मारा करतां यावा म्हणून मोठमोठालीं भोकें किल्ला बाधणाऱ्यांनी ठेवून दिलेलीं होतीं त्यांचा तरी दुसरा काय हेतु होता? पण पडत्या काळामध्ये मूळच्या कर्त्या पुरुषांचे हेतु आणि उद्देश सगळे बाजूला राहतात, आणि जे दरवाजे शत्रूला अडविण्यासाठीं म्हणून योजिलेले असतात त्यांतूनच घरभेदेपणा शत्रूला हळूच आंत घेतो. आणि शेकडों हत्तींनी आपल्या गंडस्थळाच्या टकरा मारल्या, तरी ज्या अभेद्य दरवाजावरील लोखंडाच्या सुळक्यांनी हत्तीचीं गंडस्थळें फुटतील, पण जे दरवाजे फुटावयाचे नाहींत, असले अभेद्य किल्ल्यांचे अभेद्य दरवाजे फितुरीच्या, घरभेदेपणाच्या आणि हरामखोरपणाच्या नुसत्या स्पर्शाबरोबर शत्रूच्या प्रवेशाकरतां एकदम सताड उघडे होतात! इंग्लिशांचे लोक आजूबाजूच्या डोंगरावरून मोर्चे बांधत होते. त्या वेळीं किल्ल्यावरच्या तोफानी त्यांच्यावर आपला भडिमार केला नसेल असे नाही. पण नुसत्या वरच्या तोफांनीच एकट्यांनीच भडीमार करून काय व्हावयाचें आहे? वरच्या तोफांच्या कामगिरीला किल्ल्याच्या खालच्या लोकांनींही मदत करावयास पाहिजे; तरच कांहीं तरी कार्य होणार. नाहीं तर किल्ल्यावरच्या लोकांनीं तोफा सोडाव्या आणि खालच्या लोकांनी इमान सोडावें अशी स्थिति झाली, तर मग काय करावयाचें? ज्या वेळेला शत्रू आपल्या किल्ल्यावर चाल करून येईल, त्या वेळेला किल्ल्यावरचे लोक

आणि किल्ल्याखालचे लोक या दोघांच्या कचाटीमध्यें जर शत्रूचें सैन्य पकडलें गेलें, तरच त्याचा फडशा उडणें शक्य आहे. अशा वेळी किल्ल्यावरचे शिबंदीचे शिपाई वरून शत्रूवर तोफांचे गोळे सोडीत असतां खालच्या आजूबाजूच्या गांवांतील स्वामिनिष्ठ लोकांनीही करावयाचें असें एक कर्तव्यकर्म असते. आणि तें असें कीं, आपला किल्ला आपल्यापासून घेण्याकरतां जो शत्रू आपल्यावर चाल करून आलेला असेल, त्याला आपण अन्नपाणी, दाणावैरण वगैरे कांही एक मिळूं द्यावयाचें नाही, आणि अशा रीतीनें त्याची चोहोंबाजूनीं अडवणूक करून त्याला 'मी या अडचणीच्या मुलुखांत कोठून आलों !' असें करून सोडावयाचें. किल्ल्यावरच्या गरनाळांनीं, बंदुकांनीं आणि बाणांनी शत्रूचे जितके लोक मारतां येतील, त्याच्यापेक्षां शत्रूचे जास्त लोक—इतकेंच नव्हे तर, शत्रूचें सगळें सैन्यच्या सैन्य--आजूबाजूच्या गांवच्या रहिवासी लोकांना या अडवणुकीच्या अगदीं साध्या उपायानें सहज मारून टाकतां येण्यासारखें असते. पण तसे करण्याला लोकांमध्यें स्वदेशनिष्ठा, स्वामिनिष्ठा, ऐक्यनिष्ठा वगैरे सद्गुण जरूर असावे लागतात. नेपोलियनचें प्रचंड सैन्य रशियावर स्वारी करण्याकरतां रशियामध्यें शिरलें, तेव्हां तेथील स्वदेशनिष्ठ लोकांनीं काय केलें ? शत्रूला अन्नपाणी आणि दाणावैरण मिळूं नये, म्हणून त्यांनीं आपली उभीं शेतें जाळली. पण शत्रूला वैरण गोटा त्यांनीं मिळूं दिला नाही ! त्याचप्रमाणें औरंगजेबाचे लक्षावधि सैन्य महाराष्ट्राचा उच्छेद करण्याकरितां महाराष्ट्रामध्यें उतरलें असतां आपल्याकडील धनाजी जाधव आणि संताजी घोरपडे यांनीं त्या एवढ्या मोठ्या प्रचंड सैन्याला आपल्या हाताखालील थोड्याशा लोकांनिशी कसें जेरीला आणलें ? त्यांना अडचणींत नेऊन गनिमीकाव्यानें त्यांचा उच्छेद करण्यांत आला. तो पूर्वींचा गनिमीकावा आजही आपल्यामध्यें उरलेला नाही, असें नाही. पण त्याची दिशा मात्र थोडीशी उलटी झाली आहे. ज्या गनिमीकाव्याच्या प्रयोगानें आपण शत्रूला जिकावें, त्याच गनिमीकाव्याचा प्रयोग हल्लीं आपण एकमेकांवर करीत असून आपल्या फितुरीच्या आणि विश्वासघाताच्या गनिमिकाव्यानें आपण आपल्या देशाला गुलामगिरीच्या चिखलामध्यें कायमचें रोवून टाकण्याचें सकृत्य करीत आहो ! रायगडचा किल्ला घेण्या-

करतां इंग्लिशांचें सैन्य रायगडच्या घेऱ्यामध्यें आलें त्या वेळी आसपासच्या लोकांनी त्यांना जेरीला आणण्याला जे उपाय करावयाला पाहिजे होते, ते कोणी केले नाहीत. सगळे लोक उदास आणि कर्तव्यमूढ झालेले होते. दुसरी एक आपल्या लोकांची चुकीची समजूत झालेली असते, ती अशी कीं, रायगडावर इंग्लिशांचा हल्ला आला तर अशासारख्या वेळी आपण काय करावयाचें! आपण सामान्य लोक म्हणजे कांही पगार देऊन लढण्याकरितां ठेवलेले शिपाई नव्हे! म्हणजे पगारी शिपाई असतील, ते वाटेल तर लढतात आणि त्यांचा वाटेल तर जय होईल किंवा पराजय होईल! आपल्याला त्याच्याशीं काय कर्तव्य आहे! असली उदासीनपणाची जी आत्मघातकी वृत्ति आपल्यामध्यें बऱ्याच ठिकाणी दिसून येते, ती आपण आपल्या समाजामधून समूळ काढून टाकली पाहिजे. आपल्या देशाच्या स्वातंत्र्यावर घाला घालण्याकरतां कोणी शत्रू आला तर अशा वेळीं आपण सगळेजण हे आपल्या पेशाचे शिपाई आहोत आणि पगारी शिपायापेक्षां आपण बिनपगारी लोक जास्त मोठ्या दर्जाचे शिपाई आहोंत अशी भावना आपल्या सर्वांच्या मनामध्यें दृढमूल झाली पाहिजे. आपल्या देशाच्या स्वातंत्र्यावर संकट आलें तर, आपण सगळ्यांनीं पटापट गोळा व्हावयाचे आणि आपल्यांतीलच कोणी तरी प्रमुख करून त्याच्या हाताखाली आणि हुकमतीखालीं व्यवस्थितपणें जें जरूर असेल तें करावयाचें, ही जी ग्रीक, स्पार्टन आणि रोमन लोकांमधील पद्धत त्या पद्धतीनें वागण्याला आपण शिकलें पाहिजे. पण १८१८ मध्यें जेव्हां इंग्लिश लोक शिवाजीचा किल्ला घेण्याकरतां आले, तेव्हां शिवाजीचें नांव आणि शिवाजीची स्फूर्ति ही लोकांच्या अंतःकरणांतून मरण पावलेली होती, आणि जिकडे तिकडे बाळाजीपंती स्फूर्ति उत्पन्न होऊं लागली होती! इंग्लिशाच्या सैन्याला रायगडच्या घेऱ्यांत दाणागोटा मिळूं देऊं नये, ही कल्पना कोणाच्या मनांत आली असेल किंवा नाही, याच्याबद्दल तर शंकाच आहे. पण उलट आपल्या धान्याधुन्याला आणि वैरणकाडीला जास्त भाव येत आहे, तर आपल्या शेजारच्या आधीं इंग्लिशाच्या कॉमिसरिअॅट डिपार्टमेंटच्या ऑफिसमध्यें नेऊन विकला पाहिजे, अशाही कदाचित् अहमहमिका त्या वेळी तेथील लोकांच्यामध्यें सुरू झाल्या असतील! पण ते लोक इतक्यावरच थांबते, तरीही फारसें

कांही वाईट नव्हतें. पण कित्येकांची फितुरी आणि हरामखोरी इतकी पुढें गेलेली होती की, जेथून गोळा टाकला असतां नेमका किल्ल्यावर जाऊन पडेल, अशीही एक जागा रायनाका महार या नांवाच्या एका इसमाने इंग्लिशांना दाखवून दिली ! पण या विश्वासघाताच्या कृत्यासाठीं त्या बिचाऱ्या आप्रबुद्ध आणि दरिद्री इसमालाच काय नांवें ठेवावीत.! जेथें ब्राह्मणांसारख्या सुप्रबुद्ध आणि धनाढ्य लोकांमध्येंही बाळाजीपंती वळण दररोज अवशी पहाटे गिरविण्यांत येऊं लागलेलें आहे, तेथें त्या गरीब बिचाऱ्या रायनाक महाराला दोष कोणत्या तोंडानें द्यावयाचा ? त्या बिचाऱ्याला आपले राज्य म्हणजे काय, आपला देश म्हणजे काय आणि त्या देशाचें स्वातंत्र्य म्हणजे काय हें कोठून माहीत असणार ! त्याचें टिचभर पोट हेच त्याचें हिंदुस्थानचें राज्य आणि हाच त्याचा हिंदुस्थान देश ! आपल्या टिचभर पोटाची खाच भरली, म्हणजे कल्पनेलाही अज्ञात अशा आपल्या देशाच्या स्वातंत्र्याची त्याने काय म्हणून फिकीर बाळगावी ? तरी पण आपण हेंही लक्षात ठेवले पाहिजे की, विश्वासूपणा आणि स्वामिनिष्ठा हा एक नैसर्गिक धर्म आहे. कुत्र्यासारखा बिनशिकलेला आणि बिनशिकणारा प्राणी देखील कधीं बेइमान होत नाही, हे पाहून तरी बेइमानी लोकांनीं इमान शिकण्याच्या कामांत कुत्र्याकडून धडे घ्यावे !

पण या वेळीं रायगडच्या किल्ल्यावर हल्ला करणाऱ्या इंग्लिश लोकांना पाठीमागून शह देण्याकरितां कोणीच पुढें सरसावले नाहीत, असें नाहीं. पूर्वी वायरलेस टेलिग्रॅफीचीं साधनें जरी अस्तित्वांत आलेलीं नव्हतीं, तरी एका किल्ल्यावरची बातमी आसपासच्या किल्ल्यांवर कळविण्याचे कांही मार्ग त्या वेळच्या लोकांनीही योजलेले होते आणि तोफांच्या आवाजांनी, किंवा मोठाले जाळ पेटवून किंवा इतर कांही खुणांनीं ते लोक आपल्या बातम्या दुसऱ्यांना कळविण्याचा कार्यभाग साधून घेत असत. अशा कांही उपायानी अगर जासुदांच्या निरोपांनीं रायगडपासून काही थोड्या अंतरावर राहणारे रायगडचे धाकटे दोन भाऊ—कांगोरीचा किल्ला व प्रतापगडचा किल्ला—यांना आपल्या वडील भावावर गुदरलेल्या प्रसंगाची बातमी कळली; व ही बातमी कळतांक्षणीच त्या दोन्ही किल्ल्यांवरचे मिळून कांही लोक खाली उतरले; व

रायगडचा किल्लेदार इंग्लिशांच्या सैन्यावर किल्ल्यावरून गोळे फेकीत असतां, आपण पाठीमागून जाऊन त्या शत्रूच्या सैन्याला दोहोंकडच्या माऱ्यामध्यें गांठावें, असा त्यांचा विचार होता आणि त्या उद्देशानें प्रतापगडच्या आणि कांगोरीच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं सावित्री नदीच्या कांठी पोलादपूर म्हणून जें एक गांव आहे तेथें हे लोक जमा झाले. परंतु हे लोक पाठीमागून आपल्या सैन्यावर छापा घालण्याकरितां येत आहेत, असें कळल्याबरोबर लेफ्टनंट क्रॉसबी त्या लोकांवर चालून गेला. विजयश्रीच्या लहरी पक्षपातामुळें मराठे शिपायांच्या त्या वेळच्या त्या प्रयत्नाला यश आलें नाहीं.

ही गोष्ट घडून आल्यानंतर आणि रायगडच्या सभोंवताली तोफा डागण्याचें काम पुरे झाल्यानंतर रायगडच्या किल्ल्यावर इंग्लिशांनीं विशेष जोरानें तोफांचा भडिमार करण्यास सुरवात केली. मे महिन्याच्या ४।५ तारखेपासून लढाईला विशेष जोर येऊं लागलेला होता. व किल्ल्यावरचे लोक मोठ्या शौर्यानें आपल्या किल्ल्याच्या बचावाचें काम करीत होते. किल्ल्यामध्यें त्या वेळीं श्रीमंत बाजीरावसाहेब यांच्या पत्नी वाराणशीबाई या होत्या, हे पूर्वीच सांगितलें आहे. आणि त्यामुळें किल्ल्याचा बचाव करण्याची आपल्यावर किती मोठी जबाबदारी येऊन पडलेली आहे, याची तेथील किल्लेदाराला पूर्ण जाणीव उत्पन्न झालेली होती. हा किल्लेदार शेख या नांवाचा एक अरबच होता. त्याच्या हाताखालीं अरब, सिधी, मराठे, पठाण, गोसावी वगैरे निरनिराळ्या जातीचे मिळून एक हजार शिपाई होते. आणि ते सर्व जण रात्रंदिवस एकसारखे लढून किल्ल्याच्या संरक्षणासाठीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीत होते सर्वांच्या अंगांत वीरश्रीचें वारे संचरलें होतें. आणि स्वदेशभक्ति व स्वामिनिष्ठा यांच्यायोगानें त्यांच्या शरीरांतील सामर्थ्य द्विगुणितपणाने वृद्धिगत झालेले होतें. हें स्वातंत्र्यदेवतेचें माहेरघर आहे, हा सगळ्या किल्ल्यांचा राजा आहे, हा शिवाजी महाराजांचा किल्ला आहे, रामदासांच्या भगव्या झेंड्याचा आधारस्तंभ आहे. अशा प्रकारच्या उच्च भावनांनीं प्रज्वलित झालेलीं त्या स्वातंत्र्याच्या योद्ध्यांची अंतःकरणें त्यांच्या मनगटामध्ये दैवी सामर्थ्याची प्रेरणा करीत

होती. सगळ्या महाराष्ट्रांतील एका अतिशय उंच अशा रणक्षेत्राच्या रंगभूमीवर आपण हें स्वातंत्र्याचें युद्ध खेळत आहों ! या वेळीं महाराष्ट्रांतील सगळ्या लोकांचे डोळे आपल्याकडे खालून वर लागलेले असतील ! आणि आजपर्यंत आपल्या देशाच्या स्वातंत्र्याकरतां लढून आणि धारातीर्थीं देह ठेवून जे मुक्त झाले, ते सगळे महाराष्ट्र . वीरही क्षणभर या युद्धप्रदर्शनाच्या कुतुहलासाठीं तात्पुरते वायुमय देह धारण करून आकाशांतून खालीं आपणाकडे पाहात असतील ! तेव्हां अशा समयी आपण पूर्ण शौर्यानें लढलें पाहिजे, अशा भावनेनें त्या सर्वांचीं मनें उद्दीपित झालेलीं होतीं. शिपायांची धांवपळ साऱ्या किल्ल्याभर चालू होती. आणि तोफेंत भरलेला दारूगोळा पेटून उडला जाण्याला जो अवकाश लागत होता, तोही गोलंदाजांना सहन होत नव्हता, इतकी त्यांची उत्सुकता वाढलेली होती. आणि एक शिपाई जायबंदी झाला तर त्याची जागा घेण्याला दुसरा शिपाई पुढें आला नाही, असा एक क्षणही त्या वेळीं फुकट जात नव्हता. किल्ल्यावरील तोफांनीं किल्ल्याच्या सभोंवतीं इतका धूर पसरवून दिला होता कीं, ते जर चैत्र वैशाखाचे दिवस नसते, तर हें इतकें दाट धुकेंच पडले आहे की काय, असा कोणालाही भ्रम झाला असता. किल्ल्यावरचे सर्व शिपाई अशा रीतीनें आपणच होऊन मोठ्या शौर्यानें आणि उत्साहाने लढत होते, पण बाजीरावाच्या पत्नी श्री. सौ. वारणशीबाई, याही त्यांना प्रोत्साहन देत होत्या, आणि एखादी आई आपल्या मुलाचें कौतुक करतें, त्याप्रमाणें शिपायांच्या पराक्रमांना त्या वरचेवर शाबासकी देत होत्या. त्यामुळें वीररस आणि वात्सल्यरस यांच्या संमिश्रणाच्या योगानें त्या सर्व शिपायांची अंतःकरणें एकाच वेळीं कठोरही झालीं होतीं आणि मृदुत्वही पावलेलीं होती

इतक्या निस्सीम आणि निर्मल अशा प्रकारच्या या प्रयत्नांना यश यावयास पाहिजे होतें ! पण तें येणार कसें ? हिंदुस्थान देशाच्या दुर्धर भवितव्यतेला आतां कोठें सुरुवात होऊं लागलेली होती ! आणि त्यामुळें इंग्लिशांच्या बाजूकडील खालच्या खालच्या जागेवरील मोर्च्यांवरून येणारे तोफेचे गोळे, जे अजून किल्ल्यापर्यंत येऊं शकत नव्हते, तेही आतां जास्त उंचावरच्या जागेवरून किल्ल्यांत येऊन पडण्याला सुरवात झाली. किल्ल्यावर

इंग्रजी तोफांचा मारा लागू होण्यापूर्वी ले. कर्नल प्रॉथर यांनीं बाजीराव-साहेबांच्या कुटुंबाकरितां म्हणून एक पासपोर्ट पाठविला होता. त्या पास-पोर्टाचा अर्थ असा की, तुम्ही किल्ल्यांतून निघून बाहेर पडून दुसरीकडे जाऊं इच्छित असला, तर तुम्हांला आम्ही सुरक्षितपणें जाऊं देतो ! असा हा परवाना देण्याबद्दलचा निरोप पाठविणे, या एका गोष्टीमध्यें किती तरी अनेक युक्त्या सांठविल्या होत्या ? इंग्लिश लोक हे स्त्रियांच्याबद्दल फार उदार असतात आणि बाजीरावसाहेबांपाशी जरी ते दुसरीकडे लढत होते, तरी त्यांच्या स्त्रीच्या केसालाही धक्का लागू न देण्याची ते दक्षता बाळगीत होते. आणि या बाबतींत कित्येक रानटी मुसलमान सरदारांपेक्षां इंग्रज अधिकाऱ्यांचें हे वर्तन किती तरी जास्त दाक्षिण्ययुक्त आहे, असा फुकटचा लौकिक यांत सहजगत्या अडाणी लोकांच्या दृष्टीने मिळून जातो ! पण असल्या कृत्रिम सौजन्याच्या निरोपा-खालीं किती तरी राजकीय डाव दडवून ठेवण्यांत आलेले असतात ! हा इंग्लिशांचा सौजन्याचा निरोप म्हणजे किल्ल्याच्या आंतील लोकांमध्यें— बाजीरावसाहेबांच्या पत्नी व किल्लेदार यांच्या ऐक्याच्या दृष्टीमध्ये— हळूहळू फूट पाडणारी ही एक लहानशी पाचरच होती ! अशा सुरक्षिततेचा निरोप पोहोंचल्यानंतर वाराणशीबाईंना वाटावें की, आपल्याला आयता पासपोर्ट मिळतो आहे, तर आपण या संकटामध्यें विनाकारण कशाला सांपडावे ? आणि तो पासपोर्ट घेऊन वाराणशीबाई सुरक्षितपणें निघून गेल्या, तर पाठीमागे किल्लेदार आणि त्याचे शिपाई यांना साहजिकपणेंच असें वाटणार कीं, बाईसाहेब पासपोर्ट घेऊन निघून गेल्या, तर मग आतां आम्हांला तरी पाठीमागे किल्ला लढवून काय करावयाचें आहे ! असे विचार उत्पन्न होऊन किल्ला आयताच आपल्या घशामध्यें उतरावा, अशी या इंग्रजी पासपोर्टामध्ये झांकलेली युक्ति होती. दुसरे कोणीही असते, तर ते या साध्या युक्तीच्या आणि या इंग्रजी संभावितपणाच्या जाळ्यामध्यें सांपडल्यावांचून खात्रीनें राहिले नसते !

पण सुदैवाने वाराणशीबाई या तशा नव्हत्या. त्यांनीं या मायावी-पणाच्या पासपोर्टाच्या निरोपाला झिडकारून टाकले आणि त्या किल्ले-दाराला म्हणाल्या, "मी असल्या या मोहाला कधींही बळी पडणार नाहीं. मी तुमच्या संरक्षणाखालीं इतके दिवस येथें येऊन राहिलें आणि आतां

मी तुम्हांला संकटांत टाकून आपल्या देशाच्या शत्रूच्या संरक्षणाखालीं जाईन, असें तुम्हांला वाटतें ? तुम्ही माझ्या संरक्षणासाठीं आपल्या जिवावर उदार झाला आहां ! अशा वेळीं माझ्या जीवाच्या सरक्षणासाठीं तुमचे जीव धोक्यांत घालून मी कशी जाईन ? मनुष्यप्राण्याला इतके कृतघ्न कसें होतां येईल ? किल्लेदार ! शेख अबदुला मी आपल्या जीवाच्या बचावासाठीं येथून एक पाऊलभर देखील हालणार नाही. तिकडच्या जिवावर दररोज लढाईचीं हजारों संकटें कोसळत असतांना मी आपल्या या यःकश्चित जीवाच्या बचावासाठीं त्यांच्या शत्रूच्या संरक्षणाखालीं कशी जाईन ? किल्लेदार, येथील माझ्या सहवासाने माझ्या पोटच्या मुलांप्रमाणें या तुमच्या सगळ्या शिपायांवर माझें मातृप्रेम जडलेलें आहे. या माझ्या मुलाबाळांना टाकून मी कोठें जाऊं ? किल्लेदार ! ते कांही नाहीं ! आपण सगळे जण या किल्ल्याच्या तटावर उभे राहून शत्रूला मारूं किंवा मरूं ! हा त्या शिवाजी महाराजांचा किल्ला आहे. या पवित्र किल्ल्याला आपल्या कमकुवतपणानें आपण कोणत्याही प्रकारचा कलंक लावतां कामा नये !"

एका अबलेच्या तोंडचे हे शब्द ऐकून कोणत्या शूर शिपायाच्या मनामध्यें रणसंग्रामाचा उत्साह उचंबळून येणार नाही ? पण कांही वेळानें या सगळ्या उत्साहाचा फारसा कांही उपयोग होईनासा झाला. शत्रूचे गोळे एकामागून एक किल्ल्यांत येऊन पडू लागले व शत्रूचे लोक खालच्या जागेवरील तोफा जास्ती उंचावरच्या जागेवर ओढून आणून तेथून गोलंदाजी करूं लागले. आणि रायनाक् महाराने दाखवून दिलेल्या जागेवर डागलेल्या तोफेचे गोळे तर अगदी नेमक्या नेमक्या ठिकाणीच येऊन पडू लागले. फितुरीच्या गोळ्यांचा नेम सहसा कधी चुकत नाहीच ! ते नेहमीच अचूकच मारा करतात ! या फितुरीच्या गोळ्यांनीं किल्ल्यावरील एक एक इमारत हळूहळू जमीनदोस्त होऊं लागली. किल्ल्यावरची शिपाई लोकांची घरें पेटली. किल्ल्यावरच्या मशिदी आणि महादेवाची देवळें यांतून धूर निघू लागले. किल्ल्याच्या बुरुजांच्या भिंती धडाधड कोसळू लागल्या. किल्ल्यांतील अनेक तळ्यांमधून आजूबाजूच्या दरडी कोसळून तो पाण्याच्या तळ्यांऐवजी चिखलाची डबकीं झालीं. शिवाजी महाराजांच्या वेळच्या ज्या जुन्या इमारतींच्या दगडी भिंती उभ्या होत्या, त्यांचेही दगड

कोसळून पडू लागले. फार काय, खुद्द शिवाजी महाराजांची जी समाधी होती, तीही कोसळून पडणाऱ्या दगडांच्या आणि विटांच्या ढिगाखाली दिसेनाशी झाली. शिवाजी महाराजांच्या वेळचा जो एक वाडा होता त्या वाड्याला आग लागून त्याच्या ज्वाळा आकाशांत जाऊं लागल्या. किल्ल्यावर पिण्याला पाणी नाहीं, खाण्याला अन्न नाही आणि राहण्याला जागा नाहीं, अशी ही दुर्धर स्थिति उत्पन्न होत चालली होती; तरी इमानी मुसलमान किल्लेदार शेख अबदुल आणि त्याच्या हाताखालचे अरब आणि पठाण, मराठे आणि गोसावी, हे लढाईची शिकस्त करीतच होते. आपल्या चोहोंबाजूनीं कोसळणाऱ्या इमारती, जळणारे राजवाडे, जळून गेलेल्या घरांच्या राखेचे ढीग आणि मेलेल्या शिपायांची प्रेतें यांच्यामध्यें शौर्यानें आणि शांतवृत्तीनें उभ्या राहून बाराणशीबाई ह्या आपल्या पुत्रवत् मानलेल्या त्या शिपायांना न हटतां लढाई चालू ठेवण्याबद्दल एकसारख्या प्रोत्साहन देत होत्या. तरी पण आपल्या देशाचें दुर्दैव असे की, इतक्याही मानवी प्रयत्नानी अखेरीस यश येण्याची कांही चिन्हें दिसेत ना? त्या वेळी किल्ल्याच्या भिंतींना असें वाटू लागलें कीं, आपण वर्षानुवर्ष येथे फुकट उभे राहून काय केलें? तेव्हां आतां तरी आपण आपल्या जन्माचें सार्थक करूं या! आणि आतां आपल्याला कोसळावयाचेंच असेल, तर आंतल्या बाजूला आपल्याच लोकांच्या अंगावर न कोसळतां बाहेरच्या बाजूला तरी आपल्या या देहाचा देशकार्यासाठी कडेलोट करूं या! आणि असें करतांना त्यांत आपल्याखालीं आपण शत्रूच्या पांचपन्नास माणसांना चिरडून टाकले, तर तेवढें तरी पुण्य आपणाला लागेल! किल्ल्याच्या पठारावर अनेक लहानमोठे दगड पसरलेले होते. त्यांनाही शिवाजी महाराजांच्या त्या आवडत्या किल्ल्याची ही दशा झालेली पाहून रडूं येऊं लागलें! आणि ते आपल्या आसपासच्या लोकांना म्हणू लागले कीं, 'अहो! आम्हांला तरी कोणी येथून उचलून खालीं शत्रूच्या अंगावर ढकलून द्या हो! म्हणजे आम्ही तरी त्यांना चिरडून टाकू आणि त्यांच्या मार्गांत आडवे होऊन त्यांना वर येऊं देणार नाहीं! किल्ल्यांत तेलाच्या कढया किती तरी सांठवून ठेवलेल्या होत्या. त्या सगळ्या विस्तवावांचून क्रोधानेंच संतप्त होऊन असें म्हणूं लागल्या कीं, 'आम्ही आधीच तापलेल्या आहोंत आतां आमच्यांत तेल

ओतून खालीं थोडा जाळ लावा, आणि आमच्यांतील तापलेलें तेल शत्रूच्या अंगावर ओता, म्हणजे तें तेल तरी त्यांना भाजून काढील हो!"

अशा प्रकारची त्या किल्ल्यावरील सर्व सचेतन आणि अचेतन वस्तूंमध्यें रणसंग्रामाची एक प्रकारची अत्यंत तीव्रता उत्पन्न झालेली होती. आणि अजूनही प्रयत्न केले, तर यश येईल अशी आशा वाटत होती. यशासाठीं एकीकडे परमेश्वराचे धांवे करण्यांत येत होते आणि दुसरीकडे शत्रूवर निरनिराळ्या प्रकारचीं शस्त्रास्त्रें फेंकण्यांत येत होतीं. अजूनही अगदींच निराशा झालेली नव्हती. कारण किल्ल्यांतील बाकीच्या ठिकाणांवर जरी इंग्लिशांचे गोळे येऊन पडत होते तरी किल्यांतील दारूचें कोठार हें अद्यापि सुरक्षित होते. त्याच्या जोरावर "आम्हाला खावयाला अन्न नसलें, तरी हरकत नाहीं, पण आमच्यापाशीं जोंपर्यंत दारूगोळा आहे, तोंपर्यंत आम्ही लढल्यावांचून कधीही राहणार नाहीं," निर्वाणीचें अशा प्रकारचें आश्वासन किल्लेदार शेख अबदुल हा वाराणशीबाईना देत होता. पण त्याचें हें बोलणें ता. ६ मे रोजीं तिसऱ्या प्रहरी चार वाजण्याचें सुमारास चाललेलें असतांना रायनाक् महाराच्या फितुरीचा एक गोळा नेमका दारूगोळ्याच्या कोठारावर येऊन पडला! आणि साऱ्या किल्लाभर एकच भडका उडून गेला!

दारूगोळ्याच्या कोठाराला आग लागल्यामुळें त्यांचा धक्का इतका मोठा बसला कीं, तो सगळ्या रायगडचा डोंगर क्षणभर हादरून गेल्यासारखा वाटला. आणि त्याचा गडगडाट आकाशामध्यें इतक्या मोठ्यानें दुमदुमून गेला की स्वर्गस्थ आत्मेही त्याच्या योगानें दचकून जाऊन इकडे तिकडे पाहूं लागले! त्या वेळी एका बाजूला तान्हाजी मालुसरे आणि दुसऱ्या बाजूला बाजी देशपांडे व त्याच्या मध्यभागी शिवाजी महाराज, असे त्रिवर्ग नंदनवनामध्यें अमृतपान करीत बसलेले होते. त्यांनीं खाली दृष्टि फेंकली, तों आपल्या रायगडावरून आगीच्या ज्वाळा आणि धुराचे लोट रायगडावरची दुःखदायक बातमी आपल्याला सांगण्याकरितां आपल्याकडेच येत आहेत असें त्यांना आढळून आलें. त्याबरोबर आपल्या पुढील अमृताचे चषक बाजूला सारून ते तिघेही घाईघाईनें वातावरणांतून अदृश्य रूपानें बरेंच खालीं उतरले. आणि त्यांनीं अश्रुपूर्ण नेत्रांनीं रायगडच्या परिस्थितीचें सर्व बाजूंनीं बारकाईनें निरीक्षण केलें. त्या वेळीं एका टेकडीवर आपला एक

देशबांधव रायगडावर आणखी गोळे कोठें फेकतो हें इंग्रजी गोलंदाजांना सांगत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला ! आणि तो देखावा पाहून त्या तिघांचींही अंतःकरणे त्या आगीच्या ज्वाळांपेक्षां त्या दिसलेल्या देखाव्यानेंच जास्त करपून गेलीं. त्या वेळीं त्या तिघांनीही एकदम दुःखाचे दीर्घ निश्वास टाकले, आणि तान्हाजी शिवाजी महाराजांच्या मुखाकडे पाहून म्हणाला, " महाराज, घोरपडीच्या शेपटीला दोर बांधून आणि आपला जीव धोक्यांत घालून आम्ही—नव्हे, नव्हे, आपल्या पायांच्या नोकरांनीं कोंडाण्यासारखें किल्ले फुकट काबीज केलें ! " " मलाही महाराज, असेंच वाटतें कीं, " बाजी देशपांडेही त्याच वेळीं डोळ्यांतील अश्रु पुशीत पुशीत म्हणाला, आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठीं पवनखिंडींतील रस्ता अडवून आणि आपल्या प्राणाचे बळी देऊन आम्ही आज अखेरीस काय साधलें ? " हें अशा प्रकारचें दोघांचे उद्‌गार ऐकून शिवाजीलाही अतिशय वाईट वाटलें व तो दांतओंठ खात म्हणाला, " या फितुरी-सारखा देशाचा शत्रू कोणी नाहीं ! आपल्या देशांतून या फितुरीचा समूळ उच्छेद व्हावा म्हणून मी चंद्रराव मोऱ्यांना आधी मारून टाकलें ! तरी पण आज त्यांच्या जागी दुसरें चंद्रराव मोरे उत्पन्न झाले असून ते फिरून आपला देश गुलामगिरींत घालण्याला मदत करीत आहेतच ! आणि आज हा माझा आवडता किल्ला जो जळत आहे, तो इंग्लिशांच्या तोफांनीं जळत नसून आपल्याच देशबांधवांच्या फितुरीनें जाळला जात आहे ! या किल्ल्यावरील ही माझीं सगळी पूर्व परिचित स्थळें उध्वस्त झालेली पाहून, माझ्या मनाला किती तरी खेद होत आहे ! पण माझे महाल आणि माझे राजवाडे नष्ट झाले तर ते खुशाल होवोत. पण ज्या महा-देवाची मी नित्य पूजा करीत असे आणि जो महादेव मला स्वातंत्र्याची स्फूर्ति देत असे, त्या महादेवाचें देऊळही हें येथें छिन्नविच्छिन्न झालेलें दिसत आहे ! हे महासाध्वी वाराणशीबाई, जेथें देवांनीं आपल्या देवळांची ही स्थिति करून घेतली, तेथें आपण आपल्या नष्ट होणाऱ्या मानवी वैभवाबद्दल खेद करून काय होणार ? असो ! त्याच देवता जेव्हां आपल्या देशावर तुमच्या सारख्यांच्या सद्‌गुणांनीं आणि सदाचरणांनी संतुष्ट होतील, त्या वेळी फिरून आपल्या देशाला हें सगळें पूर्वींचें वैभव लवकरच परत

मिळेल !" असें म्हणून वातावरणांतील त्या त्रिमूर्ती नाहीशा झाल्या. पण वाराणशीबाई यांना मात्र आपले कोणी तरी अत्यंत कोमल शब्दांनी शांतवन करीत आहे, असा एक क्षणभर भास झाला !

असो, दारूच्या कोठाराला आग लागल्यानंतर किल्लेदाराच्या आशेचा शेवटचा तंतू तुटून गेला. आणि आतां आपला याच्यापुढें निभाव लागणे शक्य नाहीं, अशी सर्वांची खात्री झाली. आणि संध्याकाळच्या काळोखाबरोबर किल्ल्यावर जिकडे तिकडे निराशेचाही काळोख पसरूं लागला. जळणाऱ्या राजवाड्याच्या आणि इतर इमारतींच्या प्रकाशाने तो दोन्ही प्रकारचा अंधकार कमी न होतां उलट जास्तच भेसूर भासूं लागला. किल्ल्यावरील लोकांची ती रात्र अशा रीतीनें कशी तरी गेली; आणि दुसऱ्या दिवशीच्या प्रातःकालानें किल्ल्याच्या पायथ्या जवळच्या वाडीमध्यें उभय पक्षांच्या लोकांच्या दरम्यान तडजोडीचें बोलणें चाललेलें पाहिलें, ता. ७ रोजीं सकाळीं आठ वाजतां उभय पक्षांकडील लोक तहाच्या अटी ठरविण्याकरितां एकत्र बसले. किल्ल्यावरच्या लोकांना विचार करण्या-करितां पांच तासांची मुदत देण्यांत आली; परंतु किल्ल्यावरील लोकांचा कांहीं विचार ठरेना व सुचविलेल्या अटी कबूल करण्याचें त्यांनीं नाकारलें तेव्हां ता. ७ रोजी तिसरे प्रहरीं फिरून गोळीबाराला सुरवात झाली व तो गोळीबार ता. ८ च्या सकाळपर्यंत चालू होता. त्यानंतर फिरून उभय पक्षामध्यें तहाचें बोलणें सुरू झालें. किल्लेदार, शेख अब्दुल याने आपणाला योग्य अटी मिळाव्यांत, म्हणून पुष्कळ आढेवेढे घेतले, आणि अखेरीस ता. ९ रोजीं तिसरे प्रहरापर्यंत वाटाघाटी होऊन एकदांचा उभयपक्षांमध्यें तह ठरला. किल्ल्यावर असलेल्या सर्व शिपाई लोकांना आपली हत्यारें आणि आपली खाजगी मिळकत बरोबर घेऊन जाण्याला परवानगी असावी. किल्लेदार शेख अब्दुल याला आपल्या नोकरांसह आणि हत्यारांसह पुण्यांत राहण्याची परवानगी असावी. वगैरे अटी ठरून किल्ला खालीं करून देण्याचे मुक्रर झालें. त्याप्रमाणें ता. १० मे रोजीं तिसरे प्रहरच्या सुमारास ले. कर्नल प्रॉथर हा आपल्या लोकांसह किल्ल्यावर जाऊन त्यानें किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. आणि बाजीरावसाहेबांच्या पत्नी वाराणशीबाई, यांच्याबरोबर हत्ती, उंट व शंभर शिपाई असा लवाजमा

देऊन त्यांची पुण्याला रवानगी करून देण्यांत आली. इंग्लिशांनीं किल्ला आपल्या ताब्यांत घेतला, त्या वेळीं त्या किल्ल्यावर एकही इमारत जळाल्यावांचून धड राहिलेली नव्हती. फक्त धान्याचें एक कोठार मात्र कांहीं एक खराबी न होतां शिल्लक राहिलें होतें. या किल्ल्यावर इंग्लिशांना पांच लाख रुपये रोकड सांपडले अशी इंग्लिश इतिहासकारांनीं कबुली दिलेली आहे.

सन १८१८ मधील मे महिन्याच्या दहा तारखेला रायगडच्या किल्ल्याची वर वर्णन केल्याप्रमाणें स्थिति झालेली होती. सन १६७४ च्या जून महिन्याच्या ६ व्या तारखेची रायगडची स्थिति कोणीकडे आणि या वेळची ही स्थिति कोणीकडे! सन १६७४ मध्ये शिवाजीचा—नव्हे, महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचा—राज्याभिषेक रायगडावर झाला आणि सन १८१८ मध्यें महाराष्ट्र, स्वातंत्र्याच्या सिंहासनावरून पदच्युत होऊन त्याच्या हातापायांत गुलामगिरीच्या बिड्या ठोकण्यांत आल्या! सन १६७४ मध्यें रायगडावर स्वातंत्र्याचें निशाण चढविण्यांत आलें! पण १८१८ मध्यें त्याच रायगडावरील आपल्या स्वातंत्र्याचें निशाण खालीं करण्यांत येऊन इंग्रजांचा बावटा वर चढविण्यांत आला! १४४ वर्षांच्या एवढ्याशा अवधींमध्यें हे इतके फेरफार झाले! रायगडच्या किल्ल्याचीं फक्त एका दीड शतकामध्यें अशा प्रकारची ही दोन स्थित्यंतरें झालेली पाहून "दैवाची गति विचित्र आहे!" याच्याशिवाय कोणाच्या तोंडून दुसरे काय उद्गार बाहेर पडतील!

—रत्नाकर, जानेवारी १९२६.

# रायगडावरील संपत्ति : : ११

रायगडावर शिवाजी महाराजांनी आपल्याला राज्याभिषेक करवून घेतला तेव्हांपासून तों इ. स. १८१८ मध्यें इंग्लिशांनी तो किल्ला काबीज करून आपल्या ताब्यांत घेईपर्यंतच्या मध्यंतरीच्या काळामध्यें अनेक राजकीय घडामोडी झाल्या. व त्यानंतर पुढें तेथील प्रदेश बहुतेक ओसाड पडल्या-सारखाच झाला. जेथें राजकारणी पुरुष आणि त्यांच्या सेना सदासर्वदा वावरत होत्या तेथें आतां रात्रींच्या प्रहरीं त्यांचीं भुतें नाचूं लागलीं होतीं. जेथें लक्ष्मीचें साम्राज्य एक वेळ नांदत होतें, तें ठिकाण आतां तिच्या बहिणीचें वसतिस्थान होऊन राहिलेलें होतें. जेथें माणसांची गर्दी असावयाची तेथें भयाणपणा चोहींकडे पसरला होता. आणि जेथें राज्ये वाढावयाची तेथे कांटेरी झाडेंझुडपें वाढू लागलीं होतीं. अशी जरी एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें रायगडवरची स्थिति झालेली होती, तरी कित्येक लोकांच्या मनांतून त्या रायगडवरच्या भूमीचें प्रेम अद्यापि कमी झालेलें नव्हतें. पण याचा असा अर्थ मात्र नव्हे की, ती रायगडावरची भूमि ही स्वराज्य आणि स्वातंत्र्य या जुळ्या भावंडांना प्रसवणारी पवित्र भूमि आहे, म्हणून त्या भूमीवर या लोकांचें प्रेम होते. त्यांच्या प्रेमाचें कारण याहून अगदीं भिन्न होतें. इंग्लिशांनी, या देशांमध्यें आपली सत्ता प्रचलित केल्यानंतर आपलें पूर्वीचें स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांच्या कल्पनांनी कोणाच्याही मनाच्या शांततेचा भंग होऊं नये, याबद्दल चांगली खबरदारी घेतलेली असे. त्यामुळें स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांची गर्भभूमि या दृष्टीनें रायगडावरच्या भूमीचें प्रेम कोणालाही वाटत नव्हतें. परंतु तिच्या प्रेमाचें जें कारण होतें, तें याहून अगदी निराळेंच होतें. दोन तीनशें वर्षे जेथे राज्यवैभव नांदत होतें,

तेथें तें राज्यवैभव नाहीसें झालें, तरी त्याचें कांहीं तरी अवशेष कोठें तरी असले पाहिजेत, अशी त्या वेळीं रायगडच्या आसपासच्या पुष्कळ लोकांची समजूत होती. शिवाजीने अनेक ठिकाणचें द्रव्य आणून तें रायगडावर ओतलें होतें. त्या द्रव्यापैकीं कांहीं भाग जरी पुढल्या राजांनी आपल्या उधळ-पट्टीनें उधळून टाकला असला, तरी बाकी राहिलेलें द्रव्य रायगडावर कोठें तरी जमिनीमध्यें गडप झालेलें असले पाहिजे, अशी पुष्कळ लोकांची आकांक्षा होती. व त्यामुळें बरेच लोक आपल्या नशिबाची परीक्षा पाहण्याकरितां पूर्वी रायगडावर जात असत. जमिनीत गाडले गेलेलें जुनें द्रव्य आपल्याला कोठे तरी मिळेल, या आशेनें द्रव्यलोभी मनुष्यांनी त्या बिचाऱ्या मृतप्राय झालेल्या रायगडाच्या अंगाला आपल्या पहारींनी हजारों ठिकाणी भोकें पाडलीं असतील. येथें कुदळी मारून पहा, तेथें खळगे खणून पहा, हा फरस-बंदीचा दगड उलटून त्याच्या खालीं द्रव्य आहे कां पहा, ती मूर्ती उपटून तिच्या सिंहासनाखालीं कांहीं द्रव्य ठेवलेलें आहे कां पहा, अशा रीतीनें या द्रव्य-लोभी मनुष्यांनी मध्यंतरीं कांहीं दिवसपर्यंत रायगडवरील एकही ठिकाण शाबूत ठेवलेलें नव्हतें. रायगडावरच्या हौदांतून बुड्या मारून पहाव्या आणि रायगडावरील तळ्यांच्या तळचा गाळ काढून त्यांत कोठें कांही सोनें नाणें सांपडतें काय तें पहावें, अशा सर्व प्रकारच्या मार्गांनीं प्रयत्न करून पाहण्यांत येत होते. व असे प्रयत्न करणाऱ्या लोकांची संख्याही पुष्कळ होती; पण त्यांतून कोणालाही यश आल्याचे ऐकिवांत नाही. पुष्कळांची कुदळचा, पावडीं, पहारा वगैरे हत्यारें रोजरोज रायगडवरची माती आणि दगड ही खणून बोथट झाली होतीं; पण त्यांतील एखाद्या तरी हत्याराचा घाव एखाद्या सुवर्ण भांडारावर जाऊन पडला, असें क्वचितच झालें असेल.

या सगळ्या लोकांना हें समजावयास पाहिजे होतें कीं, इ. स. १८१८ सालामध्यें इंग्लिशांनीं या किल्ल्याची अखेरची लूट करून त्यांतील सगळी चीजवस्त नेल्यानंतर तेथें त्याच्या पाठीमागून जाणाऱ्या आपल्या सारख्या लोकांच्या हातीं कांही एक लागणें शक्य नाही. इंग्लिशांसारख्या चौकस आणि शोधक दृष्टीच्या पुढे कांहीं सोन्याचे कण चुकून उरावेत आणि ते मागाहून इंडियन लोकांच्या हातीं लागावेत, हे व्हावें कसे ? तरी पण ही

साधी गोष्टही लक्षांत न येऊन रायगडच्या आसपासचे शेंकडों लोक रायगडावरील पुरली गेलेली संपत्ति आपल्याला मिळावी, म्हणून नेहमीं उद्योगामध्यें निमग्न होऊन गेलेले असत.

रायगडच्या विस्तीर्ण पायथ्याच्या सभोंवती जीं निरनिराळी अनेक खेडेगांवें पसरलेलीं आहेत, त्यांत छत्री निजामपूर या नांवाचें एक खेडेगांव आहे. या रायगड परगण्यामध्यें निजामपूर या नांवाचीं दोन गांवें आहेत. त्यांपैकीं एका गांवाचा दुसऱ्या गांवाशीं घोटाळा होऊं नये, म्हणून या गांवाला छत्री निजामपूर असें नांव देण्यांत आलेलें आहे. हें नांव देण्याचें कारण असें झालें, म्हणून सांगतात कीं, रायगड हा एक फार उंच किल्ला आहे, व त्या किल्ल्याच्या त्या उंच डोंगरावर वारा नेहमीं अतिशय जोरानें वाहत असतो. हल्लीची विमानें ही अलीकडे हळूहळू पूर्णावस्थेला जाऊन पोहोंचत आहेत. पण कांहीं थोड्या वर्षांपूर्वी जेव्हां ही विमानोड्डाणाची कल्पना बाल्यावस्थेंत होती, तेव्हां विमानांत बसून वर गेलेल्या मनुष्याला खालीं उतरावयाचें झाले म्हणजे तो एक मोठी छत्री उघडून आपलें विमान सोडून देत असे, आणि त्या छत्रीच्या मदतीनें हवेच्या दाबाचा फायदा घेत घेत तो मनुष्य हळूहळू पृथ्वीच्या तळावर सुरक्षितपणें उतरत असे. हा जो शास्त्रीय पद्धतीचा प्रकार तोच पूर्वीं एकेकाळी रायगडावर एका यदृच्छात्मक रीतीनें घडून आला. कोणी मनुष्य आपली छत्री उघडून रायगडच्या पठारावरून चालला असतां तेथें त्या वेळी जो अतिशय सोसाट्याचा वारा सुटला होता, त्याच्यायोगानें त्याचे पाय धरणीपासून सुटले आणि तो आकाशांत तरंगूं लागला, परतु त्याच्या हातांत जी छत्री होती तिच्या सहाय्यानें ती उतरत उतरत या निजामपूर गांवाच्या हद्दीजवळ उतरला. या छत्रीच्या मदतीमुळें तो मनुष्य बचावला आणि कोठें एखाद्या कडेकपारामध्यें जाऊन न पडतां तो सुरक्षितपणें या निजामपूरच्या गांवांत उतरला; म्हणून त्या वेळेपासून त्या गांवाला छत्री निजामपूर असें नांव देण्यांत आलेलें आहे. हा गांव रायगडच्या पायथ्याच्या जवळच असल्यानें तेथीलही पुष्कळ लोक रायगडावरून सोनें आणण्यासाठी जात असत. तेथील पुष्कळ निरुद्योगी लोकांचा हा एक नेहमींचा उद्योगच होऊन बसलेला होता. व त्या गांवांतील मोठे लोक जें करीत, तें पाहून आपणही त्यांच्यासारखेच

प्रयत्न करावेत, अशी बुद्धि सहाजिकपणेंच त्या गांवांतील लहान लहान मुलांच्या मनामध्येही उत्पन्न होत असे. अशा मुलांपैकीं त्या गांवामध्यें दौलती या नांवाचा एक लहान मुलगा होता. इ.स. १८३५-३६ च्या सुमाराला त्याचा बाप वारला; आणि त्याच्या बापाच्या मरणानंतर सुमारें तीनचार महिन्यांनीं हा मुलगा आपल्या आईच्या पोटीं जन्माला आल्यानंतर थोड्याच वर्षांनीं त्याची आई ही बिचारी मरण पावली. अशा पोरक्या स्थितीत वाढतां वाढतां तो सुमारें १८।२० वर्षांचें वयाचा झालेला होता. या वयांत तो आला असतां आपल्या गांवचे लोक रायगडावरून सोनें आणण्याकरितां जात असतात, या गोष्टी त्याच्या कानांवर कित्येकदां आलेल्या होत्या. त्यामुळें एके दिवशीं त्याला असें वाटलें कीं, आपणही रायगडावर जाऊन आपल्या नशिबाची परीक्षा पाहावी. व अशा हेतूने त्यानें रायगडावर जाण्याचा निश्चय केला. रायगडावर कोणत्या दिवशी जावयाचें, तेथें गेल्यावर द्रव्याकरितां कोणत्या जागा खोदून पहावयाच्या, वगैरे जरूर ती माहिती त्यानें मिळविली. आणि एके दिवशीं संध्याकाळीं तो त्या हेतूनें आपल्या घरांतून निघाला. तो रायगडच्या अर्ध्या वाटेवर आला तोंच रात्र झाली. पण आपण द्रव्याकरितां जमीन खणीत आहों, हें कोणाला कळेल आणि आपल्याला द्रव्य सांपडलेंच तर कदाचित् ते कोणी लुबाडील, या भीतीनें ही गोष्ट रातोरातच झाली पाहिजे, अशा समजुतीनें तो ठेचा खात खात तसाच रायगडचा डोंगर चढून वर गेला. त्याच्या बरोबर चांगली धार लावलेली कुदळ, पहार, वगैरे त्याची हत्यारें होतीच. रायगडावरील राजवाड्याच्या पटांगणाजवळ पोहोंचल्याबरोबर आपल्या कुदळीचा आणि पहारेचा कोठें तरी प्रयोग करून पाहावयाचा याबद्दल त्यानें विचार चालविला; आणि त्याच्या कल्पनेनें त्याला जीं जीं ठिकाणें सुचविलीं, त्या त्या ठिकाणें त्याने आपली पहार चालवून पाहिली. पण त्याच्या त्या हतभागी लोखंडी पहारेला सोन्याचा कोठेंही स्पर्श झाला नाहीं. अखेरीस त्याच्या मनामध्यें अशी एक कल्पना आली कीं, राजाच्या सिंहासनाचा जो मुख्य चबुतरा आहे, त्याच्या खालीं तरी निदान कांहीं तरी द्रव्य असलेंच पाहिजे. तेव्हां दुसरीकडे कोठें द्रव्य सांपडले नाहीं, तरी या दगडाच्या खाली आपणाला खात्रीनें द्रव्य सांपडणार, अशा आशेनें त्यानें त्या चबुतऱ्याच्या ठिकाणावरचे कांहीं दगड उलथे पालथे केले; परंतु तेथेंही त्याला

कांहीं इष्ट लाभ झाला नाहीं. त्या रात्रीच्या त्या पांच-सात घटकांच्या अवकाशामध्यें त्यानें सुमारें पाच-पंचवीस ठिकाणीं तरी या प्रमाणें उकरून पाहिलें असेल. पण इतक्या ठिकाणांपैकीं एका ठिकाणींहीं त्याची आशा सफल झाली नाहीं. आणि द्रव्य सांपडलें नाही तें नाहींच; पण तें द्रव्य शोधण्याच्या पायीं तो अतिशय थकून मात्र गेला. अशा स्थितीत निराशा आणि परिश्रम याचा दुसरा परिणाम काय व्हावयाचा ? त्याला अतिशय थकवा आला आणि तो तेथीलच एका दगडावर निराश होऊन पडला असतां तेथेंच त्याला झोंप लागली.

पण ही झोंप त्याला फार वेळ लागली नाही. तो खणून खणून दमला, तेव्हांच बहुतेक रात्र खलास झालेली होती. तरीपण त्या पहाटेच्या थंडगार हवेंत त्याच्या परिश्रमामुळें त्याला थोडा वेळ कां होईना, पण चांगली झोंप लागली होती. त्यानंतर कांहीं वेळानें आसपासच्या खालच्या खेडेगांवांतील कोंबड्यांच्या आरवण्यानें आणि किल्ल्यावरच्या झाडांवरील पक्ष्यांच्या किल्बिल् किल्बिल् अशा मंजुळ स्वरानें त्याला जागे केलें. तो जागा झाला, तों रात्रीच्या देखाव्याचें स्वरूप बदलून रायगडवर चोहोंकडे अरुणोदयाचा प्रकाश पसरत चाललेला होता. तरी पण आकाशामध्यें कांहीं मोठे मोठे तारे अद्यापि शिल्लक होते.; चोहोंकडे प्रातःकाळचा मंजुळ वारा वाहूं लागला होता; आणि तो खालच्या खेडेगांवांतील पहाटेस पेटविलेल्या चुलीमधील धुराच्या उलटचा नद्यांचे बारीक बारीक फाटे वर वळवून आणीत होता. अंधकार मागें हटत चालला होता आणि प्रकाश त्याचा पाठलाग करून त्याला पिटाळून लावीत होता. वाघ आपल्या करचंदीच्या निबड जाळींतून दडून बसण्याकरितां त्या जाळ्यांत शिरूं लागले होते; आणि आसपासच्या गांवांतील गाई आपल्या वासरांना बरोबर घेऊन डोंगर पाखाडीवरून हळूंहळूं वर चढूं लागल्या होत्या. अशा वेळीं हा एकाएकी जागा झाला. कांही वेळ डोळे चोळून झाल्यानंतर आणि दमलेल्या हातापायांचीं हाडें मोडून झाल्यानंतर त्याची बुद्धीही जागी झाली. एक दोन जांभया देऊन तो उभा राहिला आणि आपल्या सभोंवतीं तो चोहोंकडे पाहूं लागला. त्या वेळीं त्याचें मन आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेले. तों जिकडे जिकडे पाहूं लागला तिकडे तिकडे त्याला

अद्भूतपणाशिवाय आणि उदात्तपणाशिवाय दुसरें कांही दिसेचना ! तो आदल्या दिवशी संध्याकाळीं डोंगर चढून वर आला, तेव्हां तो डोंगर चढतां चढतां दमला खरा; पण आपण किती उंच वर चढून आलों आहों, याची त्याला त्या वेळीं त्या काळोखामध्यें कल्पना आली नाही. पण आतां जेव्हां या रायगडच्या उंच शिखरावरून तो एकेका कड्याच्या खाली पाहूं लागला, तेव्हां पृथ्वीतल सोडून आपण स्वर्गाच्या वाटेवर किती उंच आलों आहो, याची त्याला कल्पना होऊं लागली. व त्याबरोबरच त्याचें मनही खाऱ्च्या प्रतीच्या कल्पना मधून मधून उच्च प्रकारच्या वातावरणामध्यें प्रवेश करूं लागलें. आपल्याला कोठें तरी थोडेबहुत तरी सोनें सांपडावें ही त्याची क्षुद्र इच्छा. आणि साऱ्या रात्रभर खणतां खणतां दमून अखेरीस कोठेंही सोने न मिळाल्यामुळें त्याची झालेली आत्यंतिक निराशा, यांच्यायोगानें त्याच्या मनांत गेल्या साऱ्या रात्रभर आणि त्या रात्रीच्या झोपेंत त्याला पडलेल्या स्वप्नामध्येंही त्याला जी एकसारखी खिन्नता वाटत होती, ती त्या रायगडवरची, त्या वेळेची ती प्रशांत रमणीय शोभा पाहून, पार नाहींशी झाली आणि त्याच्या सभोंवतीं पसरलेल्या त्या शेंकडों डोंगरांच्या शिरोभागावरून जी शांतता पसरलेली होती, तिनें त्याच्या वासनांचा निराश होऊन तेथें पूर्ण शांतता प्रस्थापित झाली. त्याचप्रमाणें त्या प्रभात काळीं सृष्टिदेवतेनें त्या उच्च प्रदेशामध्यें सर्वत्र जो आनंदी आनंद पसरविला होता त्या आनंदाच्याही छटा अंतःकरणामध्यें प्रवेश करूं लागल्या, आणि त्याला न कळत त्याचें अंतःकरण हळूहळू प्रफुल्लित आणि उल्हसित होऊं लागलें. ज्या प्रभातकालीन आनंदानें त्या तेथून दिसणाऱ्या शेंकडों डोंगरावरील वनपुष्पांना प्रफुल्लित केले होतें. ज्या आनंदामुळें त्या डोंगरावरील गवतांच्या काड्याही डोलू लागल्या होत्या. आणि ज्या आनंदामुळें तेथील पक्षी नाचूं बागडूं लागले होते आणि माधुर्यानें भरलेलीं गाणीं गाऊं लागले होते, त्या आनंदानें तेथील सर्व स्थिरचर विश्वाला टाकल्यानंतर तो स्वर्गांतून खालीं उतरलेला आनंद त्या एकट्याच्याच अंतःकरणामध्यें ओतप्रोत भरल्यावाचून कसा थांबू शकेल ? अशा प्रकारची तेथील ती सकाळची ती दिव्य शोभा पाहून त्याची चित्तवृत्ति अगदी बदलून गेली. त्याचें तें 'छत्री निजामपूर' नांवाचें गांव

ज्या दिशेकडे होतें, त्या दिशेकडे तो एकदां पाही, आणि तेथून दृष्टि काढून मग तो फिरून आपल्या सभोंवतीं पसरलेल्या त्या अवाढव्य विश्व विस्ताराकडे पाही. इतक्या उंचावरून आपल्या जन्मभूमीच्या खेडेगांवाकडे तो खालीं पाहूं लागला तेव्हां तें त्याच्या बाल्यावस्थेच्या कल्पनेमध्ये पुष्कळ मोठें वाटणारें त्याचें गांव वरून एखाद्या ठिपक्यासारखें लहान दिसत आहे असा त्याला भास झाला. व त्या मानानें त्याच्या सभोंवतालच्या त्या विश्वाचा विस्तार त्याला किती तरी प्रचंड दिसूं लागला. आणि या तुलनेच्या योगानें त्याच्या अंतर्दृष्टीमध्यें जी विश्वव्यापकतेची कल्पना प्रादुर्भूत झाली ती त्याला त्यानंतर मिटवितां येणें अगदीं अशक्यच होऊन गेलें. अशा रीतीनें कांहीं वेळपर्यंत त्याची दृष्टि आपल्या सभोंवतालचें तें सृष्टिचमत्कार पाहाण्यामध्यें आणि तेथील सृष्टिदेवता त्यांचें मन आपल्या अद्वितीय जादूनें भारून टाकण्यामध्यें गुंतलेली होती. अशा परिस्थितीमध्यें कांहीं थोडाच वेळ जातो आहे न आहे तो दक्षिण, पश्चिम, उत्तर या दिशाकडच्या क्षितीजाकडे त्याची दृष्टि गेली. तेथें डोंगरांचीं शिखरें एकापुढें एक अशी अनेक कोसच्या कोस दाट लागून गेलेली दिसत असल्यामुळें हा काय डोंगरांचा आणि पर्वतांचा एखादा महासमुद्रच माझ्या सभोवतीं पसरला आहे की काय, असा त्याला भास झाला. अशा रीतीनें दृश्यमान होणाऱ्या या हजारों पर्वत शिखरांकडे तो आपली निश्चल दृष्टि लावून तटस्थ उभा राहिला होता, इतक्यांत त्या असंख्य पर्वत शिखरांचा रंग हळूहळू पालटत चालला आहे असें त्याला दिसूं लागलें. आणखी कांहीं थोडे क्षण जात आहेत न जात आहेत तोंच त्या सगळ्या पर्वतांचीं तीं असंख्य शिखरें सोन्यानें मढवून काढलीं गेली आहेत असें ह्याला आढळून आलें. तो आश्चर्यानें चकीत होऊन गेला. त्याला कांहीं समजेनासे झालें. जी पर्वतशिखरें थोड्या क्षणांपूर्वी तेथील गवतामुळें पांढुरकी, झाडामुळें हिरवीं आणि दगड किंवा माती यांच्यामुळें काळी दिसत होती इतक्यांत सारीं सोन्यानें कशी मढविलीं गेलीं! या अनेक पर्वत राजांच्या मस्तकावर इतके हे अनेक सुवर्ण मुकुट इतक्यांत कोणीं आणून घातलें आणि इतक्या या सोन्याचा वर्षाव या सर्व भूमीवर हा कोणीं केला! हा काय चमत्कार आहे? ही काय जादू आहे? इतकें हें सोनें कोणी निर्माण केलें? आणि हे कोठून

आलें ? असे प्रश्न आपल्या मनाला विचारीत तो दिङ्मूढ होऊन इकडे तिकडे फिरून पाहूं लागला. तों पूर्व दिशेच्या क्षितीजाकडे त्याचें लक्ष गेलें. तेथें त्याला काय दिसलें ? तेथें तें दैदिप्यमान सूर्यमंडल उदयाचलाच्यावर अर्धवट उदित झालेलें त्याला दिसलें. तें पाहून त्याच्या मनाला त्या वेळीं जो आनंद झाला, तो त्याच्या अंतःकरणांत मावेना. त्या अर्धोदित सूर्य प्रकाशानें त्याच्या अंतःकरणामध्यें त्याच्या पूर्व सुकृताच्या संचितानें त्याची जी दिव्य दृष्टि उन्मीलनोन्मुख झालेली होती, ती एखाद्या सूर्यविकासी कमलाप्रमाणें पूर्णपणें प्रफुल्लित झाली. त्याला जे दिसत नव्हते तें दिसूं लागलें. त्याला जें ऐकू येत नव्हतें तें ऐकू येऊं लागलें. आणि त्याला जें समजत नव्हतें, तें समजूं लागलें ! आपल्या आसमंतांतील असंख्य पर्वतावर हा सोन्याचा वर्षाव कोणी केला आहे, या पर्वतरूपी महायोद्धयांच्या अंगावर हीं सोन्याची चिलखतें कोणीं चढविलीं आहेत, या पर्वतराजांच्या मस्तकावर सोन्याचे हे मुकुट कोणी ठेवले आहेत, आणि इतक्या या सगळ्या अगणित सोन्याचा उगम कोठून आहे, याची त्याला योग्य कल्पना आली. आणि अत्यंत नम्रतापूर्वक रीतीने आपले हात जोडून त्याच्या मनानें त्या सूर्याला सहस्रप्रणाम केलें ! व आपल्या त्या पूर्वींच्या क्षुद्र मानवी अज्ञानाबद्दल त्यानें त्या दिव्य तेजाच्या पुढें क्षमेची याचना केली. त्याच्या हल्लीच्या या बदललेल्या मनःस्थितीनंतर आपल्या पूर्वींच्या क्षुद्र मनोवृत्तीची त्याला लाज वाटूं लागली. त्याची ती आदल्या दिवशींची काळोखानें भरलेली रात्र कोणीकडे ! आणि त्याचा आतांचा हा प्रकाशानें भरलेला प्रभातकाल कोणीकडे ! त्याला वाटूं लागलें की, मी एकारात्रीं पूर्वीं किती तरी अज्ञानामध्यें होतों ! काल रात्रीपर्यंत मला असें वाटत होतें कीं, रायगडावरची संपत्ति ही रायगडावरच्या मातीमध्यें पुरली आहे ! पण ती माझी केवढी चूक ! रायगडावरची संपत्ति रायगडावरच्या माती-खालीं आणि दगडांखालीं पुरलेली नसून ती तर येथें चोहोंकडे उघडी करून मांडून ठेवण्यांत आली आहे ! आणि मी काय वेड्यासारखा ती मातीखालीं खणून पहात आहे ! ही रायगडवरची अलोट संपत्ति वाटेल त्यानें यावें आणि वाटेल त्यानें लुटून न्यावी ! इंग्लिशांसारख्या परकीय लोकांनीं येथील इतर संपत्ति गुंडाळून नेलेली असली, तरी ही ईश्वरीसंपत्ति कोणालाही

येथून नेतां येणार नाहीं, लोकांनीं ती लुटून न्यावी म्हणूनच त्या सदय अंतःकरणाच्या परमेश्वरानें ती तेथें उघडी करून ठेवली आहे! ही सपत्ति खणून काढावी लागत नाहीं. ही संपत्ति साध्य करून घेण्याकरतां कुदळ आणि पहार असल्या जड लोखंडी सामानाची जरूरी लागत नाही. मी वेडा, म्हणून मी या कुदळीचें आणि पहारेचे ओझें खालून वर वाहून आणिलें. पण खऱ्या संपत्तीच्या साधनाला असल्या या लोखंडी सामग्रीची कांहीं एक जरूर लागत नाहीं. असें म्हणून तुच्छतेनें त्यानें आपल्या जवळची कुदळ आणि पहार जवळच्या एका कड्याखाली फेंकून दिली! व तो यापुढें आणखी म्हणाला, "असल्या या लोखंडी साधनांची येथें काय आवश्यकता आहे? येथें जमीन खणून तिच्यावरची माती काढावयाची नसून आपलें अंतःकरण खणून त्याच्यावर पडलेली अज्ञानाच्या मातीचीं दडपणें दूर करावयास पाहिजे आहेत! तीं परमेश्वरकृपेनें ज्यांची दूर होतील आणि ज्यांच्या डोळ्यामध्यें हें ज्ञानाचें अंजन घातलें जाईल, त्यांना येथें संपत्तीला काय तोटा आहे? ते जेथें पाहतील, तेथें त्यांना संपत्तीच संपत्ति भरून राहिलेली दिसून येईल! येथें या रायगडावर परमेश्वरानें कोणची संपत्ति सांठवून ठेवावयाची शिल्लक ठेवली आहे? येथें या वेळीं सर्व सृष्टीभर हा सूर्यनारायण जिकडे तिकडे आपल्या सहस्रधारांनीं सोन्याचा पाऊस पाडीत असतां मी एखाद्या वेड्यासारखा त्या कालच्या रात्रीच्या काळोखामध्यें चोहोंकडे भोकें पाडून त्या शिवाजीमहाराजांनी पवित्र केलेल्या या राज्यवैभवाशाली भूमातेला विनाकारण वेदना देत होतों! त्या शिवाजीमहाराजांनीं ही जी पुण्यभूमि आपल्या सिंहासनाच्या संस्थापनेकरितां पसंत केली ती याकरितांच पसंत केली असली पाहिजे कीं, येथें सृष्टिनिर्मित संपत्ति अपरंपार भरलेली आहे! ही अक्षय्य संपत्ति—ही परमेश्वराच्या कृपेने प्राप्त होणारी अक्षय्य संपत्ति—येथें अपरिमित सांठविलेली आहे, हे पाहूनच शिवाजीमहाराजांनीं ही भूमि राज्यस्थापनेला योग्य म्हणून मानली असली पाहिजे. हा परमेश्वरी कृपेचा अक्षयी वाहणारा संपत्तीचा झरा जेथें नाहीं, तेथें कोणी भिकारी मनुष्यांनीं मुंग्याप्रमाणें आपलीं वारुळें बांधून त्यांत सांठवून ठेवलेली चिमुटभर संपत्ति किती दिवस पुरणार आहे? जमिनींत पुरून ठेवलेली संपत्ति ही खरी

संपत्ति नव्हे, तर भाग्यवान् मनुष्याच्या अंतःकरणामध्यें परमेश्वरानें आपल्या हातानें आणून लावलेली जी कृपादृष्टीची कल्पकता, तीच मनुष्याची खरी संपत्ति होय. ती शिवाजीमहाराजांच्यापाशीं होती! ती शिवाजीमहाराजांच्या अंतःकरणामध्यें होती! आणि त्यामुळें त्यांना महाराष्ट्राच्या सिंहासनावर बसून आपल्या स्वातंत्र्याचा राज्याभिषेक करून घेतां आला! – पण हाय! हाय! मी काल रात्रीं किती नीच होतों! काल रात्रीं माझ्या कल्पना किती अधमपणाच्या होत्या! आणि कालच्या त्या काळोखामध्यें मी कृतघ्नपणाचें एक किती भयंकर कृत्य केलें! नाहीं का? मी आपल्या या अधोगामी पहारेनें अनेक ठिकाणी सोन्याकरतां खणून निराश झाल्यानंतर या ठिकाणी खात्रीनें द्रव्य असलें पाहिजे असें म्हणून मी एका चबुतऱ्याचे दगड आपल्या पहारेनें उचकटले नाहीत काय?—तो चबुतरा कसला होता? तो चबुतरा शिवाजीमहाराजांच्या सिंहासनाचा होता. त्या चबुतऱ्याच्या सिंहासनावर शिवाजीमहाराजांना बसवून काशीच्या गागाभट्टांनी तेथे त्यांना स्वातंत्र्याचा राज्याभिषेक केला!—आणि तेथें मी काय केलें? तर मी—या अधमानें या माझ्या अधमतर हातांनी—त्या आमच्या देशाच्या स्वातंत्र्याच्या सिंहासनाचे दगड यःकश्चित् मातीमोल अशा थोडचाशा सोन्याच्या क्षुद्र नाण्यासाठीं उलथून पाडले! धिःक्कार असो मला! ज्या पहारेनें मी माझ्या देशाच्या स्वातंत्र्याच्या सिंहासनाचे दगड द्रव्याच्या आशेनें उलथून पाडण्याला उद्युक्त झालों, ती पहार खरोखर मी माझ्या या छातीमध्येंच मारून घ्यावयास पाहिजे होती! पण आम्ही यःकश्चित् स्वार्थासाठीही जर आपल्या स्वातंत्र्याची सिंहासनें उलथून टाकण्याला अशा रीतीनें उद्युक्त झालों, तरि परमेश्वर आपणावर कशी कृपादृष्टि करील? मी आपल्या राजाच्या सिंहासनाचे दगड उचकटले, त्याबद्दल मला अत्यंत खेद वाटत आहे! आणि मला या पातकाचा कांहीं तरी प्रतिकार केलाच पाहिजे!

असे म्हणून त्यानें रात्रीं त्या सिंहासनाच्या चबुतऱ्याचे जे दगड काढले होते, ते फिरून बसविण्याचा प्रयत्न केला, व ते त्यानें फिरून कसेबसे बसविले पण ते बसवितांना आणि बसविल्यानंतरही त्याच्या मनामध्यें फिरून पुढीलप्रमाणें विचार घोळू लागले, आणि तो आपल्याशींच म्हणाला,

'छे! हे निखळलेले दगड चांगले बसत नाहीत! आणि त्यांच्यामध्यें चुना वगैरे घातल्यावांचून हे चांगले बसणार तरी कसे?' पण तो इतके म्हणत आहे, तो फिरून त्याच्या मनांत दुसरे विचार असे आले कीं, जुन्या दगडांत नवीन चुना घालणें हा कांहीं शिवाजीचें सिंहासन दुरुस्त करण्याचा खरा मार्ग नव्हे! दोन दगडांना आवळून धरणारा चुना कोणताही पाथरवट त्यांच्यामध्ये आपल्या करणीनें भरूं शकेल! पण शिवाजीमहाराजांच्या सिंहासनाला जी खरी बळकटी आली होती, ती या दोन दगडांच्या मधील चुन्याने आलेली नसून आपल्या महाराष्ट्रांतील असंख्य वीर पुरुषांचीं जीं अंतःकरणें एकत्र आवळून धरणारा असा जो स्वातंत्र्य प्रेमाचा चुना शिवाजीमहाराजांनीं उपयोगामध्यें आणला होता, त्याच्यायोगानें त्यांच्या सिंहासनाला बळकटी आलेली होती. तेव्हां अशा दृष्टीनें पाहतां एका घोटीव दगडाजवळ दुसरा घोटीव दगड आणून बसविणें आणि त्यांना एकत्र आवळून धरण्याकरतां त्यांच्यामध्यें चुनखडी भाजून केलेला चुना भरणें, हा कांहीं खरा मार्ग नव्हे!

या रायगडावर जी अनेक प्रकारची संपत्ति सांठविलेली आहे, त्यामध्यें स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांचीही संपत्ति तेथें जी भरलेली होती, ती त्याच्या अंतःकरणाला अशा रीतीनें दृग्गोचर होऊं लागली; व स्वराज्य संस्थापनेचे खोटे आणि दिखाऊ मार्ग कोणते आणि खरे व टिकाऊ मार्ग कोणते, यांच्याबद्दलचाही स्पष्ट विवेक त्यांच्या मनामध्यें प्रकाशित होऊं लागला. एकदां अंतःकरण परमेश्वरी प्रेरणेनें, विश्वव्यापकतेच्या प्रदेशामध्यें प्रवेश करूं लागलें, म्हणजे त्या अंतःकरणावरचे क्षुद्रतेचे सर्व पडदे गळून पडून तें अंतःकरण सर्व गोष्टीकडे सम्यक दर्शनाच्या दृष्टीनेंच पाहूं लागतें. आणि त्या अंतःकरणामध्ये उदात्त कल्पनांचीं स्फुरणें उत्पन्न होऊं लागतात व स्वदेशाच्या स्वातंत्र्याचे खरे मार्गही स्पष्टपणें प्रादुर्भूत होतात. त्या रायगडच्या गगनचुंबित शिखरावरून परम कारुणिकत्वाची व तादात्म्य वृत्तीची योग्य कल्पना त्याच्या मनामध्यें उभी राहिली. त्याचे त्याला प्रिय असलेलें त्याच्या जन्मभूमीचें जे खेडेगांव तेथून एखाद्या ठिपक्यासारखें लहान भासत होतें, तें लहान दिसूं लागल्याबद्दल त्याला विषाद न वाटतां तेथून ही जी सर्व विस्तीर्ण सृष्टि दिसत आहे,

तीच माझी जन्मभूमि अशी विशाल कल्पना त्याच्या अंतःकरणामध्यें प्रादुर्भूत होऊन त्याला आनंदातिरेकाचा अनुभव येऊं लागला. त्याच्या जन्मभूमीच्या त्या गावांतील, त्याच्या त्या लहानशा घरांतील, त्यांची जन्मदात्री आई जी मरण पावली होती, तिचें त्याला या वेळी स्मरण झालें ! पण तिच्या स्मरणामुळें त्याच्या अंतःकरणाला दुःख न होता, त्या सभोंवतालच्या सृष्टीतील प्रत्येक उपकारक वस्तूमध्ये त्याला त्याची आई दिसू लागली. नाना प्रकारची धान्यें उत्पन्न करणारी ही भूमि, मधुर फळें निर्माण करणारे हे वृक्ष, जेथें जावें तेथें शीतळ पाणी पाजणाऱ्या या नद्या, श्रमपरिहरण करणारा हा मंदप्रवाही वायु, हा सर्व अन्नांचा परिपाक करणारा सूर्यनारायण, आणि मी जेथे निद्रा सेवन करूं इच्छीन तेथें माझ्याकरतां प्रेमाचा पाळणा पाहात तयार करून देणारी ही भूमि, या प्रत्येकांच्या ठिकाणीं मी माझी आईच आहे, अशी व्यापक वृत्ति त्याच्या अंतःकरणामध्यें उत्पन्न झाली ! त्याच्या आसमंतात् पसरलेल्या या विश्वचैतन्याच्या आनंदामध्यें तो आपली सर्व वैयक्तिक दुःखें विसरून गेला. तो ज्या क्षुद्र सोन्याच्या शोधासाठीं काळोखांतून ठेचा खात हिंडत होता, त्याच्यापेक्षां शतपटीनें अधिक मौल्यवान् असें सोनें त्याला या रायगडावर सांपडलें आणि उचकटलेल्या दगडामध्यें चुना भरणें या पाथरवटी उद्योगापेक्षां, देशाच्या स्वातंत्र्याच्या समर्थनाच्या दिशा फार भिन्न आहेत, हेंही ज्ञान त्याच रायगडावरील दिव्य दृष्टीनें त्याला करून दिलें!

अशा प्रकारच्या त्याच्या मनःस्थितीमध्यें फरक पडल्यानंतर पुढें कांहीं दिवस तो रायगडावर तेथील महादेवाच्या देवळांत देवताराधन करीत राहिला व पुढें कांहीं दिवसांनी तो खालीं उतरला. पण खालीं उतरल्यानंतर तो आपल्या गांवांत फार दिवस राहिला नाही. त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत दिल्ली, ग्वाल्हेर, कानपूर, काल्पी, काशी, प्रयाग वगैरे ठिकाणीं कांहीं कारणांमुळें मोठी गडबड उडून राहिलेली होती. व तिकडच्या उत्साहजनक बातम्या दररोज नवीन नवीन दक्षिणेमध्यें ज्या येत असत, त्यामुळें इकडच्या बाजूचे पुष्कळ उत्साही तरुण आपल्या निरनिराळ्या टोळ्या करून तिकडे जावयाकरितां निघत असत. अशा एका टोळीमध्यें सामील होऊन हा त्या वेळीं जो गेला, त्याचा त्यानंतर पुढें कोणाला कांहीं पत्ता कळला नाहीं!

—रत्नाकर, ऑगस्ट १९२६.

